— शास्त्रं ज्योतिः प्रकाशार्थम् —

आयुर्वेद-सेवा-संघ पुस्तकमाला (२)

# निवडक रुग्णचिकित्सा

( २२९ निवडक रुग्णचिकित्सांचा संग्रह )

संग्राहक

वैद्य बिन्दुमाधवशास्त्री पण्डित, आयुर्वेदतीर्थ

जीव-सदस्य, आयुर्वेद-सेवा-संघ

प्राध्यापक, आयुर्वेद महाविद्यालय, अहमदनगर

किंमत ४॥ रुपये

प्रकाशक — मंत्री, आयुर्वेद-सेवा-संघ,

# प्रकाशकाचे दोन शब्द

## अद्वितीय पुष्प

आयुर्वेद-सेवा-संघ पुस्तकमालेचे संख्येनें द्वितीय परंतु गुणानें अद्वितीय असे हें पुष्प आयुर्वेदप्रेमी वाचकांच्या करयुगुलीं सादर करण्यास अत्यंत आनंद होत आहे. सेवा-संघानें कांहीं वर्षांपूर्वी, वै. प. गंगाधरशास्त्री गुणे यांनीं संपादित "औषधिगुणधर्मशास्त्र" या ग्रंथाच्या पहिल्या भागाचा हिंदी अनुवाद प्रसिद्ध करून शेंकडों हिंदी वाचकांस त्या ग्रंथांतील ज्ञान सुगम करून दिलें. ज्या वैद्यकतज्ज्ञांनीं त्याचें कल्पनातीत स्वागत केलें त्यांचा संघ फारच ऋणी आहे.

## नूतन ग्रंथ प्रकाशन

आयुर्वेद-सेवा-संघानें ज्या स्वरूपाचें कार्य हातीं घेतलें आहे त्याचें परिपोषक व एक अंग म्हणून आर्ष व नूतन ग्रंथसंशोधन व प्रकाशन हें एक कार्य आहे. वास्तवांत हें कार्य एवढें सावकाश व इतकेंच करून भागणार नाहीं. यांत गति व कार्यकक्षा बरीच वाढवावयास पाहिजे ही गोष्ट खरी, तथापि संघसदस्यांवर असणारा कार्याचा भार लक्षांत घेतां हीं गतिहि कमी नाहीं असें म्हणावयास हरकत नाहीं.

प्रथम पुष्प अनुवादात्मक आहे, तर द्वितीय पुष्प हें संग्रहात्मक आहे. संघाच्या प्रकाशनांत या प्रकारचें वैविध्य राहणार आहे. कार्य मात्र सावधानीनें पण प्रत्यक्षांत ज्याचा उपयोग व महत्त्व आहे असेंच राहील.

## अनुभवालाच जास्त महत्त्व

भिषग्विलास मासिकांत निवडक रुग्णचिकित्सा हा विभाग जरी बऱ्याच वर्षांपासून ठेविला होता, तरी वाचकांच्या इच्छेप्रमाणें गेल्या ४ वर्षांपासून तो बराच विकसित करण्यांत आला. निरनिराळ्या व्यवसायबंधूंकडून परोपकारहेतुपूर्वक भिषक्‌कडे अनेक निवडक रुग्णचिकित्सा येऊं लागल्या. वैद्यकीय व्यवसायांत असंख्य मार्गांनीं बहुविध अनुभव येत असतात. कोणत्याहि गोष्टींत शास्त्र हें केवळ मार्गदर्शनार्थ असतें. वैद्यकीय व्यवहारनौका अनाहतपणें हाकारण्यास शास्त्रीय वैद्यक ग्रंथांचा उपयोग सुकाणू-सारखा होतो. तरी वैद्यकीय व्यवहारांतील अनुभवालाच अतीं जास्त महत्त्व असतें. असे आलेले अनुभव परीक्षणार्थ जगाच्या बाजारांत छातीठोकपणानें मांडणें व जातां जातां त्याचा फायदा इतरहि व्यवसायबंधूंस लाभू देणें या प्रकारची द्व्यर्थकरी क्रिया भिषक्प्रेमी बऱ्याच लेखकांनीं केली, व आजचा हा ग्रंथ हें त्यांच्याच परिश्रमाचें फल म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. त्याहिपेक्षा निरनिराळ्या वाचकांकडून "ह्या निवडक रुग्णचिकित्सांचा आम्हांस व्यवहारांत फार उपयोग होतो, तरी बसेंहि करून ह्यांचा एक

स्वतंत्र ग्रंथ आम्हास मिळण्याची व्यवस्था व्हावी," ह्या व अशा अर्थाच्या बहुसंख्य पत्राचा परिपाक म्हणून हा ग्रथ आहे असे म्हटले तरी चालेल असा हा ग्रंथ प्रकाशित होणार असे कळल्याबरोबर कित्येक वाचकानी मनिऑर्डर्स करून स्वत च्याच मनाशी ग्रथांची किंमत ठरवून पैसेहि आगाऊच पाठवून दिले, यावरून जनतेला अशा ग्रथाची खरोखरीच किती जरुरी आहे याची कल्पना येते. या द्वितीय पुष्पाचेहि जनताजनार्दन सहर्ष स्वागत करील व जनतेचीहि अपेक्षा हा ग्रंथ काही कक्षेपर्यंत पूर्ण करील अशी आशा वाटते. " सधवृत्त " मासिकाच्या दोन वर्षाच्या अकातून प्रसिद्ध झालेल्या निवडक रुग्णचिकित्साचाहि समावेश या ग्रंथात केलेला आहे

## शेकडो रुग्णांचे अनुभव

निवडक रुग्णचिकित्सेचे हे स्वरूप वाचकांस आवडले ही गोष्ट ठीक, परतु त्याच्या आवडीबद्दल यत्किंचितहि अनादर न बाळगिता हे स्वरूप कसे असावयास पाहिजे याची कल्पना येथे देणे अप्रस्तुत होणार नाही असे वाटतें आणि म्हणून तिचा थोडक्यात उल्लेख करीत आहे निवडक रुग्णचिकित्सा पुस्तकात काही अपवाद जर सोडले, तर बरेचसे चिकित्सित रुग्ण संख्येने एकाकी आहेत व वैद्यकासारख्या व्यवसायात एका ठिकाणी आलेल्या अनुभवावरून काही सिद्धात माडता येत नाही अतएव एकाकित्व हे संशयाधिकरण ठरते, करिता एकाच प्रकारचे शेकडो रुग्ण घेऊन त्याच्याबद्दल शास्त्रीय परिभाषेत सागोपाग सपरीक्षण नोद ठेवून मगच आलेले अनुभव प्रसिद्ध केल्यास त्यावरूनच काही सिद्धात ठरविता येतील अशा आकडेवारीने ठेविलेल्या सग्रहास शास्त्रात फार वरचे स्थान आहे एवढेच नव्हे, तर घटोत्पत्तीला मृद्दंडचक्रसूत्रादिकाचे जेवढे अपरिहार्यत्व, तेवढेंच शास्त्रनिर्मितीसहि अशा प्रकारच्या शतसहस्रसंख्य सविग्रह अनुभवाचे प्रत्ययत्व आहे

## प्रयत्न-प्रासादाची कोनशिला

परतु आजची आयुर्वेदाची कक्षा पाहिल्यास हा पुरस्सर भावी उज्ज्वल कालाची कल्पना देण्यास पुरेसा वाटतो हे पुष्प वरील प्रकारच्या प्रयत्न-प्रासादाची कोनशिला आहे असे म्हणण्यास हरकत नाही कारण प्रयत्न-प्रासाद एकाएकी उभारला जात नाही, त्याला क्रमानेच जावे लागते व त्या क्रमापैकी हे एक विश्रातिस्थान आहे ह्या स्थानावरून अतीत गोष्टीच्या सूक्ष्म परीक्षणानंतरचा अनुभव अनागत परतु भविष्यत् ग्रंथनिर्मितीस उपकारक होणार आहे

पुस्तकाकरिता लेख न लिहिता व्यवहारातील अनुभव प्रकाशित करण्याच्या उद्देशाने लिहिलेल्या लेखाचे हे पुस्तक असल्याने त्यात संपूर्णता येऊं शकली नाही काही काही प्रकारच्या विकारातील चिकित्साची व निदानपद्धतीची यात न्यूनता आहे तरीहि पुढील विशेष गोष्टीमुळे ह्या ग्रंथाच्या ठिकाणी नूतनता आली आहे

## चिकित्सेत सप्तधातूंचा विचार

आयुर्वेदीय विचारसरणीस वर्गवारीच्या दृष्टीनें सुसूत्रता आणण्यास कारणीभूत जो त्रिधातुविचार तत्सवर्वींचे दृष्टिकोण या ग्रथात आलेल्या दोषप्रत्यनीक चिकित्सेत पाहावयास सापडतात विकारप्रकृति (दोष) ज्या अधिकरणावर राहून व्याधिरूपी कार्य घडते त्या दृष्याचा (रसादिधातूंचा) उहापोह सामान्य बुद्धीसहि समजेल व पटेल या दृष्टीने माडला गेला आहे निरनिराळ्या दृष्यात दुष्टि आल्यामुळे जे विकार उत्पन्न होतात त्याचाहि विचार यात दिला आहे आयुर्वेदीय सूक्ष्म व स्थूल मलाचा सवत लक्षणावरून कसा ओळखावा याची दिशा काही लेखांवरून मिळते

या पुस्तकात स्वतत्रपणे सिद्ध व असिद्ध औषधीचा उपयोग केलेल्या चिकित्सा आटळून येतील रुग्णवैविध्य त्याचे स्वभाववैविध्यहि आटळेल वाही काही ठिकाणी शस्त्रकर्मसाध्य रुग्णहि केवळ औषधीचिकित्सेने बरा केलेला दिसेल

विकाराचे स्वरूप सुतीव्र, औषधि अगदीच साध्या, पण गुण मात्र मोठा अशा व साथीसारख्या विकारातहि आयुर्वेदीय चिकित्सा कशी कार्यकारी होते याचीहि कल्पना देणारी प्रतीके यात आहेत

## व्रणाची आयुर्वेदीय चिकित्सा

दग्ध अगर तदितर व्रणाच्या रुग्णातहि अतर्बाह्य शुद्ध आयुर्वेदीय चिकित्सा, सान्निपातिकज्वर, त्यात होणारी आशुज्वरमुक्ति व तज्जन्य शक्तिपात, कृमि, अन्नाभिनोदन, अश्मरी, वातव्याधि, आन्त्रपुच्छशोथ, आन्त्रदिपार, तज्जन्य आन्त्रिकज्वर, उपदंश, उदर, कुष्ठ, कॉलरा, गर्भिणीरोग, बालरोग, झटके, जीर्णज्वर, नेत्ररोग, मस्तिष्कावरणदाह, रक्तप्रदर, श्वेतप्रदर, क्षय, मधुमेह इत्यादि नित्य व क्वचिदुपलब्ध अशा उभयविध विकाराची कारणपरपरा, निदानपद्धति, चिकित्सा-दिशा येथे पाहावयास मिळतील ज्याची कारणे सापडत नाहीत, निदानहि होत नाही अशा रुग्णामध्ये कृमि-चिकित्सेने कसा सुदर उपशय होतो याचीहि उदाहरणे यात आहेत लेखक निरनिराळे असल्याकारणाने भाषा, भिन्नभिन्न विषय-रचनापद्धतीबरोबरच विचारवैविध्यहि सापडणे अशा ग्रथात सहज शक्य असते त्यानेहि ग्रंथाच्या उपयुक्ततेत भरच पडते

## औषधिदान-काल-विचार

औषधि देत असता इतर महत्त्वाच्या गोष्टीबरोबरच ओषधिकालासहि महत्त्व देणे कसे अवश्य आहे हेंहि यात बऱ्याच ठिकाणी उद्धृत केलेले आढळेल

## आवृतकल्पना व बस्तिचिकित्सा

आवृतावद्दलच्या कल्पना अनावृत करण्याकरिताहि काही लेख उपयोगी पडतील बस्ति चिकित्सा की, ज्याच्याबद्दल " कृत्स्ना चिकित्साऽपि च बस्तिरेके ।" अशा प्रकारचा

अर्थवाद आहे तो बस्ति एक एक वेळ देऊनहि कसे सुदर कार्य घडवून आणितो याचेहि अन्यतर काही ठिकाणी मिळेल. धातुसाराची कल्पना चिकित्सा करिताना कशी उपयोगी पडते याचीहि दिशा यांत आहेच

## मानसिक रोग–चिकित्सा

या पुस्तकाचा एवढाच विशेष नाही, तर मानसिक विकारातहि ज्या प्रकारचे कायिक व मानसिक उपचार पाहिजेत त्याचीहि कल्पना आणून देणारी दिशा त्या त्या विकाराच्या चिकित्सा वाचून मिळूं शकेल. वैद्याप्रमाणेच काही डॉक्टरांचेहि लेख यात आहेत यातील चिकित्सित रुग्ण अगदी लहान मुलापासून अत्यंत वृद्धापर्यंत, तसेच स्त्री-पुरुष, गरीब-श्रीमत, सुशिक्षित-अशिक्षित, शहरवासी-खेड्यांतील वगैरे सर्व प्रकारचे आहेत एकंदरीत सग्रहग्रथाचें वैशिष्ट्य जे वैविध्य ते यात पुरेपूर असल्यामुळे ग्रथ वाचकाच्या समाधानाचा विषय होईल अशी खात्री वाटते. एकदोन अपवाद सोडल्यास यात आलेल्या रुग्णचिकित्सा साध्य रुग्णाबद्दलच्या आहेत परतु जे जे रुग्ण पचत्व पावले त्याच्याबद्दलचाहि विचार यात यावयास पाहिजे कारण तोहि जास्त मार्गदर्शक होऊं शकेल परंतु भिन्न-भिन्न लेखकाकडून त्या बाबतीचे अनुभव मधूनमधून नि सकोचपणे आले, तर पुढच्या आवृत्तीत अगर निराळ्या ग्रथात त्याचाहि समावेश करता येईल

पुस्तकाची एकंदर पृष्ठे २७० असून त्यात एकूण २२९ रुग्णचिकित्सा आहेत' युद्धकालीन कागद वगैरे साहित्याची महर्गता, विषयमहत्त्व व अशा प्रकारचा ग्रंथ विकत घेणाराची मर्यादित संख्या लक्षात घेता पुस्तकाची किमतहि योग्य अशीच म्हणजे रुपये तीन ठेवण्यात आली आहे.

## गुरुवर्यांचे स्वानुभवाचे बोल

गुरुवर्य वे प गंगाधरशास्त्री गुणे यानीं आतापर्यंतचे स्वानुभवाचे बोल औषधिगुणधर्मशास्त्राची पुस्तके लिहून ज्ञानपिपासूस ऐकविले. ते एका पद्धतीचें कार्य झाले परतु प्रत्यक्ष एखाद्या विकाराने पीडित रुग्ण घेऊन त्यावर त्या सिद्धौषधि कशा कार्य करतात हे या पुस्तकात सोदाहरण स्पष्ट केलें आहे भूमितिप्रमेयावरील प्रतिज्ञा व तिचा सान्वय पसारा याचा जेवढा सजीव संबध, तेवढाच औषधिगुणधर्मशास्त्रातील औषधीच्या गुणाचें वर्णन व निवडक रुग्णचिकित्सेतील गुरुवर्यांनी गुंफिलेले महत्त्वाचे प्रात्यक्षिक अनुभव यामध्यें आहेत असें म्हटल्यावाचून राहवत नाहीं

## आयुर्वेद महाविद्यालयांतील शिक्षणप्रणाली

निवडक रुग्णचिकित्सा लिहिणाऱ्या लेखकापैकी पुष्कळसे लेखक आयुर्वेद महाविद्यालय, अहमदनगर या सस्थेचे पदवीधर आहेत त्यावरून साहजिकच सस्थेच्या शिक्षणप्रणालीविषयी कल्पना येऊं शकते निदान, विद्यालयाचा चार वर्षांचा अभ्यासक्रम घेतलेला विद्यार्थी विशिष्ट दृष्टीने आयुर्वेदाचा शास्त्रीय दृष्टिकोण मिळवूं शकतो हेंहि यावरून अनुमित होतें

## आयुर्वेद विद्यालय संस्था चिकित्सा विभाग

विद्यालय संस्थेच्या चिकित्सा-मदिरात सशोधनपूर्वक केलेल्या पुष्कळशा रुग्णचिकित्साहि यात आल्या आहेत त्या त्या वेळच्या चिकित्साविभागाकडील काम करणाऱ्या तज्ज्ञानी दिलेल्या रुग्णचिकित्सा ह्या चिकित्साविभागाकडीलच प्राधान्यानें आहेत

आयुर्वेद-सेवा-सघानें चालविलेल्या आयुर्वेदाश्रम फार्मसी लि मधील शुद्ध व शास्त्रोक्त औषधीच या चिकित्सा विभागाकडील रुग्णचिकित्सेकरिता उपयोजिल्या गेल्या होत्या उत्तम औषधि व योग्य योजक असल्यावर रुग्णावर इष्ट ते परिणाम घडणारच वरील रुग्णचिकित्सा निवडक अतएव उपलक्षणात्मक आहेत

## आभार प्रदर्शन

या ग्रंथात गुरुवर्य वै प गगाधरशास्त्री गुणे याच्या रुग्णचिकित्सा सख्येनें अधिक असून, त्याच्या खालोखाल आयुर्वेद विद्यालय सस्थेच्या चिकित्सा विभागाकडे काम करणाऱ्या वैद्याच्या आहेत शिवाय इतरहि अनेक तज्ज्ञानी यात हातभार लावलाच आहे त्या सर्वाचा संघ अत्यत आभारी आहे त्याचप्रमाणें माझे सहकारी बंधु श्री बिंदुमाधव पडित कीं, ज्यानीं कल्पना व प्रत्यक्ष कृति याच्यामधील महदंतर नाहीसें करून कल्पनाना अल्पावधीत कृतीत उतरविलें त्याचाहि संघ आभारी आहे

निवडक रुग्णचिकित्साच्या सन्मान्य लेखकांची यादी ग्रथाचे शेवटी दिली आहे त्यानी लिहिलेल्या रुग्णचिकित्साचे क्रमाक त्याच्या नावासमोर देण्यात आले आहेत त्याजबरोबर एखाद्या रोगासंबंधी सर्व माहिती चटकन् पाहता यावी म्हणून रोगसूचिहि दिली आहे त्यातील अंकहि निवडक रुग्णचिकित्साचेच आहेत.

हा ग्रथ सग्रहात्मक असला तरी ग्रंथजातीला करावा लागणारा सर्व खटाटोप यासहि करावा लागलाच त्यात ज्याचें म्हणून साहाय्य झालें त्याचे व विशेषत मोहन मुद्रा-मदिराचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत ग्रथ घाईने प्रसिद्ध होत असल्यामुळें त्यात काहीं मुद्रणदोष राहिले आहेत त्यावद्दल वाचकानीं क्षमा करावी

शेवटीं परतु महत्त्वाचें असें कीं, जे जे आयुर्वेदप्रेमी वाचक ह्या ग्रंथाचे मनोमय स्वागत करून त्यातील सारभाग घेऊन उपर्युक्त सुधारणा करून सघास मार्गदर्शन करतील त्या सर्वाच्या आभाराशिवाय ह्या “दोन शब्दास” पूर्णता कशी येईल ?

मिति
अक्षय्य तृतीया शके १८६३
( २९ एप्रिल १९४१ )

भवदीय
वैद्य विष्णु महादेव गोगटे
मंत्री
आयुर्वेद-सेवा-सघ, अहमदनगर

आयुर्वेदाच्या उच्च शिक्षणाची सरकारमान्य उत्कृष्ट संस्था



आयुर्वेद महाविद्यालय, अहमदनगर

# निवडक रुग्णचिकित्सा

## (१) पोटदुखी

सन १९१७च्या मार्चमध्ये मला आमांश झाला त्या दुखण्याने मी २ महिने आजारी होतो दुखणें गेल्यावर मला माझ्या पोटात डाव्या बाजूस बेंबीखाली एक मुटकुळाएवढी गाठ आहे असें वाटे व पुढें त्याच ठिकाणी हे हल्लींचे दुखणें सुरू झाले दिवसभर काम करावें व सध्याकाळी ५-६ चे सुमारास पोटातील दुखणे विकोपास जावें असा नित्यक्रम सुरू होता याप्रयोगाने मला प्रथम रात्रींचें जेवण बंद करावें लागलें नंतर २-४ दिवस लंघन केलें म्हणजे पोटातील दुखणे बंद होई परंतु परत जेवलें असता पोट दुखे

शेवटी १९२१ जानेवारीचे सुरुवातीस मी मुंबई येथील प्रख्यात डॉक्टरास पोट दाखविलें तेव्हा त्यानी ते ( जठर ) " डायलेट " झालें असा अभिप्राय दिला

१९२० डिसेंबर व १९२१ जानेवारीमध्ये पोटदुखीमुळे मी जेवण अजीबात बंद केलें होते लिंबाचें सरबत, फळे व लाह्याचें पीठ खाऊन मीं हे दोन महिने काढले ता २१।१।२१ ते ३०।१।२१ मी आपणाकडे हवापालट करण्याकरिता प्रथम आलो होतो त्या वेळी येथे आल्यानतर २-३ दिवसातच मी जेवावयास लागलो. जेवल्यानंतर पोटात दुखत असे. परंतु आपण दिलेल्या औषधामुळे ते दुखणें थांबत असे वरील दहा दिवसाच्या हवा पालटण्याने माझे पुढील ५-६ महिने पोटदुखीखेरीज गेले परंतु नतर तें पूर्ववत् सुरू झालेंच व म्हणून ता १३।१२।२२ ते २३।१२।२२ या दरम्यान रजा घेऊन मी परत आपणाकडे हवापालट करण्याकरिता दुसऱ्या खेपेस आलो

१९२४ मार्चमध्यें तिसऱ्या खेपेस मी परत नगरास १० दिवसाचे रजेनें आलो होतो वरील दोन्ही वेळेप्रमाणेंच पोटदुखी सुरू होती येथे आल्यावर ती साधारणपणे बरी व्हावी व नतर पूर्वपदावर यावी असा क्रम दरसाल चालू होता

ता १।१०।२४ रोजी प्रथम ताप येऊ लागला डॉक्टराचे औषध सुरू केलें व त्यांनी मलेरियावर उपचार केले दोन वेळ क्विनाईन इन्जेक्शन केलें तरी ताप हटत नव्हता, म्हणून ता १७।१।२५ रोजीं डॉक्टरास घरी आणवून प्रकृति दाखविली त्याहि वेळी त्यानी जठर " डायलेट " झालें आहे असाच अभिप्राय दिला व त्याचेच सल्ल्यावरून २०।१।२५ व २३।१।२५ रोजी एक्स-रे फोटो काढविले. ते आपणास

दाखविलेच आहेत लघ्वीची आधुनिक परीक्षा करून घेतली* ता १।१०।२४ पासून मी बहुतेक दुधावरच आहे मध्ये ३-४ वेळा जेवणाचा प्रयत्न करून पाहिला. परंतु जेवले असता पोट दुखूं लागावे, ताप यावा व अन्न ओकून टाकावे तेंव्हाच बरे वाटावे असा अनुभव आला ता २५।१।२५ रोजी मी येथे चौथ्या वेळी आलो त्या वेळी माझें दुखणे खालीलप्रमाणे होते

(१) पोटात दुखणे: विशेषत. जेवल्यानंतर (२) ओकारी येणे ओकल्यानतर पोट दुखणे थावत असे (३) सतत ताप येणे ताप १०३ डिग्री असे (४) प्लीहा वाढलेली होती. बहुतेक बेंबीपर्यंत ती वाढलेली होती ती आपण पाहिलेलीच आहे (५) अन्न व दूधहि न पचणे, दूध प्यायले असता त्याचे पोटात दही बनें व ते ओकून टाकणे भाग पडे म्हणून मी "बेजर्स फुड" घेत असे (६) एनिमाखेरीज शौचास बिलकूल न होणे. यापूर्वी २।, २॥ वर्षे मी रोज सतत एनिमा घेत असे (७) सर्वसाधारण अशक्तता वाटणे. (८) लघ्वी लाल व थोडथोडी होई व तिच्यात गोळे गोळे पडत (९) ता २३।१।२५ रोजी माझें वजन ९५ पौंड होतें

येथील औषध सुरू केल्यापासून (१) पोटात दुखणे थांबले आहे (२) ओकारी बंद आहे (३) औषधे सुरु केल्यानतर ६ दिवसात ताप निघाला. ता २०।२।२५ ते २।३।२५ चे दरम्यान माझी दाढ दुखत होती, तेंव्हा मात्र मला परत १०१ डिग्रीपर्यंत ताप झाला तसेच मार्च ता ८, ९ व १० रोजी श्रमामुळे १०१ डिग्रीपर्यंत ताप आला होता (४) प्लीहा बहुतेक बसली आहे (५) दूध पचूं लागले आहे अन्न खाऊन बघितलेले नाही (६) एनिमाखेरीज शौचास होऊं लागले आहे (७) अशक्तपणा अजून कायम आहे (८) लघ्वी पातळ व पिवळसर रंगाची असते (९) सध्या माझें वजन १०८ पौंड आहे माझे वजन सर्वसाधारणपणे ११०-११२ पौंड असतें (१०) चिकित्सेनतर एक्स-रे फोटो काढून पाहता मूत्रवहस्रोतसातील ( ureter ) खडा थोडा खाली सरकल्यासारखा व आकारानेहि बराच कमी दिसला

सदरच्या रोग्यास चंद्रप्रभागुटी हे सिद्धौषध आणि कुटकी, दारूहळद, गुळवेल, गोखरू व आवळकाठी ह्या मूत्रल व ज्वरघ्न वनस्पती याचा काढा ही औषधे मुख्यत. दिली

---

* मूत्रपरीक्षणाचा अहवाल-लघ्वी पिवळी, प्रतिक्रिया अम्ल (acid) विशिष्ट-गुरुत्व १०१० अल्ब्युमेन आहे Amorphous urates आहेत Epethelial cells आहेत Pus (पू)cells पुष्कळच आहेत

# ( २ ) सर्वांगशोफ ( सूज )

रोगनिदान---तीन डॉक्टर व पांच वैद्य या सर्वांनी एक मताने माझा रोग ब्राइट्स डिसीज, शोथोदर किंवा नाळगुद असल्याबद्दल परीक्षा केली आहे. रोगाचे प्रथम चिन्ह घोट्यावर सूज दिसणे हे गेल्या श्रावणमासी (५ आगस्ट, १९२४) आढळले

पूर्वेतिहास वगैरे---वरील दिवसापूर्वी मला क्षुधामांद्याचा विकार सव्वा वर्ष भासत होता क्षुधामांद्य होण्याला कारण सिमला ह्या थंड हवेच्या शहरीं राहणे, कारकुनीच्या वेठ्या कामाच्या नोकरीत दोन तीन माणसांचे काम करावयाचे एकट्यावर पडणे व त्यामुळे रात्री आठ वाजेपर्यंत काम करावे लागून डोक्याला शीण, त्यामुळे फिरण्यास जाता न येणे रात्रीं झोप १२ ते ३ पर्यंत बहुतेक न लागणे, सकाळी ६-७॥ चे दरम्यान ५ मैल फिरणे व त्यामुळे थंडीचा प्रवेश शरीरात होणे हे असावे याशिवाय ताप, आंतमार वगैरे विकार सिमल्याच्या ७ वर्षांच्या राहण्याच्या अवधीत झालेले नाहीत चहा वगैरे अग्निमांद्य करणारी, नाटक, सिनेमा तमाशे बाहेरख्याली वगैरे व्यसने किंवा जागरणे करण्याच्या सवयी आजन्मात नाहीत फक्त दोन वेळा भात, भाजी, पोळी-भाकरी वगैरे सात्विक जेवण जेवीत असे फराळ, दूध नाही १९०८ ते १९१३ सालाचे दरम्यान आनुवंशिक श्वासविकाराने आजारी होतो नंतर नाही १९२३ साली माझे वजन २४० पौंड, १९२४ मध्यें २०० पौंड होते अंगात थोडा स्थूलपणा [मेद] होता सहज ७ मैल पायी फिरत असे उत्तर व्यायाम श्वासविकारानंतर बंद आहे वय, ३७ वर्षे

रुग्णावस्थेतील चिकित्सा वगैरे --सिमला शहरी आर्य व युनानी वैद्यक जाणणाऱ्या वैद्याने पुनर्नवादि काढा व प्रत्यही दोन वेळ एरंडेल ही औषधें मुख्यत दिली २३ दिवस केवळ सकोयथी कढवून केलेल्या पाण्यावर होतो, अन्न नाही द्राक्षे, मनुका, डाळिंब हीं फळे खात असे सिव्हिल सर्जनने मारक, मूत्रल व हृदयक्रिया जोराने चालणारीं औषधें दिली ती आठ-दहा दिवस घेतली व मुंबईस आलो ( २८ ऑगस्ट, १९२४ ) नाळगुद मुसळाने मोडविले. झाडपाल्याचे औषध घेतले सूज १३ सप्टेंबरला पहिल्याने उतरली फक्त पायाच्या दोन्ही नळ्यांवरील हाडावर, विशेषत पावलाजवळील भागावर शिल्लक होती वजन १४७ पौंड झाले वैद्यानी वानरवाशिंग, कुळीथ, एक बिब्बा याचा काढा शक्तिवृद्धीकरिता सांगितला व मीं तो घेतला २० आक्टोबर रोजी पुन सूज वाढू लागली चंद्रप्रभा व योगराज गुग्गुळ चार दिवस कोंकणात परशुराम क्षेत्रीं घेतला लघ्वी वाढली नाही सूज कमी झाली नाहीं ३२ दिवस डॉक्टरांचे, मूत्रल औषधें ज्यात प्रमुख्याने होतीं असे प्रिस्क्रिप्शन घेतले इस्पितळात सहा दिवस राहून विजेच्या उष्णतेच्या ( electric bath ) साहाय्याने घाम काढला पण उपयोग झाला नाहीं पथ्य दूध, विशेषत दुधांतील चहा, कॉफी, ताक हे होते मीठ वर्ज्य ताम्र वगैरे असलेली नमेंच थंड परंतु मूत्रल औषधें दोन वैद्यांनी एकमेकाच्या विचाराने दिली उपळसरीच चहा तीन वेळा प्रत्यही घेत असे २३ डिसेंबर १९२४ ला सूज उतरली पथ्य ताक,

मधून मधून हिंग, जिरे, कोथिंबीर, काळी मिर्चे लावून. यावर होतो १० जानेवारीपासून भाताच्या लाह्या व ताकावर होतो. लघ्वीला ९० औंसपर्यंत ( कमालीचे ) होऊन सूज उतरली. पुढें लघ्वी कमी होत होत २७ जानेवारीला २० औंस, नंतर १८, १०, ७ औसांवर आली. पथ्य व औषधें मुख्य होती १ फेब्रुवारी १९२५ ला वजन १२९ पौंडावर आले सूज सर्वांगावर वाढली युनानी औषध १३ दिवस घेतलें पुनः वैद्याचें ८ दिवस औषध घेतलें उपयोग होईना. २० फेब्रुवारीपासून वैद्यानी ताम्र भस्म व शंखभस्म, पाचक काढा व शौचास दोन वेळाच होईल अशी योजना केली पथ्य गाईचे दूध व दोन वेळां मुळयाची, मेथ्या घालून तुपाची फोडणी दिलेली, भाजी ४-६ तोळे खाण्यास सांगितली ता २३ पासून लघ्वीला वाढूं लागले १५४ औंसपर्यंत कमालीची लघ्वी वाढून, २७ फेब्रुवारीला सर्वांगावरील सूज नाहीशी झाली. हाडे व त्वचा फक्त शिल्लक राहिली २८ फेब्रुवारी रोजी वजन ९५ पौंड उरलें १५ मार्चपर्यंत २॥ ते ३ शेर (मुंबईचे) दूध पचूं लागलें वजन १०० पौंड झालें दोन वेळा मुळयाची भाजी, बाकी दूध, पाणी पिववेल इतके कढत. ताक वर्ज्य ३१ मार्चपर्यंत ४-४॥ शेर दूध पचूं लागलें वजन ११९ पौंड झालें यानंतर तीन दिवसातून एक वेळ भात खाऊ लागलो. ९ एप्रिलपर्यंत १ मैलभर हिंडूं लागलो व नंतर रोज दिवसातून एक वेळ पोटभर भात, बऱ्याच भाज्या खाऊं लागलो. दूध २-२॥ शेर वर्ज्य पदार्थ पिष्ट, अळू, ककार प्रारंभी असलेले काकडी, कलिंगड वगैरे

५ मे पर्यंत सर्व यथास्थित चाललें. लघ्वी प्रत्यही ४०-४५ औंसापर्यंत ५ मे ला सकाळी डोळयाच्या पुटावर व पायाच्या नळयावर सूज दिसूं लागली पुन नुसतें दूध व भाजी यावर १० जून पर्यंत राहिलो. डोळयावरील सूज जास्त होऊ लागली त्यामुळे पुन: कोकणातून मुंबईस आलो वैद्य व डॉक्टर यांनी निरनिराळया वेळी मला तपासलें सर्व एकमताने म्हणत की, शोथोदराचा विकार शिल्लक नाही मात्र पुन सर्वांगावर सूज का आली किंवा का वाढते हे ध्यानात येत नाही कोणी तर्क करीत की, प्रत्यही एक पुडी ताम्र व शंख या भस्माची विडयाच्या पानाच्या रसात घेतल्यामुळे त्याच्या फाजील सेवनाने किंवा रुधिराभिसरणक्रिया मंद झाल्यामुळें सूज वाढली मौक्तिक देऊन पाहिले. वैद्यानी प्रमेह ( मधुमेह नव्हे तर कफविकृत होऊन धातुदोष ) उत्पन्न झाल्याची शंका घेऊन उपचार केले काकडी खरबुजाच्या बिया, आर्यवैद्यकामधील मूत्रल औषधि, रसरत्नाकरातील " आरोग्यवर्धिनी " मूत्रल गुटिका, पुनर्नवादि काढा, पाषाणभेद, गोखरू, आघाडापंचांगांचा काढा वगैरे मूत्रल औषधाची शिकस्त केली लघ्वी १०-१२ औसांवर आली आहे वृषण—लिंगावर सूज पराकाष्ठेची वाढून चालण्यास किंवा मूत्र होण्यासहि अडचण [ वक्रतेमुळे ] भासू लागली आहे पोटावर मांडयावर, पायावर, पावलावर, छातीच्या मध्यभागी सूज वाढलेली आहे डोळयावर, तशीच कुशीस निजलें किंवा टेकले तर गालावर, मानेवर येणारी, हातांवर असणारी सूज जी २॥ महिनेपर्यंत टिकून राहिली आहे, ती कमी होत नाही मला जलोदराची

भावना झालेली नाही. मूत्र तपासून नमून मूत्र रक्तात मिळून मुजेचे थर मांसाखाली जमत असल्याची वैद्य परीक्षा करितात. झोप रात्री १० ते सकाळी ६-७ पर्यंत चांगली लागते. ओकारी वाटत असे ती वाटत नाही. १३ जूनला १२३ पौंड वजन होते. भूक त्या दिवसापर्यंत चागली लागे. आता बरीच मंद झाली आहे. पथ्य सकाळी १०॥–११ ला थोडा भात किंवा मुगाची डाळ घालून खिचडी करून भाज्यांबरोबर खातो. १-½ शेर दूध, मैथवर्मीठ पहिल्यापासूनच खातो. मुजेमुळे भार केव्हाच वाटत नाही. अशक्तता व हल्ली वृषणवृद्धि ह्याच चालण्यास प्रतिबंध करितात. माझी जन्मराशि कन्या असून शनीची साडेसाती चालू आहे. २३ नोव्हेंबरपर्यंत साडेसाती संपत नाही.

ताप्यादिलोह १ गुंज + चंद्रप्रभा १ गुंज + मूत्ररेचक (बकुलबीज) ८ गुंजा + उन्हाळ्याचे औषध २ गुंजा, याच्या रोज २ पुड्या सकाळी, रात्री पुनर्नवादिकषाया-बरोबर दिल्या. या स्वणास ह्या योजनेने आराम वाटला.

---

## (३) अस्थिमार्दवता

बाई, वय सुमारे २५ वर्षे. गुजराथी. लग्न झालेले. जैन. अगदी दाट वस्तीत घर. ह्या बाईंची अस्थिमार्दवता, विशेषत *जघनास्थिमार्दवता फार होती. कंबर दुखणे पडूनच असताहि ह्या कुशीवरून त्या कुशीवर होताना भयंकर त्रास. सर्व हाडे, विशेषत पाठीचे मणके दुखणे. जत्रू व अग्रकास्थि† याच्याहि सांध्याच्या ठिकाणी लहान लहान टेंगळे आल्याप्रमाणे असून वेदना होत राहणे. मानेच्या मणक्यातसुद्धा वेदना. शौचास स्निग्ध विरेचन अगर बस्ति दिल्याशिवाय न होणे. यकृताच्या जवळ दुखणे. खाताना, गिळताना त्रास होणे. सर्व कोष्ठभर एक प्रकारची वेदना. मूत्रास जळजळ व मूत्र साफ न होणे. मूत्रपरीक्षणात मूत्रौज (albumin) व पू जात असल्याचे आढळून आले. पूर्वी प्रतारास परमा झाल्याचे आढळले. बाईस मधून मधून प्रदराचा आजारहि पुष्कळ होत असे. लघ्वीची तक्रार फार दिवसांची होती. मधून मधून ज्वर १०२ पर्यंत येत असे. सकाळी ज्वरोष्मा अगदी बेतावर (९६ ४) असे.

बाई ऋतुस्नात झाल्यापासून पुढे एक वर्षभर प्रकृति ठीक होती. परंतु पुढे पुढे महिन्याच्या महिन्यास रजोदर्शन न होता २-२ महिने मध्यंतरी रजोदर्शनाशिवाय जाऊ लागले. असा क्रम सरासरी ४-५ वर्षे होता. पुढे पुढे तर ५-५ महिने रजोदर्शन होत नसे. परंतु कंबर दुखण्याचा आजार सुरू झाल्यापासून थोडे लवकर लवकर रजोदर्शन होत असे. पूयप्रमेहाचा (परमा) संसर्ग कसा व कधी झाला हे नक्की सांगता

---

* कंबरेची हाडे (hip bones) † छातीच्या मध्यभागी असलेले हाड (Sternum)

आले नाहीं, तरी पण उपशय व चिकित्सा ज्या अनुरोधें केली, त्यावरून बराच जुना संसर्ग असावा असे आढळले

औषध योजना —

(१) **सुवर्णराजवगेश्वर ½ गु** १ पुडी सकाळी तुपात

(२) **सुवर्णघटित लोकनाथ ½ गु. + मृगशृंगभस्म १ गु. + आमलकीचूर्ण २ गु** या मिश्रणाच्या २ पुड्या दुपारी व रात्री पुढील पातळ औषधांत

पातळ औषध.—

(३) **मंजिष्ठाकल्प ½ तो + गोक्षुरकल्प ½ तो + शेफालीकल्प ½ तो + शुद्धोदक** ५ तो या मिश्रणाचे सारखे दोन भाग यात वरील पुड्या मिश्र करून दुपारी व रात्री घेणे

याप्रमाणें औषधयोजना चालू असताच मध्यतरी वेदना व घबराट अधिकच होऊ लागली आणि लघ्वीस आग अधिक व प्रमाण थोडें होऊ लागलें म्हणून खालील चाटण योजिलें

(४) **पारसीकयवानी १ गु + चंद्रकलारस ¼ गु + सुवर्णमाक्षिकभस्म ¼ गु + उन्हाळ्याचे औषध १ गु = १ पुडी मोरावळ्याच्या पाकात** वारवार चाटण

ह्या औषधामुळे घबराट कमी झाली परंतु लघ्वीचे प्रमाण वाढलें नाही व जळजळहि कमी झाली नाही म्हणून वरील चाटणात—

मूत्ररेचक (बकुळीच्या बियातील मगज) १ गु + वंगभस्म ½ गु याची योजना केली याने इष्टकार्य अधिक चागले होऊं लागलें परंतु लोकनाथ अधिक कडक पडूं लागला म्हणून मग खालीलप्रमाणे औषध योजिलें

(१) **सुवर्णराजवगेश्वर १/१६ गु + उन्हाळ्याचे औषध १ गु**, १ पुडी सकाळी तुपात

(२) **मूत्ररेचक २ गु + अकीकभस्म १ गु + आमलकी २ गु**, २ पुड्या दुपारी **व रात्री मोरावळ्याच्या पाकात**

ह्या औषधाची योजना ता ५।७।२६ रोजी केली तेव्हापासून तें ८।९।२७ पर्यंत हच औषध सुरू होते आणि ह्या योजनेनें रोग्याच्या प्रकृतीत अत्यत आश्चर्यकारक फरक पडला ह्या बाई आता आपल्या इच्छेने सर्व कामे करतात, हिंडतात फिरतात व सर्व व्यवहार करतात

---

## (४) ज्वर व कास (क्षय, T. B)

रोगी, वय ३५ ब्राह्मण नेहमी मोटारीचे प्रवासी या गृहस्थाना ज्वर व कास एकदमच सुरू झाला नतर उपचारार्थ ते अनेक ठिकाणी गेले, त्यात त्याच्या

छातीचे ' क्ष " किरणानी छायाचित्र घेतले छायाचित्रावरून व इतर लक्षणावरून ' क्षय " रोग हे निदान निश्चित झाले त्यावर खालीलप्रमाणे औषधयोजना केली —

(१) सुवर्णभस्म १/१०० गु + अभ्रक सहस्रपुटी १/१० गु + प्रवाळभस्म २ गु + गुळवेलसत्व ४ गु , २ पुड्या सकाळी व रात्री गाईचे दूध व खडीसाखरेत खोकल्याचे प्रमाण अधिक वाटल्यामुळे नतर यातच मृगशृंगभस्म १/२ गु घातले

(२) वगभस्म १ गु + शुद्धशिलाजतु १ गु , १ पुडी दुपारी मोरावळयाच्या पाकात "ओज "क्षयाची लक्षणे अधिकच दिसून येऊ लागल्याने यातच वशलोचन १ गु + सुवर्णमाक्षिक १/२ गु ही औषधे मिश्र करून दुपारी ही पुडी दिली या योजनेने रुग्णाची स्थिति पुष्कळच सुधारली आहे

---

## ( ५ ) प्लूरसी ( फुप्फुसावरणशोथ )

रोगी वय २१ मागच्या वर्षी पूर्ण वाढ झालेला प्लुरसी ( कुक्षुदर ) झाला होता ती अलोपथिक उपचारानी तात्पुरती बरी झाली परतु चार महिन्यानी पुन्हा दुसरी बाजू बिघडली त्या बाजूत साचलेले पाणी नलिकेने काढून टाकण्याचाहि उपचार केला व इतरहि अलोपथिक उपचार केले परतु उपयोग झाला नाही नंतर आयुर्वेदीय उपचार सुरू केले विशेषत पचसूत दिला नतर मृगशृंगभस्महि दिले. त्याने विकार बेतावर आला फुप्फुसपरीक्षणात अत शोथहि नाहीसा झाल्याचे दिसले

---

## ( ६ ) वातरक्तज कोथ

बाई, वय ३०, जात लिंगायत वाणी ह्या बाईच्या दातातून बरेच दिवसापासून पू येत होता थोडासा दतपुप्पुटाचाहि विकार होता फिरंगोपदंशाचाहि उपद्रव एकवार झालेला होता बाईस चिकित्साक्रम सुरू केला त्या दिवसाची स्थिति —

पाय घोट्यापासून सुजलेले, बोटे व आगठा पायाचा अतिशय सुजलेला सूज नळनळीत तावडी व काळसर सुजेस स्पर्शासहनत्व फार भयंकर आग, ती इतकी की बाई ढसटसा रडत होती सर्व बोटाना व पायास सारखा घाम पायाची स्थिति अत्यत केविलवाणी बाईस उचलून दवाखान्यात आणली तोडाच्या बाजवर, गालावर सूज

डोळे लाल व चिपाडलेले. ज्वर १०१·४° पर्यंत सकाळी व १०३° पर्यंत सायंकाळी तगमग फार झोप अगदी नाहीशी झालेली सदरच्या रोग्यास एकंदर सर्व लक्षणावरून वातरक्तज पादांगुष्ठ कोथ असावा असे निदान करून, प्रथमतः—

(१) ताप्यादिलोह ½ गु + उन्हाळचाचे औषध २ गु, २ पुड्या सकाळी व रात्री आमलकी लेहांत; (२) सारिवासव १ तोळा + शुद्धोदक २ तोळे, ३ भाग दुपारी १-१ भाग ३-३ तासानी, व (३) सुजेवर लावण्याकरिता दशांगलेप दुधात उगाळून लावण्यास दिला हे औषध सुमारे आठ दिवसपर्यंत दिले विशेष फरक दिसला नाही नतर (१) अनताचूर्ण १ गु. + शुद्ध शिलाजतु ¼ गु + मंजिष्ठाचूर्ण १ गु.+ मूत्ररेचक (वकुलबीज) १ गु + उन्हाळचाचे औषध २ गु पुड्या २ सकाळीरात्री आमलकी लेहात. (२) मजिष्ठाकल्प १ तोळा + गोक्षुरकल्प ६ मासे + शुद्धोदक ५ तोळे, २ भाग दिवसातून २ वेळा; (३) विजयामृत ३ मासे रात्री गरम पाण्यात व (४) सहस्रधौतघृत पायास लावण्यास दिलं.

ह्या सर्व योजनेनें बाईच्या पायाची आग कमी झाली परंतु सुजेत फरक पडेना म्हणून.—
(१) अनता २ गु + शुद्ध शिलाजतु ¼ गु + मंजिष्ठा चूर्ण १ गु + उन्हाळचाचें औषध १ गु, पुड्या २ आमलकी लेहात. (२) मजिष्ठाकल्प २ तोळे + शुद्धोदक ५ तोळे, ४ भाग दर तीन तासानी; रात्री दुप्पट पाण्यावरोबर कुमारीरस १ तोळा (३) सहस्रधौतघृत पायास लावण्याकरिता

या योजनेने पायाची आग अगदी नाहीशी झाली आहे बोटाची सूज, नळनळी, तावटेपणा व काळसरपणा अजिबात नष्ट झाला आहे. ज्वर बिलकूल नाही. तोंडावरची सूज अजिबात नष्ट झाली आहे बाई थोडथोडी चालू शकते. दाताील पू कमी झाला आहे

ह्या रोग्यात विशेषतः शिलाजतूचा उपयोग अधिक झाला शिलाजतूनें रक्तस्थ दोषांचे निर्हरण झाले अनता, मंजिष्ठा ह्याचा उपयोग शिलाजतूस उपकारक व योगवाही झाला कुमारीरसाने शौचास उत्तम व साफ होते आणि यकृतातील पित्तकार्य नियमित व उत्कृष्ट असे होते

---

## (७) आंत्रविष व सूक्ष्म कृमि

रोगी बालक. वय वर्षे ५. ब्राह्मण श्रीमत घराण्यातील त्याच्या वयाच्या दुसऱ्या वर्षापासून जुलाब होण्यास सुरवात झाली. कधी कधी मध्यंतरी आंवहि पडे. परंतु

आंत्रवरोधक किंवा अन्यथाहि रक्त फारसे पडले नाही. म्हणून मधून मधून ज्वर येतच असे. अशी स्थिति सुमारे वर्षभर राहिली. त्यानंतर किंचित् बरे वाटले. पुढे सहा महिन्यांनी पुन्हा जुलाब सुरू झाले. काही पदार्थ खाण्याचा अवकाश की, जुलाब व्हावयाचे आणि अशा प्रकारे जुलाब होऊन होऊन कृशता खूपच आली. मुलाचे वजन अगदी कमी होऊन अस्थिचर्म राहिले. दिवसातून १० ते १५ वेळा पातळ पातरे जुलाब व त्यात कच्चा कच्चा मुरड्याच्या पाकळ्यासुद्धा पडावयाच्या. प्रथमतः त्याला

(१) महालक्ष्मीविलास १/१६ गु. + शर्करा २ गुंजा सकाळी डाळिंबावलेहांत;
(२) सुवर्णपर्पटी १/१० गु. + शर्करा २ गु. २ पुड्या दुपारी व रात्री दुधाबरोबर

याप्रमाणे सर्वसाधारण पक्वातिसाराचिकित्सा केली व काय औषधे दिली. परंतु चिकित्साक्रमाचा दिसावा तितका फायदा दिसला नाही. जुलाब कमी होत परंतु कृशता कमी होईना म्हणून स्थानिक मलाची आधुनिकरीत्या परीक्षा करविली. त्यात येणेप्रमाणे सूक्ष्माणु सापडले. मलपरीक्षेचा तक्ता —

मलाची रंगाव्यतिरिक्त परीक्षा—सूक्ष्मदर्शक यंत्राने —
(१) मलात अपक्व अन्नकण विशेषतः स्नेहकण होते
(२) दुसऱ्या कोणत्याहि प्रकारच्या कृमींची अंडी किंवा अमीबा सापडली नाहीत
रंगविल्यानंतर —
(३) अतिशय कोलाय जीवाणु ( B. Coli).
(४) दुसरे कोणत्याहि प्रकारचे सूक्ष्माणु सापडले नाहीत

ह्याप्रमाणे मलपरीक्षा झाल्यानंतर त्या अनुरोधें औषधातहि बदल केला —
(१) सुवर्णपर्पटी १/१० गु. + शर्करा १ गु., १ पुडी सकाळी डाळिंबपाकात,
(२) विडगारिष्ट प्रत्येक वेळी २०-२० थेंब ह्याप्रमाणे दिवसातून ४ वेळा
हा चिकित्साक्रम २१ दिवसपर्यंत चालवून पुन्हा मलपरीक्षा करविली. ह्या परीक्षणात.—
(१) कोलाय जीवाणु होते परंतु पुष्कळच कमी प्रमाणात
(२) स्नेहकणहि पुष्कळच कमी प्रमाणात

ह्याप्रमाणे वरील औषधाचा थोडासा उपयोग झाला. जुलाब पुष्कळच कमी पडले. शक्तीहि येतसे दिसूं लागले. परंतु फिकेपणा व थोडीशी सूज येऊ लागली. म्हणून याच औषधाच्या बरोबर मंडूर 1/4 गुंज + सुवर्णमाक्षिक 1/4 गुंज + प्रवाळ 1/2 गुंज, या सर्वांची मिळून एक पुडी दुपारी चार वाजता डाळिंबपाकात दिली. ही चिकित्सा सुमारें १६ दिवसपर्यंत चालवून पुन्हा मलपरीक्षण केलें. त्यात —

(१) कोलाय जीवाणु मुळीच नव्हते
(२) स्नेहकणहि अगदी कमी होते

याप्रमाणें पुष्कळच आराम वाटला. बाह्य लक्षणापैकी जुलाब होईनासे झाले. सूज अजीबात नाहीशी झाली. फिकेपणाहि गेला. शक्ति वाढूं लागली. बल व मास-

वृद्धि होऊं लागली परंतु जुलाबातून जाणारे स्नेहकण कमी होईनात म्हणून व सूज जरी कमी असली तरी ती पुन्हा उत्पन्न न व्हावी असा इलाज करण्यास साहाय्यक व्हावे म्हणून मूत्रपरीक्षण करविले त्यातः---

विशिष्टगुरुत्व---१० १०, प्रतिक्रिया---आम्ल, रंग---फिकट पिवळा, मधु---मुळीच नाही, पित---मुळीच नाही, पण मूत्रोज (Albumin) असल्याचे आढळून आले. म्हणून सुवर्णपर्पटी बंद करून बाकीची चिकित्सा सुरू ठेवली. या चिकित्सेचा परिणाम अत्यंत इष्ट झाला

जुलाब होणे अजीवात वंद होऊन, बाधीव शौचास एक वेळ होऊं लागले. सूज, फिकेपणा वगैरे नाहीसे होऊन बल व मासवृद्धि झाली ती इतकी की, रुग्ण मुळीच ओळखूं येईना

चिकित्सेत मुख्यतः आन्त्रविषनाशन सुवर्णपर्पटी व कोलयाणु सापडल्यानंतर कृमिघ्न उपाय विडगारिष्ट यावर भर देण्यात आला व त्यानेंच रुग्णास आरोग्यप्राप्ति झाली

---

# (८) जुनाट मूत्रपिंडशोफ (सर्वांगशोफ)

बाई, वय २५ वर्षे सासर ग्वाल्हेर येथे माहेर नगरजवळ ग्वाल्हेरला प्रकृतीची आशा वाटेना म्हणून तिला माहेरी पोहोचती केली बाईची परिस्थिति फारच बिघडलेली. सर्वांगास फार भयंकर सूज हातपाय अगदी जड मोगऱ्या एवढाले जाडसर झालेले यकृत चागले बेंबीपर्यंत वाढलेले हृत्स्पंद फार जोराचे मात्र हृदावरण किंवा इतर अवयव याच्यांत त्या त्या अवयवाची दुष्टि नाही तोंड तर इतके सुजलेलं की, डोळेहि उघडण्याची पचाईत मूत्र लालसर, अत्यंत थोडें, लघवी करताना आग होणे व सर्व दिवसात फार तर एक दोन वेळाच लघ्वी होणे ही लक्षणे अधिक. मूत्राघात फार जबर मूत्रात पिच्छिल मूत्रोज (Albumin) अधिक शौचास दोन दोन दिवस न होणे, घबराट निद्रानाश, श्वास, कास, हृत्स्पंद, अग्निमांद्य, पाडुता, छर्दि, ज्वर व सर्वात मोठे लक्षण सर्वांगशोफ. शोफ दाबला असता त्यात खळगे पडत असत

(१) रसायनहरितकी २ गुंजा+मूत्ररेचक (बकुलबीज) २ गुंजा+उन्हाळयाचें औषध २ गुंजा, या मिश्रणाच्या सारख्या ४ पुड्या दिवसातून चार वेळा मोरावळयात सुरू केल्यावर तिसऱ्याच दिवसापासून रोग्यास आराम वाटूं लागला रोग्यास निव्वळ दुधावर ठेवले होते एक महिन्यानंतर तपासणीत खालील फरक आढळून आले.

शोफ अजीबात नाहीसा झाला यकृताची झालेली वाढ कमी झाली जवळ जवळ

यकृत आपल्या नेहमींच्या आकारावर आलें मूत्राघात नष्ट होऊन दिवसातून पाच ते सात वेळा पुष्कळ व स्वच्छ मूत्रोजरहित मूत्र होऊ लागलें. दिवसात चार-पाच वेळा शौचशुद्धि उत्तम प्रकारें होतें ज्वर नाहीं. घबराट व हृत्स्पंद नाहींसे झाले. श्वास, कास हेहि नाहीत रोगी दवाखान्यापासून दवाखान्यात पायी चालून आला तरी कास अगर श्वास नाहीं अग्निमांद्य नष्ट झालें. पांडुता बरीच कमी झाली ओकारी नाहीं फक्त बल्मांसनिहीनत्व पुष्कळ आहे गाऊंडाउं राहिली आहेत. हेंच औषध पुढेंहि सुरू ठेवलें मात्र त्याबरोबर जीवनीय व पथ्य असा आहार दिला

दुसऱ्या महिन्याच्या तपासणीत रोगी ओळखूं येईना इतपत सुधारलेला व बलमांस-युक्त दिसला

---

# (९) रक्तार्श व सर्वांगशोफ

रोगी बाई, वय ४५, जात बोहरी ह्या रोग्यास रक्तार्शाचा बरेच दिवस म्हणजे जवळ जवळ १०-१२ वर्षे विकार होता त्यानंतर हृत्स्पंद (धडधड). हृत्स्पंदा-बरोबर दक्षिणहृत्कपाटस्थ स्नायुशिथिलता त्यायोगें सर्वांगशोफ, मूत्राघात, घबराट, श्वास, कास ही लक्षणें सुरू झाली व अर्शाचा त्रास अधिक सुरू झाला.

ह्या रोग्यात रक्तार्शामुळें रक्तनाश उत्पन्न झाला याचा परिणाम हृदयावर झाला हृत्कपाटस्थ स्नायुशैथिल्य उत्पन्न झालें आणि मग सर्वांगशोफ उत्पन्न झाला मूत्राघात वगैरे लक्षणेंसुद्धा याच कारणानें उत्पन्न झाली

औषधयोजना —रसायनहरितकी २ गुंजा + पुनर्नवाकल्प १। तोळा + हृद्यचूर्ण (डिजिटॅलिस पानें) $\frac{1}{2}$ गुंजा + उन्हाळ्याचे औषध ४ गुंजा, चार भाग दिवसातून चार वेळा

चिकित्सोपक्रम सुरू केल्यापासून चारच दिवसात रोग्यास आराम वाटूं लागला सूज उतरली मूत्राघात नाहींसा होऊन दिवसरात्र मिळून १०-१५ वेळा उत्तम मोकळें मूत्र होऊ लागलें घबराट बराच कमी झाला हृत्स्थ स्नायुशैथिल्यहि बरेंच बेतावर आलें ते अजीवात नष्ट होणें शक्यच नव्हतें आणि सर्वात विशेष आश्चर्य म्हणजे अर्शाचा त्रास कमी झाला

---

# (१०) रक्ताचा वाढलेला दाब व चक्कर

## ( High Blood Pressure )

एक गृहस्थ एज्युकेशनल डिपार्टमेंटमध्ये मोठ्या हुद्यावर नोकर होते. पेन्शन घेतल्यानंतर कांहीतरी परोपकार करता यावा म्हणून त्यांनी पुण्याच्या मेडिकल स्कूलमध्ये नाव दाखल करून वैद्यकीच्या अभ्यासास सुरवात केली वय झालेलं, तरुणपणांत करावा लागणारा अभ्यास व ताणाताण, यातायात ह्या वयात करावी लागली. ह्याचा परिणाम शरीरावर झाला. वारंवार चक्कर येऊं लागली डोकें दुखूं लागलं. चैन पडेना. परंतु हौसेने व वीरश्रीने सुरू केलेलें कामहि सोडवेना अशा स्थितीत दोन वर्षे काम करीतच राहिले शेवटी चक्कर येऊन बेशुद्ध पडण्यापर्यंत पाळी आली ह्या गृहस्थाच्या रक्ताचा दाब (blood pressure) २८० व १०० असा झाला होता नशीब की एखादी रक्तवाहिनी फुटून पक्षघात किंवा संन्यास झाला नाही ! पण दाब वाढून वारंवार भयंकर त्रास मात्र होत असे.

हा विकार या गृहस्थाना पुष्कळ दिवस पुढेंहि होताच त्यानी पुढें अभ्यास सोडला. खूप विश्रांति घेतली. निरनिराळे उपचारहि केले त्यामुळे जितके दिवस उपचार करावे तितके दिवस बरे वाटायचें; परंतु उपचार बंद पडताच पुन्हा दाब वाढून त्रास होऊं लागायचा त्यांना खालील उपचारानी बरे वाटले किंबहुना ही सर्वसामान्य ब्लडप्रेशर वाढलं असता उपयोगी पडणारी चिकित्सा आहे —

**ब्लडप्रेशर वाढण्यास बहुश. ग्रहणीस्थ आमदोष** ( intestinal auto toxin ) **तोहि जीर्ण आमदोष** कारण असतो ह्या आमदोषामुळे रक्तातील दाब वाढतो आमदोपास अपचन कारण असते. त्यामुळें जी जी द्विदलादि धान्यें, मास, दूध किंवा अंडी वगैरे जिन्नस पोटात जातात त्याचे नीट पचन होत नाही. मासल द्रव्यें (proteins) नीट पचली तर त्यापासून पुढें धातुपरिपोषणक्रियेने मास चांगल्या प्रकारे तयार होते परंतु नीट पचली नाहीत तर ती अपक्व द्रव्ये शरीरात, विशेषत आतडी, रक्तधातु व रक्त यात दोषजदुष्ट द्रव्ये निर्माण करतात आणि त्याचमुळे ब्लडप्रेशर वाढत राहते.

ह्याकरिता **हाय ब्लडप्रेशर** असेल त्या माणसास प्रथमत द्विदल धान्ये वर्ज्य करण्यास सांगावीत आणि मासाहारी असल्यास मासादिक सर्व पदार्थ वर्ज्य करून भात, भाकरी, भाजी, ताक, थोडें दूध, लिंबू, फळें, फलरस पदार्थ विशेषतः पालेभाज्या खाण्यास सांगाव्यात. याप्रमाणे सदरचे गृहस्थाना निव्वळ पालेभाज्या, दूध, थोडें ताक, भात, भाकरी व फळें खाण्यास सांगितली. वरण कोणत्याहि डाळीचें अगदी वर्ज्य केलं आणि मग औषध सुरू केलं.

**चन्द्रप्रभावटी** प्रत्येक वेळी दोन गुंजांप्रमाणे दूधखडीसाखरेबरोबर घेण्यास सांगितली. विरेचनाची विशेष जरूरी लागली नाही. हल्ली सदर गृहस्थाचें blood-pressure पुष्कळच कमी आहे निश्चित प्रमाण मात्र कळलें नाही

---

## (११) रक्ताचा वाढलेला दाब व डोकेंदुखी

लष्कराच्या अनेक कामावर सर्व देशातील, सर्व धर्माच्या, जातीच्या, वर्णाच्या विशेषत. लष्करी पेशाच्या धाडशी लोकाचा अजबखानाच जमलेला असतो. त्यापकी एक पजाबी गृहस्थ एके दिवशी आमच्याकडे आले. त्याची डोकं दुखण्याने अगदी वेडयामारखी स्थिति झाली होती. डोक्याची कवची फुटते की काय असे त्यास वाटत होते त्या गृहस्थाचा धदा शिप्याचा म्हणजे बैठा खूप खावयाचे आणि रात्रदिवस बसून शिवण्याचे काम करावयाचे. "टट्टी (शौचशुद्धि) सफा होती या नाही, कुछ मालूम नही, जाते तो रोज!" असे उत्तर मिळाले. स्थिति मात्र फार भयकर डोक्याच्या आसाच्या जवळच्या शिरा दोरखंडासारख्या जाड होऊन तट्ट उभ्या राहिलेल्या नाडी जाडभर दोरासारखी, पूर्णप्लुत आणि डोळे भयकर दुखत असलेले डोक्याच्या त्रासामुळे शिराव्यध करून रक्तहि काढून टाकले त्यामुळे तात्पुरते बरे वाटले, परतु पुन्हा दुप्पट जोराने डोकं दुखूं लागले एवढा लंबलाट धिप्पाड मनुष्य, परंतु अगदी गाय होऊन गेला होता त्याचा रक्ताचा दाब (blood pressure) सपाटून वाढला होता

या गृहस्थाना खूप विरेचन होणे आवश्यक होते ह्याकरिता खालील योजना केली

**इच्छाभेदीरस**—२ गुजा. प्रत्येक वेळी साखरेंत मिश्र करून घेऊन वर मनुकांचे पाणी पाच तोळे + **स्वादिष्ट विरेचन** एक तोळा त्यातच मिश्र करून पिणे.

ह्याप्रमाणे योजना दिवसातून तीन वेळा केली पहिलेच दिवशी प्रथमत औषध घेतल्यानंतर सपाटून मोठा जुलाब झाला व डोकं दुखणे कमी कमी होऊं लागले रोज सुमार आठ दहा जुलाब चागले होत असत तिसरे दिवशी सदर गृहस्थ आले ते हसतच आले आणि "मापारला, आपकु खुदा दुवा देवे!" म्हणून अनेक तन्हेने आपली कृतज्ञता व्यक्त करते झाले!

---

## (१२) अस्राभिनोदनवृद्धि व नेत्रशूल

गृहस्थ पोस्ट खात्यात नोकर. नोकरी वरच्या दर्ज्याची पोस्टातील काम बैठे आणि शक्तीकरिता सुस्निग्ध आहार बरेच दिवस चालू ठेवला पण तो प्रयोग साधला नाहीं डोकं दुखू लागले डोळे लाल झाले आणि रात्रंदिवस ठणका लागला. तो इतका की, झोपेकरिता (morphia) चे सूचिभरण (injection) द्यावे लागे डोळ्याबरोबर डोकंहि दुखूं लागले आणि मग मात्र फारच भयकर स्थिति

झाली. सारखी तगमग, झोंप नाही, ठणका, डोळयास व डोक्यास भयंकर ठणका अशी स्थिति सुमारें दोन महिने कमी अधिक प्रमाणांत चालू होती डोक्याकरिता व डोळयाकरितां अनेक उपचार चालूच होते. चिकित्सक बदलल्यानंतर, ब्लडप्रेशर वाढले आहे हे लक्ष्यांत आलें. ह्या गृहस्थांना आरोग्यवर्धिनी ४ गुंजा दिवसातून चार वेळा आरग्वधसिद्ध दुग्ध (बहाव्याचा मगज तीन ते सहा मासे, खडीसाखर पावलीभार, दूध तोळे दहा व पाणी तोळे वीस एकत्र मिश्र करून दूध शिल्लक राहीपर्यंत उकळावयाचें, नंतर तें दूध गाळून द्यावयाचे. हे आरग्वधसिद्ध दुग्ध.) या अनुपानाबरोबर दिली. ह्याप्रमाणें केलेल्या १५ दिवसाच्या चिकित्साक्रमानें डोळे बरे झाले आणि डोकं तर बरें झालेंच झालें

---

# (१३) रक्ताचा वाढलेला दाब व आर्तवाधिक्य

बाई, वय सुमारे पस्तीस-चाळीस जात ब्राह्मण घरची स्थिति उत्तम. व्यायाम कमी. खाणें सुस्निग्ध त्यांना दोन वर्षे सारखा आर्तवाधिक्याचा विकार सुरू झाला. दात चांगले बळकट शरीर स्थूल. हा विकार पाळीच्या वेळी सुरू होत असे तो चांगला पधरा दिवस राहावयाचा एवंच मध्यें ७-८ दिवस जाऊन सारखे आर्तव जातच राहावयाचें. ह्या बाई व घरची सर्व मंडळी अगदी उपचारानें व रोगानें कंटाळून गेली. त्यांना एका अगाच बाईनें खूप स्तंभक औषधें दिली त्यानें आर्तवदोष थोडा कमी पडलासा वाटला. परंतु डोकें व आंग भयंकर दुखूं लागलें. डोकें तर इतकें दुखलें की, काही पुसायची सोय नाही बाईना त्यापासून भयंकर त्रास झाला "भीक नको, कुत्रा आवर" असें सर्वांना झालें पहिला त्रास बरा असें आता झालें याचेंहि ब्लडप्रेशर वाढलेलें होतें आणि जोवर रक्तस्राव होत असे तोवर त्रास फारसा झाला नाही. निसर्गदेवीनें ही तजवीज केली त्यामुळें बाईना फारसा त्रास होत नव्हता. परंतु आमच्या चिकित्सकानें जांवईशोध घालून निसर्गदेवीवर ताण करण्याचा प्रयत्न केला तो मात्र भलता आंगलट आला रक्त जात होते ते रक्ताचा दाब वाढूं देत नव्हतें ते बंद झाले आणि रक्ताचा दाब वाढला ह्या बाईना चन्द्रप्रभावटी, आरोग्यवर्धिनी व आरग्वधसिद्ध दुग्ध ही योजना सुरू केली त्यानें आर्तवदोषहि नष्ट झाला आणि डोकें व अंग दुखणेंहि नाहीसें झालें

---

## (१४) व्रणविसर्प

रोगी वय ५२. नेडयांत राहणारा. काम करतां करतां एक खिळा पायांत घुसला तो खिळा पायांतून आरपार घुसून वर आला. खिळा ताबडतोब काढला, परंतु त्यांनीं पुढें चिकित्सा व जोपासना करावी तशी केली नाहीं. गेड्यांनीं बांधली! त्या जखमेंत काय वाटेल तें भरलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, खिळ्यानें झालेली जखम भरून न येतां सडली. त्या जखमेच्या भोंवतालीं सर्व सूज आली. पायाच्या पोटऱ्या, मांड्या सबंध कमरेपर्यंत सुजल्या. रोग्यास खातां पितां येईना. ज्वर जास्त वाढला. जबाडे बसलीं व धनुर्वात होतो कीं काय अशी भीति वाटूं लागली. अशा स्थितींत रोगी कसा तरी दवाखान्यांत आला. रोग्यास ज्वर अतिशय, नाडी जलद, बोलणें बारीक व तोतरें, जखमेची स्थिति अगदीं वाईट, सर्व पायावर व्रण, विसर्प व शोथ होता. या रोग्यास आम्ही शस्त्रवैद्याकडे जाण्याचा सल्ला दिला. परंतु अनेक कारणांनीं तें त्यास इष्ट न वाटून औषधिउपायांनींच काम करतां येईल तें पाहावें, नच जमल्यास मग शस्त्रक्रिया वगैरे काय करावयाची ती पाहूं. असें रोग्यानें सांगितल्यावरून त्यास औषध-योजना करून दिली. व्रण, विसर्प व शोथ हीं व्रणांतील पूयदोषामुळें आलेलीं असल्या-मुळें त्याकरितां कांहीं केलें नाहीं. खिळा टोचल्याजागीं जखम वरून चिघळली होती पसरली होती व त्यांतून घाणेरडा पूहि येत होता. ही जखम कडुनिंब, त्रिफळा यांच्या पाण्यानें धुऊन काढून, जखमेंत शोधनतैलाचा पिचु (बोळा) घालून वर शुद्ध मधाची पट्टी ठेवून व्रणपट्ट बांधून टाकला. येणेंप्रमाणें बांधलेल्या व्रणपट्टानें जखमेंतून भराभरा स्राव होऊन जखम वरून स्वच्छ झाली. हाच व्रणपट्टक्रम दहा, बारा दिवस सारखा ठेवला. त्यामुळें व्रण स्वच्छ झाला. व्रणविसर्प उतरला व शोथहि कमी झाला. हा चिकित्साक्रम चालू असतां त्यास परिपोषक औषध पोटांतहि सुरू केलें होतें. पोटांत गोक्षुरादि गुग्गुळ, मृगशृंगभस्म प्रत्येकीं एकेक गुंज प्रमाणानें, उपळसरी, मंजिष्ठा, पुनर्नवा, दशमूळें यांच्या काढ्याबरोबर देत असूं. पहिल्या आठवड्यांत व दुसऱ्याहि आठवड्यांत हाच चिकित्साक्रम व्रणरोपण, रक्तप्रसादन व व्रणनिर्विषीकरण याकरितां सुरू होता आणि या चिकित्साक्रमानें व्रण भरून आला, शोथ कमी झाला आणि सर्वेंद्रियविष लक्षणें (toxic symptoms) फार आश्चर्यकारक रीतीनें कमी झालीं.

---

## (१५) संग्रहणी (उपदंशजन्य)

रोगी पुरुष, वय ४५ वर्षें, जात गुजराथी सुमारें बावीस वर्षांपूर्वी प्रथमत संग्रहणीचा आजार उत्पन्न झाला. आपल्या आवाक्याबाहेरचें ओझें उचलणें हें त्यास निमित्त झालें

होतें. त्यानंतर हा आजार थोडयाबहुत प्रमाणात मधून मधून दबत असे. पण अगदी साफ बरा झाला असं कधी झालेंच नाही. रोग्याची मल, मूत्र, रक्त वगैरेची अनेक वेळा कसून तपासणी झाली होती व अनेकविध चिकित्सा निरनिराळया देशातील तज्ज्ञाच्या देखरेखीखाली निरनिराळया वेळी रोग्याने घेतल्या होत्या. चिकित्सेचा परिणाम म्हणून रोग कांही कालपर्यंत दबल्यासारखा होई. शेवटी रोग्याची स्थिति खालीलप्रमाणे झाली होती. रोग्यास शौचास एक किंवा दोन वेळाच होई, पण तें पुष्कळ, पांढरे, भरभरित पातळ होई. शौचाच्या वेळी पोटांत दुखे रोगी अतिशय कृश, कल्पनेबाहेर कृश झालेला होता रोग्याचें वजन त्या वेळी ७४ तें ७६ पौंडपर्यंत गेलेलें होतें पोट दाबले असता थोडें दुखत असे. लघ्वीचा वर्ण तांबूस, लघ्वीस पुष्कळ होत असे. मूत्रपरीक्षेत मूत्रात कोणताहि दोष आढळून आला नाही. त्याचप्रमाणे शौचातहि कोणते विशेष प्रकारचे जंतु किंवा विशेष प्रकारचे दोष, रक्त, आव वगैरे नव्हते रोगी तर सारखा कृश होत चाललेला. औषधोपचार करूनहि त्यास कोणत्याहि तऱ्हेने बरें वाटेना व अधोगति थांबेना म्हणून ह्या रोग्यास आयुर्वेदीय चिकित्सा सुरू करण्यात आली ह्या रोगाचे उपदंशज संग्रहणी असें निदान करून खालीलप्रमाणे योजना केली संग्रहणीच्या जुनाट विकारात ग्रहणीस जुनाट व्रण असतात आणि म्हणूनच वारंवार शौचाची शंका व पातळ जुलाब वगैरे लक्षणें होत असतात हे लक्षात घेऊन उपदंशविषघ्न, व्रणरोपक, ग्रहणीस्थानदुष्टि नाहीशी करणारी अशी चिकित्सा सुरू केली व आश्चर्याची गोष्ट ही की, रोगी उत्तमतऱ्हेने बरा झाला. ह्या रोग्यास अनंता, वाकेरीचे मूळ व तांदुळजाच्या मुळयाचा व दूर्वाच्या मुळयांचा रस याबरोबर आरोग्यवर्धिनी सकाळ, संध्याकाळ, व समानकाली इरिमेदादि तैल याप्रमाणे औषधें पोटात देत असूं. आणि हीच योजना रोगी अगदी बरा होईपर्यंत चालू होती

---

## (१६) कोष्ठस्थ गर (Intestinal Toxaemia)

Intestinal toxaemia हे नाव जरी नवे असले, तरी कल्पना जुनीच आहे. पोटातल्या पोटात अन्नाचे वियोजन होत असता निरनिराळ्या प्रकारची आपोआप बनणारी कृत्रिम विषारे शरीरात तयार होतात ही स्वयंदुष्टिजनित कृत्रिम विषारें आयुर्वेदात "गर" ह्या नावाने संबोधिली जातात गर व toxins ही एकच होत ह थोडया विचाराअंती कोणाच्याहि ध्यानी येईल. रोग्यास प्रथमपासून थोडथोडी अपचनाची संवय, सणावाराचे दिवस असल्यामुळे स्वभावगुरु व मात्रागुरु अन्न वारंवार खाण्यात आलें, अशाच एके दिवशी श्रीखंड खाण्यात आलें त्याच दिवशी रात्रीं पोटात सपाटून दुखावयास लागून वात्या व जुलाब व्हावयास लागले. पोट दुखणे अत्यंत जोराचें व

असह्य होतें. दोन दिवस ह्याप्रमाणें पोट सारखें दुखतच राहिलें. तिसऱ्या दिवशीं सर्वांगावर शीतपित्ताचीं चकंदळें उठून अंगास भयंकर खाज सुटूं लागली. ज्वर पहिले दोन दिवस येताचा होता तो तिसऱ्या दिवशीं वाढून १०३ अंशावर गेला. वांति सारखी सुरू होती. यत्किंचित् कांहीं अन्न, फळाचा रस, दूध, कांहींच पोटांत ठरत नसे. वांति व त्याबरोबर उचकी सुरू झाली. प्रथम रेचक व शामक चिकित्सा सुरू होती व पुढें पुढें गरम चिकित्साहि करण्यात येत असे. परंतु ती आयुर्वेदीय मात्र नसे. ही स्थिति सारखी आठ नऊ दिवस चालू होती. आठव्या दिवशीं आम्ही रोग्यास पाहिलें. ज्वर येताचा होता. अंगावरील चकंदळें नाहींशीं झालीं होतीं. मूत्रातील दोष थोडे शिल्लक होते. परंतु सारखी सतत वांति व उचकी ही मात्र अत्यंत त्रासदायक व भयंकर वाटलेली होती. गेल्या ८-९ दिवसांत रोग्याच्या पोटांत पाण्याशिवाय कांहीं ठरत नसे आणि तेंहि २-४ तासपर्यंत पोटांत राहून वांतीवाटे पडून जात असे. वांति पाठी फेंसासारखी अतिशय वेगानें येत असे. दिवसरात्र वांति, उचकी, झोंप बिलकूल नाहीं अशा स्थितीत रोग्याची अत्यंत चिंताजनक व भयंकर अवस्था झाली असल्यास नवल नाहीं.

ह्या रोगाचें निदान " कुणपविषार ' ( Ptomaine Poisoning ) म्हणता येत नाहीं. कारण कुणपविषाराची बाधा जितक्या लोकांच्या पोटांत तें गेलें तितक्या सर्वांस झाली पाहिजे. म्हणजे जितक्यांनी श्रीखंड खाल्लें तितक्या सर्वांस तें बाधलें पाहिजे. परंतु येथें तसें झालें नाहीं. ह्या एका रोग्याशिवाय इतर ५-२५ माणसांनी तें श्रीखंड खाल्लें असूनहि त्या कोणास तें बाधलें नाहीं. हें एकट्यासच बाधलें याचा अर्थ असा कीं, त्या रोग्याच्या कोठ्यांत प्रथमतःच दोषसंचय पुष्कळ असल्याकारणानें श्रीखंडाचें निमित्तकारण घडून त्यायोगें कोठ्यांत गर तयार झालें आणि त्या गराचा परिणाम वर लिहिल्याप्रमाणें भयंकर झाला.

अर्थातच आयुर्वेदीय पद्धतीप्रमाणें या रोगांत गरचिकित्सा करणें हेच योग्य ठरलें. गरचिकित्सा विषचिकित्सेप्रमाणें प्रथमतः संशोधन व नंतर विषघ्न व शामक अशीच करावी लागते. पैकीं या रोग्यांत प्रथमतः संशोधनचिकित्सा झालीच होती. गरघ्न चिकित्सेंत तण्डुलीयकमूलानि कुक्कुटाण्डसवं गुडम् । नावनाञ्जनपानेषु योजयेद्विषशान्तये । (वा. सू. अ. ८) या मंत्रांत लिहिल्याप्रमाणें गरनाशक तांदुळज्याच्या मुळ्या १ तोळा घेऊन त्याचा अष्टमांश कषाय करून तो थोडथोडा पोटांत देण्यास सुरवात केली. त्याचबरोबर " विषभुक्ताय दद्याच्च शुद्धायोर्ध्वमधस्तथा । शुद्धे हृदि ततः शाणं हेमचूर्णस्य दापयेत् ॥ ' (वा. सू. अ. ८) ह्या सूत्राप्रमाणें हृद्विशोधन सूक्ष्मसुवर्णभस्म ह्या कषायाबरोबर देण्यास सुरवात केली. दर दोन दोन तासांनी सूक्ष्मसुवर्णभस्म व तदुलीयक-मूलकषाय देत असूं. खाण्यास आजवर कांहींच पोटांत जात नसे आणि म्हणून एकंदर दोषदूष्यविवेचनानें मनुकांचा फांट तयार करून तो थोडथोडा देण्यास सुरवात केली आणि चमत्कार असा कीं, हीं औषधें देऊं लागल्यापासून त्याच दिवशीं सर्व लक्षणें कमी होऊन एकदोन दिवसांत रोगी बचावण्याची चिन्हें दिसूं लागलीं. हा सर्व

कम सुरू असतां दूध, दुग्धशर्करा, मीठ व पाणी यांचा बृंहणबस्ति सुरू असे ह्या एकंदर चिकित्सेनें रोगी आठपंधरा दिवसांत उत्तम बरा झाला

---

# ( १७ ) आक्षेपक

मुलगी वय वर्षे ८, जात ब्राह्मण

ह्या मुलीस आक्षेपकाचे वारंवार झटके येत सुमारे दोन वर्षांपूर्वी मुलगी खेळतां खेळता पाण्यानें भरलेल्या हौदांत पडली. चपळाई करून तिला बाहेर काढले. परंतु तिच्या माकड हाडाच्या वरच्या दुसऱ्या व तिसऱ्या ( lumber 3rd & 4th ) मणक्यास बराच मार बसला. काही दिवस उपचार केल्यानंतर ही तक्रार मिटल्यासारखी झाली. परंतु पुढेंसुद्धा कांही निमित्त घडल्यास ह्या ठिकाणी दुखे

गेले दोन महिने मुलीस थोडे थोडे झटके, हातापायास विशेषतः, येऊं लागले. मुलगी चांगली शुद्धीवर असे, परंतु हातपाय हालवल्याशिवाय चैन पडत नसे. ह्याच वेळेस कंबरेच्या जवळच्या मणक्यास दुखावा जास्त वाटूं लागला तेथें स्पर्शसुद्धा सहन होत नसे. या प्रकारास सुमारे दीड महिना लोटल्यानंतर हे झटके जास्त जास्तच येऊं लागून मुलीस ज्वर जास्त येऊं लागला

ज्वर आला तो थंडी वाजून भरला आणि कंबरेंत जास्त दुखूं लागले. त्याबरोबर झटक्यांचा वेगहि वाढला झोप फार क्वचित् येई ज्वरवेग सकाळी ९९॥ व सायंकाळी १०२-१०३ डिग्रीपर्यंत असे. पुढें थंडी आली नाही परंतु सारखा संततासारखा न निघणारा ज्वर असे. झटके रात्रंदिवस चालूच असत हातापायास किंचित् गारवा. अंगास जडपणा, मुग्या आल्याप्रमाणे होणे ही लक्षणे जोरात होती. सर्व लक्षणाचा विचार करता मुलीस कफवातप्रधान दोषप्रकोप ठरवून

**स्मृतिसागर** १ गुंज+**सितोपलादिचूर्ण** ६ गुंजा, एकत्र खलून पुड्या ४, दर तीन तासानी तुलसीरस व मध यात देण्यास दिल्या

वरील औषध सुरू केल्यानंतर ४-५ दिवसांत ज्वर नाहीसा झाला झटक्याचे प्रमाण बरंच कमी पडले; परंतु सारखी सतत वांति सुरू झाली म्हणून वरील मिश्रण बंद करून—

**सुवर्णमाक्षिकभस्म** १ गुंज+**सितोपलादिचूर्ण** ६ गुंजा, एकत्र खलून पुड्या ४, दर तीन तासांनीं मोरावळ्याच्या पाकांत घेण्यास दिल्या.

ह्या मिश्रणानें वांति बंद झाली नाही रोग्यास अन्न अगर पाणीहि पचत नसे आणि अशा प्रकारे हें लक्षण वाढून त्यातच रोग्याचा अंत झाला झटके, ज्वर वगैरे बाह्य लक्षणें कमी झालीं, तरी अभ्यंतर दोषप्रकोप कायम राहिला व त्यानेंच रोगी दगावला.

# (१८) पिवळे फोड व जांघाडांतील गांठ

रोगी लहान मुलगी सुमारें दीड वर्षाची. प्रथमत. तिच्या पायास पिवळट मोठाले फोड येऊं लागले ते फोड पसरत असत. त्यातून पिवळट घाणेरडा व दाट पूं येत असे. तो पूं जेथें जेथे लागे, तेथें तेथें पुन तसलाच फोड उठून त्यातून तसलाच घाणेरडा पूं येई हा क्रम सारखा बरेच दिवस चालू होता. त्याकरिता वर लावण्याचे मलम वगैरे उपचार केल्यानतर बऱ्याच दिवसानी हे फोड बरे झाले. फोड बरे होतात, न होतात, तोंच त्या मुलीच्या जाघाडात गाठ उत्पन्न झाली. ही गाठ फार दुखरी असे ठणका मनस्वी, सूज फार व त्यामुळें ज्वरहि अतिशय येऊ लागला अर्थ.तच मग गाठ पिकून फुटण्याकरिता उपचार सुरु झाले. सर्व उपचार अगदी उत्तम तज्ज्ञाच्या देखरेखीखालीं करण्यात आले परतु गाठ कमी न होता सारखी वाढत चालली व सर्व जाघ सुजली ही सूज आता बाह्योपचारानें बसणे कठीण किंवा नुसत्या स्वेदादिकानी विद्रधि पिकणें किंवा फुटणें शक्य नाही असें ठरुन विद्रधि फोडावा व शस्त्रकर्म करुन पूं बाहेर काढावा असें तज्ज्ञाचें म्हणणें पडलें घरच्या मडळीचा धीर शस्त्रकर्म करण्यास होईना. काय करावें ? शस्त्रकर्म करावे का न करावे ? करावेच तर कोठें ? अशा स्थितीत घरचे मुख्य मालक होते गोष्टीवरुन गोष्टी निघता निघता मुलीच्या आजाराची गोष्ट निघाली मुलीस समक्ष पाहिलें. विद्रधि पक्व झालेला नव्हता. वर लावण्याच्या लेपांची तादृश जरुरी दिसली नाहीं

वस्तुत ज्या कारणाने पिवळट फोड आले, तेंच कारण ह्या विद्रधीसहि होतें फोड बरे झाले ह्याचा अर्थ बाह्यत असलेले दोष अंतस्थ झाले. तेथें त्याचा प्रसर होऊन त्याच पायातील रसग्रथींत ( lymphatic glands ) त्यांचे शोषण झालें रसग्रंथी फुगला, सुजला व हे दोषाचें लचाड आपणा स्वत मध्ये शोषून घेऊन बसला. असा हा ग्रथी वाढण्याचा अर्थ येथें मूलग्राही चिकित्सा केवळ स्वेदन किंवा पाटन कर्म नाहीं तर ज्या दोषाच्यायोगें ग्रथी वाढला तो दोष कमी करणे ही मूलग्राही चिकित्सा होय

पिवळट फोड उत्पन्न झाले व त्याची लस चरत चालली तेव्हाच खरोखरी हे फोड उत्पन्न करणारे जतु व दोष याचे नाशक उपचार करणें आवश्यक होते पण त्याऐवजीं केवळ वर वर उत्पन्न झालेले फोड बरे व्हावेत म्हणून विस्फोटघ्न मलम लावण्यात आलें त्याच्यायोगें मूळ कारण नाहींसें न होता तें दवलें व त्याचा अंतरत प्रसर झाला केवळ वर मलम न लावता त्याच वेळी अभ्यंतरचिकित्सा करुन जतु न वाढतील व धातुसाम्य प्रस्थापित होईल अशी तजवीज केली असती, तर विद्रधि मुळीं उत्पन्नच झाला नसता, असा आमचा तर्क आहे

परतु विद्रधि झाल्यानंतरसुद्धा विद्रधीचे मूळ कारण जे जतु व दोष ते नाहीसे करणे जरूर. पण ते न करता केवळ स्वेदन व पक्व झाल्यानंतर पाटन करणे ही चिकित्सा कोणती !!

विद्रधि पिकणार नाहीं व फुटलाच किंवा फोडलाच तर त्याची लस ही पिवळया फोडा-प्रमाणे विस्फोटक होणार असे आम्हास वाटले आणि म्हणून ह्या विकारास मूळ कारण असलेले जंतु व त्यांना वाढीस जरूर असलेला कफदोष ह्याना प्रत्यनीक अशी चिकित्सा केल्यास हा विद्रधि खास बसेल, पक्वहि होणार नाही आणि पाटनहि करावे लागणार नाही असे आम्हास वाटून ह्या रोग्यास आम्ही वंगभस्माच्या पाव गुंजा प्रमाणाच्या ७ पुड्या करून दिल्या वंगभस्म जतूंना नाहीसे करणारे आणि ते जंतु ज्या दुष्ट कफात वाढतात त्याची दुष्टी नाहीशी करून त्यात साम्य प्रस्थापित करणारे आहे या औषधाने मुलगी उत्तम प्रकारे बरी झाली व शस्त्रकर्म टळले

---

# (१९) कर्णस्राव व पुरळ

एका बारा वर्षाच्या रोग्याचा कान फुटून, कानातून पिवळट, दाट व घाणेरडा पूयस्राव व्हावयास लागला ह्या स्रावाचा विशेष असा की, जेथें जेथे हा स्राव होऊ लागे, त्या त्या ठिकाणी पुरळ येऊन त्या त्या पुरळातूनहि पुनश्च स्राव होऊं लागे ह्या स्रावाची लस दुसऱ्या ठिकाणी लागून पुन्हा पुरळ येई अशा रीतीने सर्व अंगभर पुरळ आला, त्यातून स्राव होऊं लागला, कान व तोंड सुजले आणि रोगी एकाद्या भावरभुता-सारखा दिसावयाला लागला प्रथमारंभी रोग्यास वर लावण्यास दशांगलेप व पोटात रक्तशुद्धिकर व रक्तप्रसादक अशी औषधें दिली, परतु त्यांचा विशेष काही उपयोग न होता एक दोन दिवस बरे वाटून, रोग्यास पुन्हा जास्त त्रास होऊ लागला असल्या-प्रकारच्या तीव्र व स्फोटक पुवास कारणीभूत सूक्ष्म जंतु होत हे जंतु नाहींसे करणारे औषध असल्या रोगात देणे अवश्य असते हे औषध वंगभस्म होय, आणि सदरच्या रोग्यात वंगभस्माचा उपयोग करूं लागल्या दिवसापासूनच फरक पडण्यास सुरवात होऊन चवथे पाचवे दिवशी रोगी उत्तम प्रकारें बरा झाला

---

## (२०) आन्त्रिक सान्निपाताची अगदीं शेवटची अवस्था

ह्या स्थितीत रोगी अगदी आसन्नमरण होऊन नाडी सुटूं लागते, रोगी श्वास घेण्या-करिता धडपडत असतो, त्यामुळे छिन्नश्वास झालेला असतो अशा परिस्थितीत औष-धोपचाराचा फारसा उपयोग होतोच असे नाही परंतु उपचार तर करावेच लागतात. आधुनिक वैद्यकाचे काही पुरस्कर्ते शुद्ध ऑक्सिजन वायूचा पुरवठा फुफ्फुसास करण्याचा प्रयत्न करतात परंतु हा छिन्नश्वास व एकंदर परिस्थिति यास मूळ कारण हृदयाची क्षीणता हे असते आणि त्यामुळे ऑक्सिजन वायूचा हृदयावर काही परिणाम होत नसल्या-कारणाने बहुश काही उपयोग होत नाही शिवाय ऑक्सिजन वायु सर्व शरीरभर वाहून नेणारे रक्तातील रक्तकण ह्या परिस्थितीत निकस होऊन एके ठिकाणी कोठे तरी पडून राहिलेले असतात त्यामुळेहि ऑक्सिजन वायूचा पुरवठा केला तरी त्याचे शरीरात मशोषण होत नाही या परिस्थितीत खरा उपाय म्हणजे हृदयाशी सलग्न असलेल्या वाहिन्याचा पूर्ण विकास करून हृदयास रक्ताचा व वायूचा पुरवठा भरपूर होईल अशी तजवीज करणे हा होय हे कार्य आयुर्वेदातील लक्ष्मीविलासगुटी नामक औषधाने उत्तम प्रकारें झाल्याची उदाहरणे आहेत

---

## (२१) मलसंचित आंतडीं व वेड

आमच्या एका स्नेह्याच्या वहिणीला एकाएकी वेड लागलें त्या वेडाची लहर मोठी चमत्कारिक असे. वेड सकाळी व सायकाळी दोन वेळा जास्त असे तें इतके की, घरातील इतर मडळी अगदी वैतागून जात परतु दुपारच्या वेळी हा वेडाचा भर कमी होत असे आणि बाई चागल्या प्रकारे शुद्धीवर येऊन स्वयंपाक वगैरेहि करून जेवणास घाली आणि आपण जेवे. सध्याकाळ झाली की, पुन्हा वेडाची लहर येई बडबड, वगैरे सर्व सुरू होई आणि पुन्हा धुमाकूळ घालूं लागे झोप बिलकूल नसावयाची अशा प्रकारे एकाएकी वेड लागल्यामुळे आणि बाई घरातील मुख्य, त्यामुळे सर्वच घरास फार त्रास होई. दुसरा एक भयकर त्रास म्हणजे बाईचे थुकणे जो कोणी पुढें येईल त्याच्या अंगावर, तोंडावर, दिसेल त्या भागावर, मन मानेल तसे, थुकणे चालत असे. वडीलधारे कोणी न पाहता थुकावयाचे हा क्रम, वेडाची लहर आली की, अव्याहत चालत असे झोपेंत लाळ गळे किंवा थोडासा शातपणा प्राप्त झाला की, थुका कमी येई आणि थुक्याला अतिशय घाण येत असे ती घाण इतकी चमत्कारिक की, बाईच्याजवळ बसू नये असेच माणसास वाटे

अशा प्रकारें वेड लागले असतां त्यांना मुंबईस औषधोपचारार्थ आणले. मुंबईच्या सर्व तज्ज्ञांनी बाईचा मेंदू बिघडला आहे, त्यांना वेड्याच्या रुग्णालयात ठेवा असें आपलें मत दिलें. परंतु त्याप्रमाणें करण्याची घरच्या माणसांची तयारी नव्हती. त्यामुळे घरच्या घरीच उपचार करण्याचे ठरून केवळ कोष्ठशुद्धीकरितां प्रथम बस्ती द्यावा, असें एकाने सुचविल्यावरून त्याप्रमाणें करण्यांत आलें.

वेड्या माणसाला बस्ति देण्याचे काम किती अवघड ! त्यात त्या बाईंना हल्ली हल्ली वेडाची भयंकर लहर येत असे. ज्या दिवशी बस्ति दिला त्या दिवशी तर ती फार फारच चेकाळल्याप्रमाणे झाली होती. आधींच वेडी, आणि त्यात गुदमार्गात बस्तीचा प्रयोग करावयाचे काम ! तेव्हा किती त्रास झाला असेल हे कल्पनेनेंच समजण्यासारखें आहे . बस्ति कसा तरी करून दिला अर्थात् केवळ पाणी, साबण व मीठ टाकून त्याचा बस्ति गुदमार्गात देण्यात आला. त्याबरोबर अगदी वाळून गेलेला आणि भयंकर दुर्गंधि असा मल बस्तीबरोबर बाहेर आला. त्यानंतर पुन्हा बस्ति दिला, पुन्हा मल आला, पुन्हा बस्ति, पुन्हां मल, असा प्रकार चार तास झाला. याप्रमाणे चार तासपर्यंत बस्तिप्रयोगानें बाईला त्याच ठिकाणावर पटकन् झोप लागली, ती चांगली बारा तासपर्यंत उत्तम झोप लागली

बस्तीचा परिणाम एक दोन दिवस टिकला. पुन. लहर आली पण ती फार कमी जोराची होती. त्यानंतर पुन. बस्ति दिला पुन. तितकाच कुजकट मल पण पातळ असा शरीरांतून बाहेर पडला अशा प्रकारे दररोज बस्तीचा क्रम सुरू केल्याने वेडाची लहर हलके हलके कमी कमी होत चालली आणि चार महिन्याच्या बस्तिप्रयोगानंतर आता बाई अगदी साफ बरी होऊन कामधंदा व संसार उत्तम करीत आहे

बस्तिप्रयोगानें जसजशीं आतडी शुद्ध व स्वच्छ होत चालली, तसतसें थुकीचे प्रमाण कमी झाले आणि थुकीची घाणहि कमी झाली. ह्या वेडाचे मुख्य कारण आतड्यांतील मल होय. मलाची दुर्गंधी विकारकारी द्रव्यें शरीरात शोषली जाऊन त्यांचा परिणाम मेंदूवर झाला आणि अशा प्रकारें वेड लागले. वेडाच्या भरांत बाईला तर शुद्ध नव्हतीच. तिनें कधीहि आपणांस शौचास होतें अगर नाही, याची चौकशी करणे शक्यच नव्हतें. परंतु घरच्या इतर मंडळीनीहि चौकशी केली नाही. आणि जसजसें वेड वाढत चाललें, तसतसें हें मलसंचयाचें प्रमाणहि वाढत चाललें. मलाचा संचय होऊन तो आंत इतका दुर्गंधी झाला तरी तिकडे वैद्यकीय सल्लागारांनीहि दुर्लक्षच केलें वैद्यकीय-सल्लागारांचा नेहमीचा एक मार्ग ठरलेला ! ते रोगाची परीक्षा करण्याचा प्रयत्न करतात. रोग्याची परीक्षा फारशी करण्याचा प्रयत्नच करीत नाहींत

---

## (२२) दोन दिवसांत श्वसनक सान्निपात

आमचे एक परम स्नेही श्वसनकसन्निपातानें नुकतेच गमावले. ते सुमारे वर्षभर आजारीच असत प्रथमत: त्यांना कावीळ झाली ती पुष्कळच वाढली. त्यानंतर मूत्रपिंडाचा आजार झाला तोहि बराच वाढून कांहीं दिवसांच्या उपचारानें नाहींसा झाला पुढें दोन महिनेपर्यंत प्रकृति चांगली राहिली. परंतु कामकाज करीत असतांनाच एकदम एकाएकी थंडी वाजून आली आणि ताप भरला ज्वर चांगला सपाटून आला. दुसरे दिवशीच रक्ताची तपासणी करता श्वसनक सन्निपाताचे जंतु त्यांत पुष्कळ आढळले ज्वर दुसऱ्या दिवशीहि होताच. परंतु त्या दिवशी आणि त्यानंतर दोन दिवस रोगी शुद्धीवर होता. चौथ्या दिवसापासून बडबड व भ्रम सुरू. पुढें पुढे हींच लक्षणे अतिरेकास गेली. ज्वर प्रथम दिवसापासूनच १०३°–१०५° अशा दरम्यान असे, आणि वातक्षोभजन्य लक्षणेंच विशेष होती. श्वसनक सन्निपातात नेहमी जी कफदोषजन्य लक्षणे असतात ती याच्यात बिलकूल नव्हती श्वसनक सन्निपाताचें मुख्य स्थान जें फुप्फुस तेंहि विशेष बिघडलेलें नव्हतें. फक्त एका फुप्फुसाच्या बाजूस थोडासा म्हणजे एक रुपयाएवढा भाग बिघडला होता ह्यापेक्षा इतर कांहीच श्वसनमार्गाची लक्षणे नव्हती. शेवटी शेवटी बडबड फार वाढली, मोठ्या मोठ्यानें आरडाओरडा सुरू झाला आणि त्यातच रोग्याचा अंत झाला ह्या रोग्यात विशेषत: एक वर्षाच्या इतिहासाकडे नजर दिल्यास रोगसंप्राप्तीवर थोडासा उजेड पडेल. रोग्यास निरनिराळे रोग सारखे होत गेले आणि प्रत्येक वेळी ते दवत गेले मूत्रपिंडाचा आजार झाल्यावेळीहि त्याच्या मूत्रांत "कॉमा बसिलस" नामक जंतु सापडले होते त्यानंतर दोनच महिन्यांनी श्वसनक सन्निपाताचे जंतु सापडले आणि तेहि दोनच दिवसात इतके वाढलेले सापडले की, गरवीच्या रोग्यांत सातवे दिवशी इतके प्रमाण वाढलेलें असते. आणि इतकी वाढ रक्तात होऊनहि मुख्य स्थानात त्याची लक्षणे बिलकूल नव्हती तेव्हां जंतु हेच प्रधान कारण म्हणण्यापेक्षा दोषप्रकोप हे प्रधान कारण म्हणण्यास काय हरकत आहे? दोषप्रकोप इतका तीव्र झाला असता त्या त्या दोषप्रकोपाच्या अवस्थेंत विवक्षित जंतूंची वाढ होऊं शकते, असें वरील हकीकतीवरून सिद्ध होतें.

---

## (२३) श्वसनक सन्निपात व उन्माद

गृहस्थ, वय बावीस वर्षे त्यांना प्रथमत थंडी वाजून ज्वर आला ते गृहस्थ आपल्या घरच्या माणसापासून लांब दूर देशात होते त्यामुळे त्यांची शुश्रूषा करण्यास

घरचें कोणी नव्हतें, आणि नुकतेच परक्या ठिकाणी गेल्यानें इतर स्नेहीहि कोणी नव्हते त्यामुळे एक दोन दिवस ज्वर आल्यानंतर तो साफ उतरतो की नाहीं हे समजण्यास मार्ग नव्हता. तिसरे दिवशी घरून माणसे गेल्यानंतर उपचारास सुरवात करण्यात येऊन तेथून त्यांना घरी आणले. परंतु रोग्याची वस्तुस्थिति खरी खरी कळणे फार कठीण होऊन गेलें. दोन दिवस ह्याप्रमाणे आणखीहि गेले. त्यात उपचार सुरूच होते, परंतु उतार नाही. पाचवे दिवशी दुपारी ज्वर १०० ६° पर्यंत असता रोगी एकाएकी भडकला तो इतका की, माडीवरून खालच्या चौकात त्यानें उडी मारली. त्यानंतर रोगी चागला शुद्धीवर होता परंतु श्वसनक सन्निपाताची लक्षणे जास्त जास्तच वाढत गेली रोगी सकाळी काही वेळ शुद्धीवर असे, परंतु पुढें अगदी बेशुद्ध होई. येणे प्रकारे आजारी पडल्यापासून तेरावे दिवशी रोगी दगावला. ह्या रोग्यातहि दोषप्रकोप हेंच प्रधान कारण म्हटले पाहिजे. ह्यांनाहि तीव्र श्वसनक सन्निपात होता. पण श्वसनमार्गाचा व्यत्यय विलकूल नव्हता ह्या रोग्यास दोन वर्षापासून शीतज्वर मधून मधून येत असे

---

## (२४) श्वसनक सन्निपात

लहान मूल, वय सुमारे ६ वर्षे. ह्या मुलास सुमारे सहा महिनेपर्यंत शीतज्वर येत असे कांही दिवस कमी, काही दिवस जास्त, इतकेंच रोगास प्रारंभ झाला, तो सपाटून थंडी वाजून झाला एक दिवस ज्वर बेताचा होता उपचार सुरूच होते. परंतु दुसरे दिवशी ज्वर सपाटून वाढला तो १०५°–१०६° पर्यंत गेला आणि श्वासमार्गाची लक्षणे वाढली लागलीच श्वसनक सन्निपात झाला. बडबड सुरू झाली श्रम व श्वासहि सुरू झाला आणि सुमारे ६ तासात रोगी दगावला येथेंहि दोषप्रकोप हेंच श्वसनक सन्निपाताच्या जंतूंच्यापेक्षा प्रधान कारण होय आणि दोषप्रकोप एका नाही तर दुसऱ्या कोणत्या तरी स्वस्थान स्थानभेदानें, लक्षणभेदानें, निमित्तभेदानें दिसून आला

---

# (२५) सन्निपात व ग्रीवाहुंडन

चांदमल वय १६ वर्षे, मारवाडी, विद्यार्थी आन्त्रिकाच्या साथीत ज्वर आल्यानंतर पधराव्या दिवशी परगावाहून येथें आणण्यात आला रोग्यास सोळाव्या दिवशीं तपासून चिकित्साक्रम सुरु केला. ज्वरोष्मा सकाळी १०२° व सायंकाळी १०४° ते १०४॥° असा सर्वंच आठवडाभर असे. रोग्याची बडबड, बेशुद्धि, चित्तविभ्रम ही लक्षणे दुसऱ्या आठवड्यापासून सुरू झालेली होती. पुढे पुढे म्हणजे २५-२६ दिवसानंतर बेशुद्धि जास्त वाढली बडबडीच्या ऐवजीं ओरडणें सुरू झाले किंकाळया मारणें, मान मारखी हालवणे ( ग्रीवाहुडन ) व डोळे लाल, तद्रा ही लक्षणे वाढत वाढत रोगी यातून कसा निभतो अशी काळजी पडली ओठावर करपल्यासारख्या काळसर पापडया. जीभ मध्ये काळसर भाजल्यासारखी, भोवताली पिवळसर लव आणि जिभेच्या कडा व जिव्हाग्र लाल झालेले, जिव्हा कोरडी, त्यामुळें बोलताना शब्दोच्चार स्पष्ट होण्याची पचाईत खोकला वगैरे नव्हता मध्यमकोष्ठ हलुवार झालेला प्रथम एक दोन आठवडे केव्हा केव्हा वांति होत असे. पुढे वांति झाली नाही लघुग्रहणीच्याजवळ ग्रहणीवधाच्या बाजूला दुखरेपणा असे तो दुखरेपणा पुढे पुढे लक्षणे जसजशी वाढत गेलीं, तसतसा जास्त वाढत गेला त्या ठिकाणी दाबले असता स्पर्श सहन होत नसे आत गुरगुर शब्द होत असे प्रथम काही दिवस शौच्यास अवरोध बराच असे परंतु पुढें पुढे हा अवरोध कमी होऊन शौच्यास मात्रावस्ति दिल्यानंतर व क्वचित् प्रसगी मात्रावस्ति न देताहि बरे होत असे प्रथम काही दिवस कोष्ठशूळ असे, परतु पुढें पुढें रोगी बेशुद्धच असल्यामुळें कोष्ठशूळाची तक्रार त्याने फारशी कधी केली नाही

ह्या रोग्यास रोगारंभी आन्त्रविकृति होतीच वातप्रधान सान्निपातिक दोपप्रकोपच पुढे पुढे वाढत गेला व त्याने आन्त्र, वातवाहिन्या, सहस्रार व सहस्राराचे आवरण इतके अवयवसमूह हलके हलके दुष्ट केले प्रथम दोन तीन आठवडे केवळ वातप्रधान दोषप्रकोप असे अर्थात समानवायूचाच हा प्रकोप असे त्यात पुढें पित्तदोषाचीहि भर पडून **वातोत्तर पित्तमध्य कफानुग सन्निपात** शेवटी शेवटी प्रत्ययास आला. चिकित्सा करताना हा क्रम चागल्या प्रकारें प्रत्ययास आला व चिकित्सा त्याच क्रमाने केल्यामुळें फलदायीहि झाली

ह्या रोग्यास प्रथम **लक्ष्मीनारायणरस**, वातदोषाची दुष्टि नाहीशी करून आन्त्रस्थ विकृति शम पावावी व ज्वरहि जास्त वाढू नये म्हणून, देण्यात आला. लक्ष्मीनारायणरसाने वाताची पीडा कमी झाली परंतु बेशुद्धि, बडबड वगैरे वातवाहिन्या व सहस्रारदुष्टीची लक्षणे व्हावी तितकी कमी झाली नाहीत म्हणून मग चवथ्या आठवड्यापासून **महावातविध्वसनरस व लक्ष्मीविलासगुटी** ही दोन औषधे व्यत्यासानें सुरू केली. येथें लक्ष्मीविलासगुटी देण्याचें कारण असें की, वातप्रकोपामुळें व आन्त्रिकाच्या विषारामुळे सहस्रार, पुरीतती आणि वातवाहिन्या ह्यांस रक्ताचा पुरवठा प्रमाणापेक्षां कमी झाल्याने

प्रलापादि लक्षणे जास्त वाढतात. तेव्हां ह्या अवयवाना रक्ताचा पुरवठा सम्यक् होण्या- करिता व ह्या दोषदुष्टीचा परिणाम हृदयावर फारसा होऊं नये म्हणून लक्ष्मीविलासा- सारखें हृद्य–बृंहण हृद्य–औषध येथें देणे जरूरीचेच होते. ( बृंहणं शमन त्वेव वायोः पित्तानिलस्य च । ) अशा प्रकारे बृंहण-हृद्य औषधाबरोबर वायूचा प्रकोप कमी करणारे शमन-बृंहण औषध देणेहि तितकेंच जरूरीचे आहे. हे औषध महावातविध्वंसन होय. अशा प्रकारें ओषधयोजना सुरू केल्यानतर बेशुद्धि, बडबड वगरे सगळी लक्षणे बेतानें कमी कमी होऊं लागली व रोग्यास आराम पडेल असेंहि वाटूं लागले.

परंतु पसतोस-छत्तीसाव्या दिवशी रोग्यास मस्तिष्कावरणदाहाची किंवा पुरीततीदाहाची लक्षणे हलके हलके प्रतीत होऊं लागली. ग्रीवाहुंडन जास्त वाढले, डोळे लाल झाले, रोगी किंकाळ्या मारूं लागला, शुद्धि पार गेली: अंगाचा मनस्वी दाह होऊ लागला, हातपाय आपटणे, सर्व आथरूणभर इकडे तिकडे गडबडा लोळणे, आरडणे. ओरडणे, डसणे, ओरबाडणे वगैरे लक्षणे जास्तच वाढली आणि रोग्याचा जीवितसंशय वाटूं लागला ह्या स्थितीत महावातविध्वंसन व लक्ष्मीविलास दोन्हीहि बंद करावीं लागली आणि सन्निपातास पित्तोत्तर वातमध्यत्व असे जे स्वरूप प्राप्त झाले होतें त्या- करिता चन्द्रकलारसाची योजना करावी लागली चंद्रकलारस मूळ स्थानिक दोषावरहिं कार्य करून इतर पसरलेल्या पित्तोत्तर सान्निपातिक दोषाचे प्रशमन करणारा असल्यानें केवळ चंद्रकलारस आमलकीलेहातून देण्यास सुरवात केली, आणि आनंदाची व आश्चर्याची गोष्ट की, चंद्रकलारस देऊं लागल्याबरोबर रोग्यास हलके हलके आराम पडून बेचाळीसाव्या दिवशी रोगी पूर्णपणे शुद्धीवर आला पुढे एकदोन आठवड्यात रोग्यास उत्तम प्रकारे बरे वाटू लागले व रोगी हल्ली उत्तम स्थितीत आहे.

---

## ( २६ ) आंत्रिकज्वर व बेशुद्धि

पोपटलाल, वय वर्षे ८. विद्यार्थी, घरची स्थिति उत्तम. आन्त्रिकज्वर सुरू झाल्यानंतर दहाव्या दिवशी रोगी उपचारार्थ आला आल्यावेळी ज्वरोष्मा १०१° व १०३॥° असा असे रोगी बेशुद्ध स्थितीत होता. आन्त्रिकज्वराची विशिष्ट नाडी यात स्पष्ट होती प्रथम प्रथम पोटाला फुगवटी होती. परंतु नंतर जुलाब सुरू झाले. ह्या रोग्याची बेशुद्धि एका विशेष प्रकारची असे यानें मोठ्याने बडबड कधी केली नाही नेहमी मनांतल्या मनांत हळूहळू काही तरी पुटपुटत असावयाचा . फारच झाले तर मोठमोठ्यानें यें यें करून ओरडावयाचा. असल्या प्रकारच्या सन्निपातात एकंदर

शारीरिक जीवनशक्तीचा क्षय असतो हयाचा परिणाम १९-२० व्या दिवशी स्पष्ट दिसून आला मुलाचे हातपाय कोपरापर्यंत गार पडले नाकाचा शेंडा व कानाचे चाफे गार पडले शरीरोष्मा मध्यम कोष्ठाच्या भागात १०४° पर्यंत होता ही स्थिति चागली एकदीड दिवसपर्यंत होती हया स्थितीतहि रोगी बेशुद्ध होता. असल्या चमत्कारिक स्थितीत औषधयोजना करणें अत्यत जोखमीचे व परिश्रमाचे आहे यात शंका नाहीं

हया रोग्यास प्रथमपासून हृद्य व विषहर म्हणून लक्ष्मीविलासगुटी व वातप्रकोपात उपयोगी पडावे म्हणून वातविध्वसन रस याची योजना सुरू असे परतु वातविध्वंसनासारख्या सामान्य योजनेस दाद न देता रोगाची लक्षणें सारखी वाढतच गेली व रोग्याच्या हातापायास गारवा उत्पन्न झाला त्यावेळी रोग्यास महायोजराजगुग्गुळ माक्याच्या रसांतून देण्यात आला महायोगराजगुग्गुळ दिल्यानतर हातापायाचा गारवा कमी होऊं लागून एकदोन दिवसात रोगी बरा होण्याच्या मार्गास लागला (हया ठिकाणी महायोगराजगुग्गुळ देण्याचे कारण पुढे रोगी न २८ च्या हकीकतींत देण्यात आलें आहे )

---

# (२७) कफप्रधान आंत्रिक सान्निपात

**भागचद**, वय वर्षे २२ व्यापारी रोगी न २६ घराण्यातील आन्त्रिकाने आजारी पडल्यानतर पधराव्या दिवशी रोगी चिकित्सेकरिता आला ज्वरोष्मा १०१° ते १०३° अंगात विलक्षण जडपणा नाडी ज्वराच्या मानाने स्तिमित व मंद बोलताना जीभ चाचरणे, एकेक शब्द उमटताना पंचाईत खोकला, खोकताना छाती दुखणे पुढे पुढें फुफ्फुसात मागच्या बाजूने थोडासा शोथ खोकत असता त्या बाजूस दुखणें आठ दहा दिवसानतर थोडा थोडा कफ सुटूं लागला, परतु त्याबरोबरच जडपणा वाटूं लागला बेशुद्धि जास्त झाली, भ्रम वाढला, शब्द नीट उमटेना, घसाहि थोडथोडा वाजत असे अशा स्थितीत रोगी सुमारे चार पाच दिवसपर्यंत होता पुढे पुढे हलके हलके कफ सुटू लागला, बेशुद्धि व बडबड कमी झाली आणि रोग्यास आराम पडला

हया रोग्यास **कफोत्तर वातमध्यम पित्तक्षीण सन्निपात** लक्षणे होती त्यात आन्त्रिकाची इतर लक्षणे तर होतीच व आन्त्रिकाच्या शेवटी शेवटी येणारा पुरळहि यात आलाच परतु केवळ व्याधिप्रत्यनीक म्हणून किंवा आन्त्रिकाकरिता म्हणून औषधयोजना केली असती तर कितपत फलदायी झाली असती याबद्दल सशय आहे या रोग्यात प्रथमपासूनच कफभूयिष्ठ दुष्टीची लक्षणे असल्याने प्रथम **त्रिभुवनकीर्तिरस** व **सितोपलाचूर्ण**

अनुक्रमें ¼ गुंज व २ गुंजा ( औषधाचें प्रमाण असल्या-चिररोगांत जितकें कमी देता येईल तितके बरें असे आमचे मत आहे. ) प्रमाणानें तुळसीचा रस व मध याजबरोबर दिले. पुढे पुढें कफदोष जसजसा वाढत चालला तसतसो **समीरपन्नगरसाची** योजना करणे भाग पडले समीरपन्नग कफाचे स्कन्नत्व कमी करून श्वासवाहिन्यातून कफस्राव करविणारे हृद्य औषध आहे समीरपन्नग दिल्यानंतर लवकरच कफ सुटूं लागून वेगुद्धिहि कमी पडून रोग्यास आराम वाटूं लागला कफवातात्मक किंवा कफोत्तर वातमध्य अशा दोषप्रकोपांत समीरपन्नग उत्तम प्रकारें कार्य करतो हीच परिस्थिति वाढत वाढत तारतम्यपरिकल्पनेने कफदोष अत्यंत वाढले म्हणजे वृद्धतम झाले व घशाशी घरघर वाढली, डोळयात तंद्रा वाढली, श्वासोच्छ्वास करण्यास अडचण पडूं लागली, तर त्या स्थितीत समीरपन्नगापेक्षां मल्लसिंदूराचा उपयोग जास्त होईल.

---

# (२८) आंत्रिकज्वर व कफावृतवायु

**ठाणमल गभीरमल**, वय ४२, धदा व्यापार आन्त्रिकानें आजारी पडल्या-नंतर आठव्या दिवशी उपचाराकरिता आला ज्वरोष्मा १०२° व १०४° असा असे, या रोग्यात प्रलाप, चित्तविभ्रम वगैरे लक्षणे फार जोरात उत्पन्न झाली नाहीत. परंतु **तिसाव्या दिवशी** सर्वांगास एकदम कंप सुटून, हातापायात जाड्य, सर्वांग बहिरावल्या-प्रमाणे होणे व हातापायास गारवा ही विशेष लक्षणे उत्पन्न झाली त्याशिवाय जिव्हाजाड्य व हनुस्तंभ ही लक्षणेहि थोडीफार होतींच. रोग्याचे पोट थोडे फुगल्या-सारखे झाले होते फार आनाह किंवा आध्मान नव्हतें. केवळ पोटात वायु धरून फुगवटी आलेली होती. रोग्याची ही स्थिति फार भयंकर होती. ही सर्व लक्षणे **कफावृत वायूची होती** त्यातल्यात्यात व्यानदुष्टि विशेष दिसली हे सगळे असले तरी सिद्धौषधींपैकी औषध कोणते द्यावयाचे हा प्रश्न दत्त म्हणून पुढे उभा राहिला. विचार करता **महायोगराजगुग्गुळ** हे औषध ह्या ठिकाणी उपयोगी पडेल असे वाटले. **योगराजगुग्गुळाचे** मुख्य कार्य आमयुक्त वाताच्या, विशेषतः आमाने दुष्ट व्यान वायूच्या, विकृतीत फार चांगले होते असा अनुभव कफ व आम यात काही काही बाबतींत गुणसामान्य आणि म्हणून याहि ठिकाणी **योगराजगुग्गुळ** उपयोगी पडावा अशा प्रकारें तर्कप्रतिष्ठ निश्चय करून **महायोगराजगुग्गुळाची** ह्या रोग्यात योजना केली. दोषाचा प्रसर सर्वांगात झालेला असला, तरी मुख्य दोषदुष्टीचें ठिकाण मध्यमकोष्ठ व ग्रहणी हे असल्याने स्थानिक दोषदुष्टीची चिकित्साहि त्याबरोबरच करणे भाग पडले मध्यमकोष्ठस्थ वातदुष्टीकरिता व येथें उत्पन्न होणारी सेंद्रिय विषारेंहि नाहींशी व्हावीं

म्हणून भाक्याच्या रसाची योजना केली  भाका मध्यमकोष्ठस्थ वाताचें प्रशमन करून मेंद्रिय विषारें नाहींगी करणारा आहे  अशा प्रकारें भाक्याच्या रसातून महायोगराज-गुग्गुळ दिल्यानंतर त्याच दिवशी रोग्याची भयंकर दिसणारी लक्षणे कमी कमी होत चालली व सात आठ दिवसात रोगी पूर्णपणे बरा झाला

---

## (२९) पित्तवातात्मक आंत्रिकज्वर

बसंतीबाई ठाणमल, वय १२ ह्या मुलीस ज्वर पहिल्या आठवड्यापासूनच जास्त प्रमाणात असे  १०२° व १०४° असा ज्वरोष्मा सारखा असे  अंगाचा दाह, तगमग, भ्रांति, तृषा, भोवळ, त्याचबरोबर पिवळट रंगाचे जळजळीत असे जुलाव होणे पुढें पुढें बडबड व बेशुद्धि जास्त वाढत चालली  रोग्याची तगमग व तडफड वाढत चालली  निद्रानाश व लागलीच थोडा वेळ निद्रा ही लक्षणें, होता होता रोग्याचा संज्ञानाश पूर्णपणे झाला. ह्या रोग्यास प्रथमपासून पित्तप्रधान दोषप्रकोप, त्यातल्या त्यात पित्ताचे तीक्ष्णत्वादि धर्म वाढलेले असल्यानें ह्यास प्रवाळभस्म (चंद्रपुटी) व गुळवेलीचे सत्व ही औषधे प्रथमपासूनच सुरु केली. ह्यानी पित्ताचे तीक्ष्णत्वादि गुण कमी झाले हे खरें. परंतु निद्रानाश कमी न होता जास्तच वाढला आणि ह्याचें कारण उघडच आहे  वाताचा अनुबंध वाढल्यामुळे निद्रानाशहि वाढला  वातपित्तात्मक दोषाकरिता म्हणून मग सूतशेखररसाची योजना केली  सूतशेखररसाने दोन्ही दोषांचे प्रशमन होऊन रोगी एकविसाव्या दिवसापासून बरा होत होत शेवटी उत्तम प्रकारें बरा झाला

---

## (३०) आंत्रिकज्वर व भयंकर रक्तपित्त

काशीबाई, वय १६, जात मराठा. आंत्रिक ज्वर झाल्यानतर बारा-तेराव्या दिवशी उपचारार्थ आली  ज्वरोष्मा बराच म्हणजे १०२° व १०४° पर्यंत  नाडी अत्यंत वेगवान व तीव्र, बेशुद्धि, वारवार उम्हासे येणे, सारखी तगमग, तृषा, कोरड्या ओकाऱ्या, शीर्षशूल, प्रलाप ही लक्षणे  वाढता वाढता सतरा-अठराव्या दिवशी एकाएकी नाकांतून घुणा फुटून रक्त येऊं लागले. प्रथमत रक्त बेताचें असे  परंतु नंतर दोन्ही

नाकपुडयांतून अविरत सारखा स्राव होऊं लागला केव्हा केव्हा स्राव थोडा बंद होई, तर तोंडातून रक्त यावयास लागे पहिल्या दिवशी केवळ नाकातून व तोंडांतून थुकीबरोबर रक्त येत असे पुढें दोन दिवस ह्या लक्षणाचा अगदी कळस झाला नाकांतून थोडथोडें रक्त येत होतेंच गुळण्याहि रक्ताच्या येऊं लागल्या. शौचावाटें व लघ्वीवाटेंहि रक्त पडत असे जसजसें रक्त जास्त वाहू लागले, नसतशी क्षीणताहि वाढत चालली नाडीचा जोरहि कमी होऊं लागला रोग्यास पित्तप्रधान दोषप्रकोप असल्याकारणानें **सूतशेखररसाची** योजना पहिल्यापासून केलेली होती परंतु पित्ताचे विदग्धत्व कमी न होता तें वाढतच जाऊन शेवटी रक्तपित्ताचा भयंकर उद्रेक झालाच अशा वेळी आयुर्वेदीयाना फार मोठी पंचाईत पडते असिद्धोपधीपैकी पुष्कळ ओषधें यात सागितलेली आहेत आणि त्याचे व्यवस्थित उपयोग चरक वाग्भटादि ग्रंथात दिलेलेहि आहेत. परंतु शहरात रहाणाऱ्या व सिद्धौषधीच वापरणाऱ्या वैद्यास, असल्या परिस्थितीत कोणत्या सिद्धौषधीची योजना करावी हा मोठा बिकट प्रश्न होऊन बसतो हा प्रश्न सोडविण्याकरिताच जवळ जवळ गुणधर्मशास्त्राचा व असल्या हकीकती देण्याचा प्रयत्न आहे. सदरच्या रोग्यास पित्ताचें विदग्धत्व कमी होऊन रक्तवाहिन्याना स्तंभकत्व प्राप्त व्हावे म्हणून व त्यावरोबरच आन्त्रिकविषारहि कमी व्हावे अशाकरिता **प्रवाळ** (**चंद्रपुटी**), **सुवर्णमाक्षिक**, **गुळवेलीचे सत्व**, **हरिद्राचूर्ण** व **आमलकीफललेह** अशी योजना केली ही योजना केल्यानंतर काही कालपर्यंत रक्त कमी झाल्यासारखें झालें परंतु पुनश्च दुसऱ्या दिवशी वर लिहिल्याप्रमाणे रक्त येऊं लागले अर्थात् पित्ताचें विदग्धत्व अपेक्षेप्रमाणे कमी न होता काही कालपर्यंत स्तंभन झाले. मूळ विदग्धत्व कमी होण्याकरिता दुसऱ्या दिवशी **मौक्तिकभस्म**, **प्रवाळभस्म**, **गुळवेलीचे सत्व** व **सुवर्णगैरिक** याचे मिश्रण करून ते **रक्तकमलाच्या फुलांच्या लेहांत** दिलें ह्या मिश्रणाचा मात्र इष्ट परिणाम झाला आणि रक्त हलकें हलकें कमी होऊन दोन तीन दिवसात साफ बंद झालें, आणि रोगी काळाच्या कराल दाढेंतून सुखरूपपणें बाहेर पडला.

---

## ( ३१ ) आंत्रिकज्वर व फुप्फुसशोथ

**सुरजकुवर हिरालाल**, वय वर्षे ५, मारवाडी हा रोगी पहिल्या आठवड्याच्या शेवटी उपचारार्थ आला एकंदर लक्षणे प्रथमपासून मोठी जोराची नव्हती. परंतु तिसऱ्या आठवडयाच्या प्रारंभापासून फुप्फुसशोथाची लक्षणे स्पष्ट दिसूं लागली. श्वासोच्छ्वास वाढले, खोकला थोडा थोडा येऊं लागला, ज्वर वाढला रोग्याची तगमग.

तृषाहि वाढली नाडी जोरदार व भरदार झाली आणि २१ व्या दिवशी नाडी क्षीण होऊं लागली सर्वांगास घाम सुटला, ज्वरोष्मा कमी होत चालला, रोग्याची तद्रा वाढत चालली, छातीत कफ होऊन घरघर असा आवाज होऊ लागला, ह्या स्थितीत ज्वरोष्मा जास्त असता तर औषधयोजना करण्याची मोठी पचाईत पडली असती परंतु ज्वरोष्मा कमीच असल्याने औषधयोजना करता आली. ह्या स्थितीत सिंदूरकल्पाचा उपयोग चागला होतो सिंदूरकल्पापैकी मल्लसिंदूराची योजना ह्या रोगात केली आणि ती चागल्या प्रकारे लागू पडली ह्या स्थितीत वातप्रक्षोभामुळे आक्षेपक म्हणजे झटके येत असते तर मल्लसिंदूरापेक्षा पचसूताचा जास्त उपयोग झाला असता छातीत कफसंचय न होता केवळ शुष्क कास व श्वास असता तर समीरपन्नगरसाचा उपयोग जास्त झाला असता.

---

# (३२) आन्त्रिकज्वर व मस्तिष्कावरणदाह

रोगी ब्राह्मण, वय पाच वर्षे. प्रथम ताप, त्यावर मलेरिया समजून उपचार करण्यांत येत होते. पोटात जंत झाले या समजुतीने त्यास जुलाबहि देण्यात आला, परंतु कशाचाहि उपयोग न होता रोग्याची स्थिति जास्त चिंताजनक झाली व चोविसाव्या दिवशी रोगी चिकित्सेकरिता आला. त्यास पुढील लक्षणे होत होती.

रोग्याच्या खोलीजवळ जाताच त्याच्या कफाची कुजकी घाण येत होती घशात घरघर, डोळे लाल व पापणीची खालची पोटे सुजलेली, जीभ काळसर व काटे आलेली, बद्धकोष्ठ, निद्रानाश, कफावरोवर व शौचाबरोबर रक्त, ज्वरोष्मा सकाळी १०२° व मध्याकाळी १०३° शिवाय चित्तविभ्रम, किंकाळी मारणे मान हलविणे वगैरे मस्तिष्कावरणदाहाची लक्षणे प्रतीत होत होती

याप्रमाणे तिन्ही दोषांचा प्रकोप असता अगोदर कफदोषास जिंकून (कफस्थानानुपूर्व्या वा तुल्यकक्षान् जयेन्मलान्।) मग इतर दोषाची चिकित्सा करावी लागते

सदर रोग्याची छाती कफाने भरली होती व कफाचा स्राव न होता तो आतले आत कुजू लागला होता त्याची सडण्याची क्रिया बद होऊन त्याचा स्राव होऊ लागेल असे औषध त्या ठिकाणी हवे होते म्हणून त्यास खालील मिश्रण दिले —

**रससिंदूर $\frac{1}{8}$ ग्रु + मृगशृंग $\frac{1}{2}$ ग्रु + प्रवाळ (चंद्रपुटी) $\frac{1}{2}$ ग्रु + सुवर्णमाक्षिक $\frac{1}{2}$ ग्रु**

वरील मिश्रणाच्या मारख्या २ पुड्या करून त्या दहा वाजता व चार वाजता मधात देण्यात आल्या

**रससिंदूर** व **मृगशृंग** यानें फुफुसांस शक्ति मिळून कफाची कूज बंद होते आणि कफ सुटूं लागण्यास मदत होते. येथे प्रवाळ व माक्षिक देण्याचे कारण, ज्वरोष्मा जास्त होऊन ज्या भागांतील रक्तवाहिनी तुटली असेल ती साधली जावी व रक्तवाहिन्यांच्या ठिकाणी सकसपणा प्राप्त व्हावा ही दोन्ही कार्ये **प्रवाळ व माक्षिक** याच्यायोगान उत्तम साधतात.

शिवाय सकाळी व संध्याकाळीं रोग्यास पुढील काढा देण्यात आला होता

**जेष्ठमध** -।- तोळा + **खडिसाखर** -।- तोळा + **बेहडेदळ** -।- तोळा + **मनुका** -।- तोळा + **अडुळशाची पाने** ५, पावशेर पाण्यात अष्टमाश काढा करून गाळून द्यावयाचा

**अडुळसा** रक्तपित्तघ्न, शोफघ्न व कफस्रावी आहे. **जेष्ठमध** उपताप कमी करणारा व सारक असून **मनुका** पित्तशामक व सारक आहेत याप्रमाणे योजना केल्यानंतर दोन दिवसात कफाची घाण नाहीशी होऊन तो सुटूं लागला डोळयाची लाली कमी पडून पोटाची सूज ओसरली, कफाबरोबर व शौचाबरोबर येणारे रक्त बंद होऊन शौचास रोज नियमित होऊं लागले ( या विकारात बद्धकोष्ठ असता तीव्र जुलाब केव्हाहि देऊं नये. )

दोन दिवसात इतका फरक दिसून आला, परतु ज्वरोष्मा कमी झालेला नसून मान हलविणे (शिरसो लोठन), निद्रानाश, किंकाळी मारणे, चित्तविभ्रम वगैरे वातपित्तात्मक लक्षणे कायम होती

अशा परिस्थितीत **सूतशेखर** -।- गुंज व **महावातविध्वंस** -।- गुंज याचे मिश्रण सकाळी **तुळशीरस** व **मध** यात देऊन दुपारी व रात्री **लक्ष्मीनारायण, प्रवाळ, गुळवेलसत्व** व **सितोपलादिचूर्ण** याचे यथाप्रमाण मिश्रण मधात देण्यास सुरवात केली सूतशेखरामध्ये सुवर्ण व कज्जली असल्यानें तें हृद्य व सेंद्रियविपार नाहीसे करणारे आहे यामुळे मेंदूकडे जें विकृत रक्त जात होते, व ज्याच्यायोगानें "शिरसो लोठनं" वगैरे लक्षणे होत होती ते रक्त, सूतशेखराच्या योगाने निर्विष झालें त्याचे जोडीला वातविध्वंस असल्यानें शिरसो लोठनं, निद्रानाश, चित्तविभ्रम, किंकाळी मारणे वगैरे वातपित्तात्मक लक्षणे कमी होण्यास मदत झाली. मधून मधून रोग्यास शांत झोंप येऊं लागली लक्ष्मीनारायण स्वेदल व ज्वरघ्न असल्यानें चोविसाव्या दिवशी रोग्यास थोडा घाम येऊं लागला व ज्वरोष्मा सकाळी १००॥° व संध्याकाळी १०१° अंशावर आला. पुढें हाच उपक्रम चालू ठेवला तेव्हा ४० वे दिवशी रोग्यास भरपूर घाम येऊन रोगी मृत्यूच्या मुखांतून बाहेर पडला. रोग्यास शेवटपर्यंत गाईच्या दुधावरच ठेवलें होते.

---

## ३३ कलायखंज ( Loco-motor Ataxy )

रोगी पुरुष, जात ब्राह्मण, वय २३-२४ धंदा खाजगी नोकरी शिक्षित पदवीधर मूळात प्रकृति चांगली, परंतु भावनाप्रधान फार असहकारितेच्या चळवळीत सदर गृहस्थानें कॉलेज सोडून राष्ट्रीय कॉलेजमध्ये शिक्षण घेतलें सार्वजनिक कार्यांत आयुष्य घालविण्याचें ठरविलें त्याप्रमाणे काम करीत असता दिल्लीस जावें लागलें दिल्लीस त्या वेळीं थंडी भयकर असल्यानें ह्या गृहस्थास ती सहन झाली नाहीं आणि अगास मुग्या येऊं लागल्या, सर्वांग बधिर झालें, आणि हलके हलके पायाची शक्ति कमी होत चालली त्यानंतर सदरचे गृहस्थ दक्षिणेत येऊन मुंबई-पुण्यास रुग्णालयांतून दाखल होऊन औषधोपचार घेणे झालें परतु औषधोपचाराचा उपयोग न होता प्रकृति सारखी खालावतच चालली ती इतकी की रोग्यास व त्याला उपचार करणाऱ्या तज्ज्ञासहि रोग्याचें जीवित संशयित वाटूं लागलें रोग्याचे हातपाय सुजलेले, अगदी काष्ठवत् पडलेला हातपाय हालविण्याची ताकद नसे व ते हालतहि नसत डोळ्यांनें दिसणे कमी झालेलें, नेत्रास अभिष्यद सगदर, शौचास फार त्रासानें थोडें व्हायचें मूत्राचें प्रमाण थोडें, लाल व गढूळ असें असावयाचें, दिवसातून फार तर दोन किंवा तीन वेळा मूत्रोत्सर्ग व्हावयाचा नगर येथें आणताना सारखा जीव घावरत असे व थंडगार घाम सुटत असे म्हणून रोग्यास गरम पाण्याच्या पिशव्या सारख्या अगाशी ठेवून येथपर्यंत आणला या स्थितीत रोग्याकडे नुसतें पाहणे भीतिप्रद वाटत असे

या गृहस्थास सकाळीं व रात्री आरोग्यवर्धिनी गोळ्या प्रत्येक वेळी दोन दोन गुंजा गरम पाण्याबरोबर गिळण्यास दिल्या व माध्यान्हकाली म्हणजे दुपारी चार वाजता सहचरसिद्धतैल ( अष्टांगहृदय, वातरोगचिकित्सा ) नुसते घेण्यास सांगितलें मध्यंतरी भगदर चिकित्सेंत वर्णिलेला माणिभद्रयोग दिला ह्या सर्वाचा परिणाम तिसरे दिवशी सदर रोग्यास सरासरी बरें वाटू लागलें, आणि सुमारें तीन चार महिन्यात रोगी उत्तम दुरुस्त होऊन हल्ली आपल्या नोकरीवर काम करीत आहे

---

## (३४) कृमिरोग व सर्वांगशोफ

रोगी लहान चार वर्षांची मुलगी ही मुलगी इतकी सुजली होती की, तिच्या बागडया पिचवून काढल्या होत्या, परकर नेसण्याची सोय नव्हती, पायातील साखळया काढून टाकल्या होत्या सूज सर्वांगाला होती तोंडास डोळ्यावर फार होती ती इतकी की, डोळे मुळींच उघडावयाची सोय नव्हती सर्वांग फिक्कट पडून गेलें असून

मुलगी सारखी कडकडा साजवीत होती पोट भले भक्कम सुजलेले, त्यामुळे दम लागल्या-सारखा झाला होता. बोलताहि येत नव्हते शौचास काही तीव्र विरेचन दिले तर थोडेंसे होई, पण एरवी मुळीच नाही मूत्र बरेच होई असा हा आजार सारखा वाढत वढत पधरा दिवस झालेले होते तोवर त्या मुलीच्या अंगावर लेप, ओढे वगैरे इतके काही घातले होते की तिचा मूळ वर्ण कोणता हेंच ओळखण्याची पचाईत! आणि पोटातहि कसली वाटेल तसली तीव्र औषधें देऊन बिचारीचे तोड आतून सोलून निघाले होते असल्या रोग्याचे निदान होण्याचीच मोठी पंचाईत पडते. आणि ह्या रोगात तर काहीच सोय नव्हती ती मुलगी म्हणजे एक कुरकुलेच म्हणाना! आपलं पुढे आणून ठेवलं व ओळखा रोग व करा उपचार! पण शरीरातर्गत व्यापार व निसर्गप्रतिकार ह्याचें सूक्ष्म निरीक्षण, आपणास असल्या रोग्यातहि कोठे कोठे निदान करण्यास महत्त्वाचा मुद्दा सापडून देतेच

ह्या मुलीचे अंग फार खाजवत होते आणि खाजवल्यानतर सुजेच्याच ठिकाणी जास्त मोठी गाध येऊन सूज वाढावयाची असा क्रम चालत असे ह एक आणि दुसरे असे की, कितीहि तीव्र विरेचक दिले तरी पातळ पण एखाद्याच वेळेला शौचास व्हावयाचे पुढे बद्द त्यामुळें मुलीस पोटास फार ताण बसे ह्याचे कारण काय? ह्याबद्दल विचार करिता असे वाटले की, रोग्याच्या आतड्यात जबरदस्त अडथळा आहे व ज्याअर्थी त्या अडथळ्याची पोट दुखणे, शूळ, ज्वर वगैरे काहीच लक्षणे नाहीत, त्याअर्थी हा अड-थळा स्थिर स्वरूपाचा नसून चलस्वरूपाचा असावा मुलीचे पोट पाहण्याची मुळीच सोय नव्हती इतके ते सुजलेले होतें सबब त्या बाजूने वरील आमच्या धोरणासबधी काही खात्री करून घेता येईना म्हणून सर्व बाजूनी विचार करून ह प्रकरण जतापासून असावे असा विचार करून त्या दिवशी त्याच वेळी जंताचे औषध देण्याचे योजिले

मुलगी फार अशक्त झालेली, किंबहुना तुटलेली, त्यामुळें जंताचे औषध द्यावे की न द्यावे हा निश्चय होईना पण रोगाचे निदान जर जंत हेच बरोबर झालेलं, तर मग त्यावरच ओषधोपचार करणे जरूर होय कारण "निदानपरिवर्जन' हे चिकित्सेचे मूळ मर्म होय तेव्हा मनाचा धडा करून कमी प्रमाणाने जताचे औषध दिले.

सँटोनाईन एक गुज + साखर चार गुंजा

सारख्या चार पुड्या करून दिवसातून दर तीन तासानी अशा चार वेळा ४ पुड्या दिल्या येथे जाता जाता जंताचे औषध इतक्या कमी प्रमाणात देऊन कसे काय भागते, हे सागणे जरूर आहे जताचे औषध एकदम एका मोठ्या मात्रेने दिल्यास ते मूत्रावाटे निघून जाते, आणि व्हावा तसा त्याचा उपयोग होत नाही किंवा त्यापासून मूत्र पिवळे होणे, दृष्टीस सर्व पिवळे दिसणे वगैरे लक्षणे उत्पन्न होतात त्यापेक्षा त्याचे कमी प्रमाण दिवसातून जास्त वेळा देत गेल्यास ते मूत्रावाटे बाहेर जातहि नाही, आणि इष्ट कार्य लवकर व खात्रीने होते, म्हणून असे कमी प्रमाण दिले त्यानतर दुसरे दिवशी

एरंडेल दिलं त्याचा परिणाम सुमारे ५-६ जंत पडले इतकाच झाला बाकी काही फरक पडला नाहीं पण जंत पडल्यामुळे निदान खास बरोबर आहे असा निश्चय झाला

जंत हा विकार किंवा हे प्राणी म्हणा फार लोचट आहेत सेन्टोनाईनने ते गुंगतात, मरत नाहीत आणि गुंगतात तेहि सर्वत्र एकदम गुंगत नाहीत त्यामुळे जितके थोडे गुंगतील तितके विरेचनाबरोबर, विशेषत एरंडेलासारख्या बुळबुळीत विरेचनाबरोबर बाहेर येतात पण बाकीचे तसेच आत राहतात एवढ्याकरिता असल्या रोग्याना तरी वारंवार हे औषध द्यावे लागते त्याप्रमाणे दर चौथे दिवशी जंताची पूड व लागलीच त्यावर एरंडेल असा क्रम सुरू करण्याचे ठरवून पुन चौथे दिवशी तें दिलं त्या वेळी जंत जास्त पडले सन्टोनाईन देण्याच्या दिवसाच्यामध्ये दोन दिवस खालील चूर्ण देत असूं —

वावडिंग ३ मासे + किरमाणी ओवा १ तोळा + स्वादिष्ट विरेचनचूर्ण १ तोळा

ह्यापैकीं १॥ मासा चूर्ण प्रत्येक वेळीं ह्याप्रमाणे दिवसातून दोन वेळा गरम पाण्या-बरोबर देत असूं ह्या चूर्णाची "सन्टोनाईन" ला फार मदत झाली

दुसरे खेपेस जंत पडल्यानंतर पुढे रोज दोन चार जंत पडतच असत त्यामुळे सूज कमी कमी होऊ लागली त्याबरोबर इतर लक्षणेहि कमी होऊं लागली तोंड फारच आल्यासारखे झाले होते त्यासहि गुळण्या वगैरे करण्यास कषाय दिल्यामुळे ते कमी झाले आणि जसजसे जंत पडत गेले तसतसें त्या मुलीस बरे वाटत चाललें सुमारे पधरा दिवसात मुलगी साफ बरी झाली परंतु त्यापुढेहि कृमिविकार कमी व्हावेत म्हणून उपचार सुरू होते

ह्या रोग्यास केवळ शोफनाशक उपचाराचा काही एक उपयोग झाला नसता रोगाचें मूळ कारण काय ते शोधून त्यावर उपचार करणे हा चिकित्सेचा खरा मार्ग होय

कपिला + विडंग + स्वादिष्ट विरेचन या मिश्रणानेहि जंत पडण्याचे कार्य चांगले होते

---

## (३५) हिंवताप

हिंवताप हा रोग साधा वाटतो, पण तो वाटतो तितका साधा नाहीं, हे मी माझ्या स्वत च्या अनुभवावरून सांगतो महायुद्धात जी असंख्य प्राणहानि झाली तिचे खत घालून जी काही शास्त्रीय तत्वाची रोपटी लावली गेली, त्या रोपट्याना अनेक फळे लागलेली आपण पाहतो परंतु आम्हासारख्याकडे शास्त्राला तरी कोठें पाहावयाला वेळ आहे !

मी बलुचिस्थानात पहिल्यानें आजारी पडलो मजबरोबर पुष्कळच लोक ह्या तापानें पछाडले होते आम्हास सर्वांसच हिवतापाचा काळ जें क्विनाईन ते देण्यात आलें. ते टोचण्यातहि आलें त्या वेळेपुरता ताप कमी झाला पण पुन्हा त्यानें सतावण्यास सुरुवात केली नंतर काही दिवस तेथून निघून हवेशीर गावी आलो, त्यामुळें ताप गेलासा झाला. म्हणून पुन्हा पूर्वस्थळी गेलो ज्या दिवशी मी माझ्या पूर्वस्थळी गेलो, त्याच दिवशी माझा तापरूपी वेताळहि मला पछाडण्यास पूर्वस्थळावर आला ! पुन्हा हिमज्वरातक कोयनेलचे चषक सुरू झाले. दंडातहि त्याचा प्रवेश झाला. तितक्यापुरता ताप थांबला पुन्हा महिन्याभरानें त्याची स्वारी अंगात आली. पुन्हा कोयनेलचा तोडगा घातला अशा प्रकारे सुमारे ६–८ महिने चाललें होते रोज कोयनेल घेतच होतो अशा स्थितीतच आम्हास स्थानांतर करावे लागलें त्या श्रमानें पुन्हा तापानें मला पछाडलें. पण त्या वेळी अंथरुणावर पडण्याची सोय नव्हती रोजच्या रोज वीस मैलाचा तरी घोड्यावरून प्रवास करावा लागे प्रवासाच्या अगोदर कोयनेल फाकून निघावें प्रवास झाल्यानंतरहि तें घ्यावें आणि केवळ बहिरटपणानें सर्व व्यवहार करावा उतरत्या दिवसाच्या कोयनेलच्या सेवनानें मी अगदी साफ बहिरा झालो होतो

हल्ली (म्हणजे प्रथम ज्वर आल्यापासून आठ-दहा महिन्यानी) मला ज्वर येत नसे. साधारण बरें वाटे म्हणून एके दिवशी आम्ही बरीच लांबची घोड्यावर सफर करून आलो माझें अंग घामानें अगदी डवडवून गेलें होतें कपडे भिजून चिंब झाले होते त्याच सपाट्यात कडकडून थंडी वाजून आली आणि नंतर ताप भरला दुसरे दिवशी कोयनेल घेतलें, ताप कमी झाला पुन्हा तिसरे दिवशी काही कारण नसता ताप आला. अशा प्रकारें तिसरे दिवशी बरोबर ताप येत असे असें सहा महिने चाललें होतें. कोयनेल घेतच होतो आणि डास नाहीत अशा उंच ठिकाणीहि राहण्याची तजवीज केली होती डास चावत नसत नवे विषार शरीरांत जात नसे तरी ज्वर मात्र बरोबर तिसरे दिवशी अगदी हटकून येतच असे नंतर त्याला कंटाळा येऊन की काय, तो एकदाचा थांबला

ज्वर थांबून चांगले चार पाच महिने झाले होते. मी माझ्या कचेरीत मेजावर ठेवलेल्या विजेच्या पंख्याशी खेळत होतो हात पंख्याच्या पाकळयाजवळ ठेवलेला होता इकडे एकाशी सहज गप्पाहि चालल्या होत्या त्या गप्पाच्या नादात पंख्याची पाकळी बोटास लागली आणि रक्त निघालें. त्याकडे लक्ष गेलें मेजावर कांचेच्या पट्ट्या पडल्या होत्या त्यावर रक्त घेतलें आणि अनायासें रक्त निघालेंच आहे तर पाहूं या. आपण आता तरी हिंवतापाच्या भुताटकीतून पार पडलो की नाही ! ह्या विचारानें सूक्ष्मदर्शकयंत्राखाली ती कांचेची पट्टी योग्य प्रकारें रंगवून ( stain ) ठेवली तो काय आश्चर्य ! हिंवतापाचे

जनकजंतु त्यांत हजर ! तरी मी नियमानें कोयनेल घेतच होतो . बरेच दिवसात ताप नव्हता. अशा स्थितीतहि हे राक्षस आपले माझ्या रक्तात तयार ! आता याला काय करावें ? आणि ह्या एकंदर प्रकाराला काय म्हणावें ? आतापर्यंत जेव्हा जेव्हा कोयनेल टाकलें आहे, तेव्हा तेव्हा रक्त तपासून नंतर घेत असे . अशा प्रकारे ताप नाहीसा झाल्यावरहि मलेरियाचे जंतु रक्तात शिल्लक राहिलेच इतकेंच नव्हे, तर बरा होऊन आज चार वर्षे झाली तरी थोडे जास्त जेवण झालें की पान्थरीजवळ दुखतच असते . मी कोणत्याहि प्रकारे अत्याचार करीत नाही म्हणून ठीक . नाहीपेक्षा हा मलेरियाचा राक्षस माझ्या मानगुटीस पुन्हा बसण्यास कमी करणार नाही असें मला न्यास वाटते

वरील कहाणी एका विद्वान मित्राची आहे . अशाच प्रकारचे कितीतरी रोगी आपणास पाहावयास मिळण्याचा संभव आहे. ह्यासंबंधी जें वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे त्यावरून आपणास खालील गोष्टी लक्षात घेणे जरूर आहे

१ कोयनेल हे औषध हिवतापावर जरी सर्वत्र वापरण्यात येते व जरी त्याने पुष्कळ रोग्याना आरामहि होतो तरी त्याने हिवतापाची प्रत्येक जात बरी होतेच असें नाही

२ त्यातले त्यात चातुर्थिकज्वरावर याचा उपयोग सुकर होतो पण तृतीयकावर कोयनेल ( सत्व ) यापेक्षा सिंकोनाची साल देणे जास्त चांगलें असें काहीकांचे म्हणणे आहे

३ कोयनेल सारखे घेत राहूनहि हिवतापाचे उत्पादक जंतु रक्तात सापडतात . यावरून रक्तात त्यांची उत्पत्ति होण्यासारखी परिस्थिति असेपर्यंत ते उत्पन्न होतच राहणार रक्ताची ही स्थिति बदलण्याकरिता कोयनेलपेक्षा दुसरी काही योजना करणे अशा वेळी जरूर असते

४ प्रत्येक वेळी हिव येण्यास नवेच किंवा शरीरात जाणे जरूर नसते डास नसल्या जागी जाऊन राहिलें तरी सुद्धा ज्वर येतोच . तेव्हा ज्वराचे जंतु एकवार शरीरात असले का त्यांची वीण आपोआप अनुकूल परिस्थिति प्राप्त झाली की होते

# ( ३६ ) गर्भिणीचा पक्षघात

एका सात आठ महिन्याच्या गरोदर बाईस एकाएकी **पक्षघाताचा रोग** झाला. आणि त्याने बाईची मोठी वाईट स्थिति झाली . बोलणे, हालणे, चालणे तर दूरच, परंतु गिळणेंहि बंदच झालें. अशा स्थितीत उपचार करणे किती अवघड ! परंतु

आयुर्वेदीय औषधीच्या योगानं बाईचा अर्धांगवायु बरा होऊन बाई सुखानं प्रसूत झाल्या आणि मूल व बाई दोन्हीहि उत्तम निरोगी स्थितीत आहेत. बाईंना स्मृतिसागर प्रथम चार दिवस दिला आणि नंतर ताप्यादि लोह दिला दोन्ही औषधाचा परिणाम फारच चागला झाला

---

## (३७) धनुर्वात कां अर्धांगवात?

रोगी मारवाडी स्त्री, वय ३० कानाचेवर डोक्यास मस झाला म्हणून बाईंनं त्याम चुना व सोडा मिश्र करून लावला. क्षाराचे योगानं ती जागा भाजली गेली व तेथे जखम झाली तेव्हा बाई जखम धुण्यास डॉक्टरकडे जाऊ लागली चौथे दिवशी बाईचे तोंड वाकडें झालें व ते चागलेसे उघडता येईना म्हणून डॉक्टरना आणण्यांत आले डॉक्टरसाहेबानी titanus ( धनुर्वात ) ठरवून आपल्या मदतीस दुसऱ्या डॉक्टरना आणण्याबद्दल शेटजीस सागितले दोघाच्या समतीनं वरील निदान कायम झाले व रोग्यास titanus anti-toxin ची ९ इंजेक्शन्स दिली गेली

बाईच्या डोक्यास जखम झाली व तोंड वाकडे झाले पुढे तीस धनुर्वाताचे झटके येतील अशी डॉक्टरद्वयाची खात्री झाली आयुर्वेदात, जखम झाल्यापासून, गर्भपात झाल्यामुळें जखम झाल्यापासून, सूतिकारोगात जखम झाल्यापासून, ती जखम दुष्ट होऊन हा रोग उत्पन्न होतो असे वर्णन आहे हा रोग जखमेंतून एक प्रकारचे जंतुजन्य विषार शरीरात पसरल्यामुळे उत्पन्न होतो आणि त्या दृष्टीनं वरील डॉक्टरद्वयाचें निदान चुकीचे होतें असे कोण म्हणेल? सदर रोग्याची जखम आरभापासूनच धूत गेल्यामुळें तेथें जंतुजन्य विषार उत्पन्न होणे शक्य नव्हते, शिवाय धनुर्वाताचें पूर्वरूप दाभाड बसणे हेंहि नव्हते व रोग्यास धनुष्यवत् झटकेहि येत नव्हते अशा परिस्थितीत शरीरात इंजेक्शनद्वारे प्रतिविष घातले गेले याचा परिणाम असा झाला की, बाईच्या सर्वांगभर लाल रगाच्या बोराच्या आकाराच्या पुळया उत्पन्न झाल्या, रोग्यास ज्वर येऊ लागला व दाह, घबराट व पुळयाच्या ठिकाणी सुया टोचल्याप्रमाणे भयंकर वेदना होऊं लागल्या झोप येईनाशी झाली व रात्रंदिवस रोग्याच्या डोळयासमोर इंजेक्शन करणारा डॉक्टर यमाप्रमाणें दिसू लागला. आपण त्यातून वाचत नाही अशी बाईची खात्री झाली, तेंव्हा केवळ अनुभव मिळविण्याकरिता म्हणून ही केस घ्यावी अशी शेटजीनी इच्छा दर्शविली व मीहि "कर्मण्येवाधिकारस्ते" या न्यायानं चिकित्सेकरिता दाखल करून घेतली. प्रत्यक्ष रोगी पाहता त्यास खालील लक्षणे दिसत होती:—

बाईस अर्ध्या इंचापेक्षा जास्त तोंड उघडता येत नव्हते तोंड वाकडे, बोलण्यास त्रास, ज्वर, दाह, घबराट, कर्णबाधिर्य, दाताचे ठिकाणी पीडा, डावा हात जड, डावा डोळा लहान, निद्रानाश, सर्वांगभर लाल रंगाच्या पुळया व त्यास सुया टोचल्याप्रमाणे वेदना वगैरे सर्व अर्दिताची लक्षणे दिसून आली अर्दित हा अर्धांगवाताचा एक भेद आहे कित्येक ठिकाणी अर्धांगवातालाच अर्दित म्हटलेले आहे हे पुढील वचनावरून दिसून येईल मुखार्धवच्छरीरार्धं व्यापकोऽप्यर्दितं स्मृतं । अर्धे तस्मिन्मुखार्धे वा केवले स्यात्तदर्दितम् ॥ च० चि० अ २८

अर्धांगवात हा विकार त्रासिक, चिडखोर, सतापी व ज्याच्या रक्तवाहिन्या उपदंशादि विकारामुळे विकृत झालेल्या असतात अशा माणसास होतो मनाच्याविरुद्ध काही गोष्टी झाल्यामुळे, असल्या तिडतिड्या माणसास एकाएकी संताप येऊन एकदम सर्व शरीरभर खळबळ उडून जाते त्यामुळे विकृत झालेल्या रक्तवाहिन्यात रक्तसचय जास्त होऊन त्याचा दाब मेंदू व वातवह केंद्रे यावर होऊन पक्षाघात उत्पन्न होतो, किंवा रक्तवाहिनी फुटून तिच्यातून रक्तस्राव होऊ लागतो आणि रुधिराचा साठा ज्ञानकेंद्राचे बाजूला झाल्यामुळे त्या माणसाची जाणीव नेणीव नष्ट होते किंवा थोड्या अशाने कमी होते रुधिराचा स्राव ज्या बाजूस होईल त्याचे विरुद्ध बाजूचे अंग लुळे पडते

अर्धांगवाताची वर दिल्याप्रमाणे सप्राप्ति असल्याने " निदानपरिवर्जनम "या न्यायाने रक्तवाहिनीत झालेल्या रक्तसचयाचे प्रसादन करणे व रक्तवाहिनी तुटली असेल तर ती सांधली जाणे व वातवाहिन्याचा क्षोभ नाहीसा करणे इत्यादि गोष्टीकडे लक्ष पुरवावे लागते वरील रोग्याची ज्वरदाहादि लक्षणे लक्षात घेता त्यास खालील मिश्रण देण्यात आले

प्रवाळभस्म २ गुंजा+गुळवेलसत्व २ गुंजा+चद्रकला २ गुंजा

वरील औषधाच्या सारख्या तीन पुड्या करून त्या सकाळ, दुपार, सध्याकाळ दाडिमावलेहातून देण्यास सुरुवात केली व पुळयास लावण्यास व्रणरोपक व जतुघ्न मलम (कडूनिंब, पिवळा धोतरा व शमीपत्र याचा) करून दिला व रोग्यास गाईचे दूध देण्यास सुरुवात केली

प्रवाळ हे रक्तप्रसादन करणारे, रक्तवाहिनी फुटली तर ती सांधणारे व त्यात सकसपणा प्राप्त करून देणारे दाहशामक, ज्वरघ्न व प्रतिविषाचे दुष्परिणाम नाहीसे करणार असे औषध आहे

चद्रकला पित्ताचे तीक्ष्णोष्णादि धर्म नाहीसे करणारे, पित्ताचे साम्य प्रस्थापित करणारे, दाहनाशक, मूत्रल, शामक, कोष्ठस्थ पित्ताचे योग्य प्रमाणात निःसरण करणारे, यकृताला शक्ति देणारे, मदहार व वातवाहिन्याची केंद्रे व वातवाहिन्या यात उत्पन्न झालेला क्षोभ शमविणारे, कफप्रधान व कफवातप्रधान दोषाचे शमन करणारे, सेंद्रियदोष व प्रतिवि[illegible] नाहीसे करणारे असे हे वीर्यवान् औषध आहे गुळवेल सत्व दाहशामक व ज्वरघ्न [illegible]

आहे याप्रमाणें योजना सुरू केली तेव्हा आठच दिवसात रोग्याची ज्वरदाहादि सर्व लक्षणे नाहीशी झाली, अंगावरील पुळया साफ मावळून त्यातील वेदना नष्ट झाल्या, रोग्यास शांत झोप येऊं लागली. रोग्यास तोंड उघडता येऊं लागून थोडथोडें चावताहि येऊं लागलें इतके सर्व झालें, परंतु रोग्यास एक मिनिटभर तोंड उघडें ठेवण्यास सांगितलें की तें आपोआप वाकडें होई व डोळयातहि विशेषसा फरक दिसेना तेव्हा रोग्यास एक वेळ लोण्याबरोबर उडदाचे वडे खाण्यास दिले

नवनीतेन संयुक्ता खादेन्माषेण्डरी नर:।
दुर्वारमर्दितं हन्ति सप्तरात्राश संशय ॥ योगरत्नाकर

कानात नारायणतैल ( कर्णपूरण ) टाकण्यास देऊन तेथील साध्यासहि चोळण्यास सांगितलें व मिठानें शेकण्यास सांगितलें यामुळें बाईचें कर्णबाधिर्य नष्ट होऊन साध्याचे ठिकाणी स्वस्थता प्राप्त झाली व पोटात योगराजगुग्गुळ चार गुंजा महारास्नादि काढ्यानून देण्यास सुरुवात केली योगराजगुग्गुळ रक्तप्रसादन करणारा, वीर्यवर्धक व महारास्नादिकाढ्यानून दिला असता सर्व वातरोग नाहीसा करणारा आहे तर महारास्नादिकाढा सर्वांगवात, एकांगवात, तूनी, प्रतूनी, कंपवात, आमवात, हनुग्रह, जिव्हास्तंभ, अपतानक, अर्दित, गृध्रसी इत्यादि वातरोगाचा नाश करणारा आहे

याप्रमाणे एक आठवडाभर उपक्रम सुरू केला, तेव्हा रोग्याचें तोंड पूर्ववत् चांगलें झालें, डोळा पूर्ववत् झाला व त्याची सर्व लक्षणें नष्ट होऊन तो पूर्ववत् घरातले घरात हिंडूं फिरूं लागला मध्यंतरी शौचास अवरोध झाल्यास त्यास एरंडेल देण्यात येई या भयंकर व्याधीतून रोगी परमेश्वरकृपेनें शीरसलामत बाहेर पडला

---

## (३८) गुदस्थ वातप्रकोप

प्रायस्तिर्यग्गता दोषा क्लेशयन्त्यातुरांश्चिरम्। कुर्यान्न तेषु त्वरया देहाग्निबलवित् क्रियाम्॥ शमयेत्तान् प्रयोगेण सुखं वा कोष्ठमानयेत्। ज्ञात्वा कोष्ठप्रपन्नांश्च यथासन्नं विनिर्हरेत्॥ (वाग्भट)

रोगी---स्त्री, वय ५१ (वातकाल), कृश, पिठूळ व रूक्ष अन्न सेवन करणारी

काल---वर्षाऋतु ( चिकित्सेच्या वेळी आकाश अभ्राच्छादित, मेघाचा गडगडाट व शीत वारा सुटलेला).

लक्षणे---मलमूत्रग्रह, मूत्रशर्करा, आध्मान, शूल, मनोव्यापार उत्तेजित झालेले ( mental excitement ), शारीरिक क्रिया जलद, शरीर काही प्रमाणात ताठरलेले ( rigid ), स्वेद, काहीहि गिळताना त्रास, श्वासोश्वास उथळ व शीघ्र.

रोगी प्रथम आधुनिक वैद्यकशास्त्राधारे चिकित्सलेत होता. चौकशी करता आधुनिक वैद्यक शास्त्राधार केलेली चिकित्सा narcotics, depressants, glycerine syringe, साबण व पाणी यांचा बस्ति अशी होती. बस्ति परत येत नसे त्यामुळे त्रास वाढतच असे.

वर जी मुख्य लक्षणे दिलेली आहेत त्यामध्ये स्वेद या लक्षणाव्यतिरिक्त इतर सर्व लक्षणांस अपानवायूची दुष्टि (गुदस्थ) कारण आहे हे सहज कळून येईल.

दोषगति तीन प्रकारच्या आहेत. ऊर्ध्वग, अधोग व तिर्यग. या गति स्वाभाविकहि आहेत व अस्वाभाविकहि आहेत. म्हणजे अपानाची जी गति स्वाभाविक तीच प्राणाची अस्वाभाविक होऊ शकते. या व्याधीमध्ये अपानगति तिर्यक् व ऊर्ध्व अशी झालेली आहे. दोषविज्ञानशास्त्राधार या गति अस्वाभाविक अगर विकृत आहेत. ऊर्ध्वगतीने तो हृदयापर्यंत आलेला आहे व तिर्यग्गतीने तो स्नायूमध्ये गेलेला आहे. म्हणूनच मानसिक व शारीरिक व्यापार उत्तेजित झालेले आहेत. स्नायु ताठरलेले (rigid) आहेत.

या ठिकाणी दोन विधान केलेली आहेत. एक वायूची ऊर्ध्वगति हृदयापर्यंत आलेली आहे व दुसरे तिर्यग्गति मांसधातूमध्ये गेलेली आहे. हे कसे ?

आत्मा, बुद्धि व मन यांचे आश्रयस्थान हृदय आहे. उन्माद व अपस्मार या दोन्ही व्याधींमध्ये हृदय व मन दुष्ट होत असतात व दोषहि उन्मार्गगामी असतात. पण लक्षणात भिन्नता असते. ज्याअर्थी लक्षणात भिन्नता आहे, त्याअर्थी संप्राप्तीमध्ये फरक असलाच पाहिजे. उन्मादात मनोविभ्रम, तर अपस्मारात स्मृतिनाश. शारीरिक व मानसिक दोष विकृत होऊन उन्मार्गगामी झाल्याने मनोवह स्रोतसे बद्ध होतात व मनास मद उत्पन्न होतो, तर अपस्मारात चित्त अभिहत होऊन धीसत्वाचा संप्लव (नाश अगर संक्षोभ) झाल्याने हृदय व संज्ञावह स्रोतसे दोघानी व्याप्त होतात असे संप्राप्तिदृष्ट्या दोहोंमध्ये स्वच्छ फरक आहेत. या रोग्यात मनोवह व संज्ञावह स्रोतसांच्या दुष्टीचा प्रश्नच येत नाही. तर दोषगति उन्मार्गगामी होऊन हृदयापर्यंत गेल्याने हृदय व हृदयस्थ मन यांचे व्यापार उत्तेजित झालेले होते. या वेळी हृदयाचे ठोके ११८ होते. येथे मनास मद आलेला नाही, धी-मनाचा संप्लवहि झालेला नाही व मनावरील बुद्धीचा ताबा संपूर्णपणे नष्ट झालेला नाही. काही व्याधीत मन उत्तेजित न होता फक्त हृदय होऊ शकते. येथे दोषगति मेंदूपर्यंत गेलेली आहे असे मानले, तर मोह हे लक्षण निर्माण झाले असते. नेत्र, कर्ण वगैरे ठिकाणी काही विकृत लक्षणे दिसली असती व संज्ञावह-स्रोतसे विकृत झाली असती.

विकृतवायु ऊर्ध्वगतीने हृदयापर्यंत आलेला आहे, हे वरील विवेचनावरून सिद्ध झाल्यावर तिर्यग्गतीने तो मांसधातूत गेलेला आहे याचे विवेचन करावयाचे. मांस-धातूत वायु गेला तर शरीर हे अतिशय ठणकते (तोद) हे लक्षण येथे आहेच. शिवाय

शरीराचें आकुंचन व प्रसरण हे स्नायूंच्या व वायूच्या सुस्थितीवरच अवलंबून असतें. ज्या वेळी या क्रियेमध्ये बिघाड होतो, त्या वेळी वायूमध्यें किंवा मांसधातूमध्यें विकृति निर्माण झाली आहे असें मानावयास हरकत नाही ज्या वेळी विकृत वात मासधातूमध्यें उत्तान असेल, त्या वेळी तोद (ठणका) हें लक्षण मुख्य असेल. तो जेव्हा लीन होईल, त्या वेळी ताठपणा ( rigidity ) हें लक्षण निर्माण होईल. ठणका हें लक्षण असेलच.

आता इतर लक्षणाचा विचार करावयाचा मलमूत्रग्रह हें एक महत्त्वाचें लक्षण आहे मलमूत्र विसर्जन करणे हें वायूचें–अपानवायूचें–कार्य आहे. या ठिकाणी अपान-वायु विकृत असला, तरी अतिवात मलमूत्र बंद होण्याचें कारण नाही पण रूक्षगुणानें अपानविकृति गुदस्थानी झाल्यानें मलमूत्रग्रह हें लक्षण निर्माण झालें. इतकेंच नव्हे, तर मुतखडे ( शर्करा ) बनले वायूच्या प्रतिलोमगतीमुळेच श्वासोच्छ्वास उथळ व शीघ्र होऊं लागले

येथें स्वेद हें लक्षण का निर्माण झालें ? स्वेद हें लक्षण स्वेदवर्धक पित्तज मेदोगत सन्निपात ज्वरात निर्माण होत असतें पण येथें ज्वरच नसल्यानें यापैकी स्वेद लक्षणास एकहि कारण नाही अपानदुष्टीनें समानदुष्टि होत असते व समान पित्तावृत झाला की, स्वेद हें लक्षण निर्माण होतें पण स्वेद हा या ठिकाणी बलवान उपद्रवहि नाही व स्वतंत्र व्याधीहि नाही

विकृतदोष अपानवायु हें सिद्ध झालें विकृतस्थान गुदच यास काही प्रमाण ? पक्वाशयगत वातदुष्टि असती तर मलमूत्र, कष्टानें का होईना झालें असतें आमा-शयगत वातविकृति असती, तर तृष्णा, उद्गार, कंठशोष ही लक्षणे दिसली असती सर्वांगकुपित वातविकार असता, तर गात्रस्फुरण व गात्रभंजन ही लक्षणें दिसली असती एकच दोष स्थानभेदानें विकृत झाला की, तो व्याधीहि भिन्न निर्माण करतो हें अग्नीच्या उदाहरणानें सिद्ध करता येईल हाच नियम विकृत व अविकृत दोषाना लागू आहे. या ठिकाणी दोष लीन आहेत

वरील एकदर विवेचनाचा निष्कर्ष इतकाच की, विकृतस्थान गुद, विकृतदोष अपानवायु, ऊर्ध्वगतीनें तो हृदयापर्यंत आलेला, तिर्यग्गतीनें मासधातूंत गेलेला दोष लीन हीच सम्प्राप्ति दृष्टीसमोर ठेवून चिकित्सेस सुरवात करावयास पाहिजे

वरील रोगी आला त्या वेळी व्याधि अत्यंत तीव्र स्वरूपात होता मुखावाटे काही दिलें तर तावडतोब बाहेर पडावयाचें बस्ति देण्याची तर सोयच नव्हती निद्रा आणणारी, शूल कमी करणारी सूचिकाभरणें (injections) दिलेलीच होती. पुष्कळ विचारानें खालीलप्रमाणे चिकित्सोपक्रम सुरू केला.

गुदपक्वाशयस्थे तु कर्मोदावर्तनुद्धितम ।—चरक

उदावर्तचिकित्सेचा क्रम असा:—

(१) उष्णवीर्य औषधिसिद्ध तेलाचा अभ्यंग (२) स्वेद (३) वर्ति (तीक्ष्ण व अनुलोमक औषधींची) (४) निरूहबस्ति (५) अनुलोमक अन्न —चरक

प्रथम रोग्यास गरम खोलीत ठेवला (शेगड्या पेटवून) नंतर वाग्भट ज्वरचिकित्सेंत ज शीतज्वरनाशक तगरादि तैल सांगितले आहे त्याचा तीन तास अभ्यंग करून ३ तोळे तेल मर्दनाने अंगात जिरवले उष्णवीर्य औषधांचे तेल स्पर्शानेहि उष्ण असावयास पाहिजे म्हणून कोमट तेलाने मर्दन केले

नंतर रोग्यास बाजेवर निजवून निर्गुंडी + सैंधव यांच्या काढ्याने वाफारा दिला. स्वेदन क्रिया करीत असताना हृदयाकडे विशेष लक्ष दिले पाहिजे त्यासाठी मधून सुवर्णसूतशेखराचे चाटण जिभेवर चाटवत असे असा दोन वेळ घाम काढला

निशोत्तर कल्क ओवा, हिंग, सैंधव या औषधींमध्ये वर्ति तयार करून गुदामध्ये ठेविली अर्धा तास झाला तरी मल बाहेर येईना मात्र वायूचे अनुलोमन झाले

निरूहबस्ति —निशोत्तराचा काढा ½ आटवून काढ्याच्या ½ स्नेह मिसळून थोडेसे सैंधव टाकून बस्ति दिला बस्ति अर्धा तास बाहेर आला नाही, म्हणून पुन्हा वरील वर्ति गुदात ठेविली वर्ति ठेवल्यानंतर दहा मिनिटांनी मलाचे घट्ट असे ३६ खडे बाहेर आले (वजन ८७ तो) मलाचे खडे पडल्याबरोबर सर्व लक्षणे निम्याने कमी झाली नंतर रोग्यास पेया, तूप व सैंधव या अन्नावर तीन दिवस ठेविले तिसरे दिवशी पुन्हा बस्ति दिला पुन्हा मलाचे खडे पडले तीन दिवसानंतर पातळ भात व मांसरस यावर रोग्यास ठेविले १० दिवसानंतर रोगी संपूर्ण बरा झाला

शरीर व व्याधि यांचे स्वरूप व सबल लक्षात न घेता व्याधि बलवान् म्हणून व्याधि-प्रत्यनीक चिकित्सेच्या आधाराने तीव्र वीर्य औषधांची योजना केली, तर त्याचा शरीर बलावर परिणाम होऊन उलट व्याधि वाढतो. जेथे व्याधि बलवान् असून दोष लीन असतात, तेथे सौम्यवीर्य पण योग्य असाच औषधींची योजना झाली पाहिजे

---

## (३९) ओजक्षय (Neurasthenia)

रोगी वय ४०, पुरुष, ब्राह्मण रोगी अगदी श्रमिष्ट परिस्थितीत होता रोग्यास श्रमण फार होत असे व असे वाटे की, कोठे तरी पळून जावे रोग्याचा चेहरा काळजीयुक्त, मलूल आणि निस्तेज असा होता, सर्वांग जड व रोग्यास परसाकडे साफ होत नसे ढेकर फार येत असत, भूक लागत नसे पोटात वाताची अनुलोमनक्रिया बरोबर होत नसे, उलट ऊर्ध्व होत असे रोग्याचे मनोदौर्बल्य

फार होते, रोगी कोणत्याहि गोष्टीसंबंधाने काळजी करीत असत असे जगण्यात काही अर्थ नाही, आतां आपण मरणार, आत्महत्या करावी वगैरे विचार त्याच्या मनात येत स्मृतिभ्रंशहि बराच झाला होता रोग्याचे तोंड आले होते रोग्याची प्रकृति पाहिली व इतर काही मानसिक कारणे आहेत किंवा काय ह्याविषयी चौकशी केली रोग्यास उत्तमपैकी नोकरी असून रोग्याची आर्थिक परिस्थिति बरी होती तसेच इतर मानसिक काहीहि कारण नव्हते रोग्याचे तोंड येण्याची नेहमी तक्रार असे ह्याला कारण अग्निमांद्य हे होय रोग्याच्या हिरड्यातून पू येत असे त्यामुळे अग्निमांद्य होत असे व अपानादि वायूंची दुष्टि व रसादि धातूंची दुष्टि झाली होती प्रथम आम्ही पायोरियावर चिकित्सा केली पित्तशामक, अग्निदीपक, स्निग्ध व वातानुलोम करणारे व सातहि धातूंना पुष्ट करणारे असे गधकरसायन ह्याची योजना केली व त्याजबरोबर पुढील ओषधाचे मिश्रण दिले

**गधकरसायन** १ गु + **वगभस्म** ½ गु + **सुवर्णमाक्षिकभस्म** ½ गु + **शखभस्म** १ गु +**जहरमोहरा** २ गुजा, पुड्या दोन हे मिश्रण अपानकाली जेवणापूर्वी तुपातून देत असू ह्याने वाताची अनुलोमन क्रिया बरोबर होऊं लागून रोग्याचे भ्रमण कमी झाले हीच योजना काही दिवस चालू ठेविली रोग्याचे तोंड येणे वगैरे सर्व कमी होऊन रोग्यास शौचास साफ व्हावयास लागली व थोडी थोडी हुषारी वाटूं लागली सदर मिश्रण तसेच एक महिनाभर दिले व त्याच्या जोडीला **च्यवनप्राश** रोज सकाळी १ तोळा व गाईचे दूध हे घेण्यास सांगितले च्यवनप्राश हे उत्तमपैकी रसायन असून त्यात जीवनीयगणातील औषधे आहेत गाईचे दूध हे उत्तमपैकी स्मृति, मेधा, ओजवर्धक आहे रोग्यास च्यवनप्राश घेतल्यापासून जास्त हुषारी वाटूं लागली, भूक लागूं लागली व वाताची अनुलोमन क्रिया उत्तम होऊं लागली, स्मृति येत चालली व भ्रमण अजिबात गेले रोग्याने सहा बाटल्या च्यवनप्राशाच्या घेतल्या रोग्याचे वजन त्याने एकंदर २५ पौंड वाढले व चेहऱ्यावर हुषारी, आनंदी वृत्ति दिसूं लागली रोग्यास आजारी असताना सस्नेह ताक, दूध, फळे, पालेभाज्या, भात, पोळी, भाकरी ह्यावर ठेवले होते डाळीचे सर्व पदार्थ वर्ज्य केले होते

धीधैर्यात्मादिविज्ञानम् मनोदोषौषधं परम् ।

हे सूत्र मनोदोषावर आपल्या इकडे सांगितले आहे व त्याप्रमाणे रोग्यास गीता, दासबोध वगैरे अध्यात्म ग्रंथ वाचण्यास सांगितले हे ग्रंथ वाचले असता मनाची तयारी उत्तम होते

---

# (४०) सर्वांगशोफ

रोगी वय ६ मुलगी, हिंदु वाणी. मे महिन्यात देवीची साथ फार जोरात होती. त्या साथीत ह्या मुलीस सर्व अंगभर भयंकर देवी आल्या होत्या. देवीच्या खपल्या पडून पुढे सर्वांगावर भप्प सूज आली होती. तोंड, हात, पाय, पोट ह्या सर्वांवर सूज होती व ती सूज रोगी ज्या बाजूस निजे त्या बाजूस जास्त होत असे. रोग्यास कंडू सर्वांगास फार होती. वांति हें लक्षण भयंकर होतें. काही खाल्लें प्यालें की ओकून पडत असे. त्यात वातलक्षणे (uraemia) नव्हती. म्हणून औषधियोजना करण्याचें ठरविलें. लघ्वीची परीक्षा केली असता त्यात अल्ब्युमिन सापडलें. लघ्वी थोडी लालसर होत असे.

ह्या रोगास मूळ कारण देवी येणे हें होय. देवीमध्येंसुद्धा रक्त आणि पित्त हे दुष्ट झालेले असतात. त्यानंतर त्या रोग्यास सर्वांगशोफ झाला. देवी ह्या त्याला कारण झाल्या. ह्याला आपल्या इकडे निदानार्थकर रोग असे म्हणतात. (निदानार्थ-करो रोग ।) सदर रोगी मे महिन्यात (ग्रीष्मऋतु) आला होता. खानदेशमध्यें ह्या वेळेस उन्हाळा फार असतो. त्यामुळें रक्ताचे विकार फार पाहण्यास मिळतात. विशेषत लोकांचे घोळणे फुटणे (रक्तपित्त ऊर्ध्वग), ऊन जास्त असल्यामुळे मूर्च्छा येणे, ताप येणे (sun stroke) वगैरे रक्तपित्तज विकार पाहण्यास मिळतात. देश, द्रव्य, दोष वगैरेंचा विचार करून त्यास खालील काढा व चाटण दिलें.

बोरीची साल ३ मासे + गोखरू ३ मासे + पुनर्नवा इदेत ३ मासे + अनंतमूळ ३ मासे + मजिष्ठ ३ मासे + बाभळीची साल ३ मासे + बकुळ साल ३ मासे + बाळ हिरडे ३ मासे + पाणी ३ कप (३० तो.) ½ काढा. त्यात सूर्यक्षार ४ गुंजा + नवक्षार ४ गुंजा, पुडी १ काढ्यात टाकून वरचेवर (मुहुर्मुहु) देण्यास सांगितलें. कारण त्यात वांति हें त्रासदायक लक्षण होतें. काहीहि खाल्लें की ओकून पडत असे.

चाटण—गोरोचन मिश्रण ४ गुंजा (देवी आल्या होत्या म्हणून) + सुवर्णमाक्षिक १ गुंज + उन्हाळ्याचें औषध ४ गुंजा, पुडी १, मधात चाटण वरचेवर देत असत. सदर काढा व चाटण द्यावयास लागल्यापासून रोग्याची वांति हें लक्षण तेव्हाच कमी झालें व सूज उतरण्यास सुरवात झाली. ती सात दिवसात अजिबात उतरून गेली. काढ्याची सगळी औषधें रक्तपित्तशामक व शोथहर अशी आहेत. त्याचप्रमाणे चाटणहि असेंच आहे. सूर्यक्षार याला सोरा असें म्हणतात व नवक्षार म्हणजे नवसागर हे दोन्ही क्षार शोथहर आहेत. क्षार सूक्ष्मस्रोतोगामी असून कफाने रुद्ध झालेली स्रोतसें ह्याने मोकळी होतात. सूर्यक्षार ह्यासारखे स्रोतसें मोकळी करणारे औषध ह्यामध्ये अवश्य वापरावें. सूर्यक्षार मुहुर्मुहु दिला असता सर्व लक्षणे कमी होतात. त्यानंतर रोग्यास तो काढा व औषध चौदा दिवस दिलें. सूज तर सातच दिवसात उतरली.

पुढे शक्तिवर्धक म्हणून लघुमालिनीवसंत + माक्षिक + प्रवाळ + गुळवेलसत्व असे मिश्रण दिले त्याने रोगी थोड्याच दिवसांत हिंडू फिरूं लागला रोग्यास आजारी असतांना दूध व मोसंब्याचा रस यावर ठेवले होते रोगी पूर्ण बरा झाल्यावर त्यास अन्न देण्यास सुरवात केली

---

## ( ४१ ) कुक्ष्युदर (Pleurisy with Effusion)

रोगी स्त्री, वय २७, ब्राह्मण रोगी बरेच दिवस मधून मधून आजारी पडे मधून बरा होई अशी स्थिति सुमारे दोन वर्षे होती नंतर हवाफेर करण्याकरिता येथें नगरास आणला बाई एरवी चांगली धडधाकट व निरोगी असे प्रथमत काही दिवस थंडी वाजून ताप आला तो काही दिवसाच्या उपचाराने बरा झाला नंतर पुन्हा बारीक ताप येऊं लागला तोहि काही दिवस देशी हवेवर गेल्याने बरा झाला. पुन्हा सुवई व पुन्हा ज्वर, असा क्रम बरेच दिवस चालला याचा परिणाम असा झाला की बाई बरीच क्षीण झाली आणि नंतर जेव्हा ज्वराचा वेग वाढला व बाईचे जीवित संशयित वाटूं लागले, तेव्हा बाई येथे आल्या

बाईस ज्वर सारखा रोज असे आणि तो ह्या खेपेस चांगला दोन महिन्यावर येत होता यकृत वाढलेले, प्लीहा मोठी झालेली खोकला सतस्वी, कोरडी ढास खोकून खोकून हैराण छातीच्या बाजूने कुशी व पाठ डाव्या अंगास बिघडलेली फुफ्फुसावरणात थोडे थोडे पाणी साठलेले तोंडावर, अंगावर फिक्केपणा व सूज, पण फार थोडी मुख्यत खोकला व ज्वर ही भयंकर त्रासदायक लक्षणे कुशी जड आल्या-प्रमाणे, त्यात चमका, अस्थिरता, अस्वास्थ्य फार.

हा विकार फार त्रासदायक चिरकारी व बहुश असाध्य असतो परंतु ह्या रोग्यात बल बरे असल्याने चिकित्सेनें उत्कृष्ट फायदा झाला कुक्षीत साठलेले पाणी नाहीसे झाले यकृत्प्लीहाची वृद्धि नाहीशी झाली आणि दोन महिन्याच्या उपचाराने बाई उत्तम दुरुस्त झाली

ह्या रोगात मुख्यत स्रोतोरोध झालेला असतो आणि त्याचमुळे फुफ्फुसावरणा-सारख्या अवयवात पाणी साठूं लागते स्रोतोरोध विघटन उरस्थ रोध कमी करण्या-करिता ह्या रोगात भारंगमूळ वापरले भारंगमूळाबरोबर देवदार, पुनर्नवा ही दोन औषधे शोथघ्न, मूत्रल, हृदयास शक्ति देणारी म्हणून वापरली काढा –भारंगमूळ, पुनर्नवा, देवदार, गुळवेल कुटकी, कडुनिंब, दारुहळद खडीसाखर प्रत्येकी ३ मासेप्रमाणात

घेऊन त्याचा ८० तोळे पाण्यात अष्टमांश काढा तयार केला तो प्राण व उदानकाळी दिला तात्पर्य हें की या वायूवर विशेष कार्य व्हावें आणि स्रोतोरोध कमी व्हावा. कफस्थानातील दोषप्रकोप हा मुद्दाहि लक्षात ठेवण्यासारखा होताच.

ह्याशिवाय शोथघ्न यकृद्वृद्धिनाशक रसायन औषधाचाहि उपयोग करावा लागला. ह्याकरिता खालील मिश्रण दिलें.

आरोग्यवर्धिनी ८ गुंजा + मंडूर २ गुंजा + मृगशृंगभस्म १ गुंज, पुड्या ४

दिवसात दोन पुड्या मोरावळ्याच्या पाकात. येणेप्रमाणे औषधयोजना सुरू केली. पहिल्या ७ दिवसातच पुष्कळ फरक पडला. प्रथमतः सूज कमी झाली आणि कुक्षीतील जलसंचय कमी होऊं लागला. हेंच औषध सारखें सुरू होतें. बदल काहीएक करावा लागला नाहीं. खाण्यास फक्त दूध व तेंहि गाईंचें किंवा बकरींचें देत असू.

---

# ( ४२ ) जलोदर व कृमि

रोगी मुलगा, वय वर्ष १०. ह्या मुलास जलोदराचा आजार एक वर्षापासून होता. यकृत् वाढलेलें, प्लीहा त्या मानानें कमी. पोटात पाणी साठलेलें. पाणी आजपर्यंत पुष्कळ वेळा नवीन साठत गेलें व पुष्कळ वेळा काढलें. मध्यंतरी इंदूरकडे मुलास नेलें होतें. तेथें त्याच्या पोटातील पाणी व्यवस्थित करून काढून टाकलें आणि वपा व बाह्यत्वचेमध्ये एक आरपार बारीक चांदीची नळी घालून ठेवली. ह्यामुळें पाणी न साठतां सारखें स्रवून जाई. मुलाची प्रकृतीहि साधारण बरी दिसूं लागली. परंतु फिकेपणा व यकृताची वृद्धि हे विकार कांहीं कमी पडत नसत. तसेंच मधून मधून वांति होणें, ज्वर येणें हेंहि सुरूच असे. मुलगा व त्याच्या घरची मंडळी एकंदर प्रकारानें व उपचारानें अगदी हैराण होऊन गेली. आणि त्यातच कांहीं दिवसानीं पुन्हा पोटात पाणी साचूं लागलें. त्या वेळीं आम्ही जवळ होतों आणि उपचाराचीहि शिकस्त झाली होती. तेव्हा कोठें फार लांब न जातां आम्हास दाखविलें. रोग्यास खरोखरी फार मोठमोठ्या शस्त्रवैद्यांना दाखविलें होतें. शक्य तितके सर्व उपाय केलेच होते. पण एक गोष्ट सहज लक्षातून जाण्यासारखी केली नसावी असें वाटलें, आणि बरोबर तेंच खरें ठरलें. त्या मुलास जंताचें औषध दिलें. प्रथमतः थोडे जंत पडले. नंतर सारखे तीन दिवस औषध दिलें. पुष्कळ जंत पडले. आणि नंतर वारंवार जंताचें औषध व रसायन व अन्य चिकित्सा यानें हा मुलगा उत्तम बरा झाला.

---

# (४३) सर्वांगशोफ व सूतिकारोग

रोगी स्त्री, मारवाडी, वय २५ बाई बाळतपणानतर आजारी पडली प्रथमतः ज्वर येत असे तो सूतिकाज्वर असे. नतर ज्वर हलके हलके कमी झाला. यकृत् वाढू लागले नंतर हृदयात विकार वाढूं लागला चालताना दम लागे नतर मूत्राचे प्रमाण कमी होऊन सर्वांगावर सूज आली प्रथमत तोंडावर सूज आली नतर सर्वांगावर सूज आली रोगी पाहिला त्या दिवशी बाईची फारच वाईट स्थिति होती श्वास सारखा सुरू होता नाडी क्षीण, चंचल व त्रुटित होती. सर्वांगास भयकर सूज. घाम, हातापायास गारठा बोलण्याची शक्ति नाही बोललेला शब्द उमटेना अशा स्थितीत काय करावे हा मोठा प्रश्नच प्रथम दिवशी खालील मिश्रण दिले

**प्रतापलकेश्वर** २ गुंजा + **आरोग्यवर्धिनी** २ गुंजा + **लक्ष्मीविलासगुटी** २ गुंजा

ह्या मिश्रणाचे चाटण सारखे तुळशीचा रस व मध यात खलून वारवार चाटण्यास दिले, आणि सुमारे चार तासात बाईची रिष्ट लक्षणे हलके हलके कमी होऊ लागली. दुसरे दिवशी त्यातच मृगशृंगभस्म दोन गुंजा मिश्र करून दिले त्या दिवशीहि पुष्कळच फरक पडला. तरी पण जीवितसंशय होताच तिसरे दिवशी मात्र अगदी निश्चितपणे बऱ्याकडे प्रवृत्ति दिसू लागली तीन दिवसानंतर लक्ष्मीविलासगुटी कमी केली आणि खालील मिश्रण दिले

**आरोग्यवर्धिनी** २ गुंजा + **मृगशृंग** २ गुंजा + **उन्हाळ्याचे औषध** ४ गुंजा, सारख्या प्रमाणाच्या ४ पुड्या

दिवसातून ४ वेळा **महाळुंगाच्या पाकांत** हेच औषध सुमारे दीड महिना सुरू होते मधून चार दिवसानी **प्रतापलकेश्वर व माक्षिक** याचे मिश्रणाची एखादी पुडी देत असे ह्या रोगात प्रथमतः गर्भाशयस्थ क्लेददुष्टि झाली नंतर तोच दोष यकृत्, हृदय व मूत्रपिंड यास दुष्ट करण्यास कारणीभूत झाला सर्व शरीरभर दोषदुष्टि झाली, आणि सर्वांगशोफ उत्पन्न झाला मूळ गर्भाशयदुष्टि म्हणून प्रतापलकेश्वर वापरावा लागला, आणि त्याने पुष्कळच कार्य केले.

---

# (४४) नेत्ररोग

रोगी, स्त्री, वय ३०, ब्राह्मण पौष शुद्धात रोगास आरंभ झाला तीनच दिवसात रोग अतिशय बळावला ह्यापूर्वी काही डॉक्टराना व वैद्याना हा रोग दाखविण्यात आला होता त्यानी रोग्यास उपचार करण्यास मिरज वगैरे प्रसिद्ध ठिकाणी पाठवावे असा आपला अभिप्राय दिला सात दिवस प्रयत्न करून पाहावा असा विचार करून रोग्यास उपचारासाठी ठेवून घेतले

हकीकत—(१) रोग होण्यापूर्वी सुमारे १५ दिवस अगोदरपासून रोग्याच्या डोळ्यात मधूनमधून सुया टोचल्याप्रमाणे वेदना होत असत व त्यामुळें झोपहि येत नसे (२) सर्व शरीरावर ५-५ मिनिटांनी काटे येत असत व त्यास स्पर्श केल्यास रोग्यास असह्य वेदना होत (३) शरीरातील प्रत्येक अस्थिसंधीच्या ठिकाणी एकसारखा ठणका होता ही सर्व लक्षणे मूळ रोगाचा डोळ्यात संचार होऊं लागताच बंद पडली व दुसरे दिवशी सकाळी उजव्या डोळ्यात उजव्या कडेकडून लालसर व काळा रंग चढण्यास आरंभ होऊन रात्रीपर्यंत अर्धा डोळा अतिशय काळा व अर्धा शुभ्र असा झाला

दिवस २ रा दुसरे दिवशी आतील सर्व भाग इतका काळा पडला होता की, बुबुळ ओळखण्याची पंचाईत पडे

दिवस ३ रा तिसरे दिवशी उजव्या डोळ्याप्रमाणेच डावा डोळा एकाच दिवसात काळा पडून दोन्ही डोळ्यासभोवतालची दोन दोन बोटें अंतरावरची कातडी डांबर फासल्याइतकी काळी दिसत होती

दिवस ४ था चौथे दिवशी दोन्ही डोळ्यास पूर्णपणे अंधत्व येऊन तोंडहि सुजण्यास आरंभ झाला पोटात शूळहि होत होता नाडी तपासून पाहता तींत उष्णवाताचा विकार दिसत होता प्रथम मला निदान ठरविणे अशक्य झाले, परंतु उष्णवातानेहि सर्व शरीरभर अशुद्ध रक्ताच्या काळ्या गाठी व चट्टे पसरत असतात असा पूर्वानुभवावरून कदाचित् अशुद्ध रक्ताचा प्रवाह डोळ्याकडील भागांत जाऊन हा विकार झाला असावा असा विचार करून खालील उपचार केला

तरवड (आहुलि) (Tennas Carria) (गुणधर्म राजनिघंटु पाहा) दोन तोळे वाटून त्यात शंखभस्म ४ गुंजा मिसळून नुसतेच खावयास दिले व ९६ पुटी गंधकरसायन पिठीसाखरेंत देणे सुरु केले त्यायोगाने सातच दिवसात फरक पडत जाऊन १५ दिवसात रोगी रोगापासून पूर्णपणे मुक्त झाला

पथ्य—तूप पोळी व आळणी वरण

---

## (४५) कॉलरा व शक्तिपात

रोगी स्त्री, वय ४३ वर्षे कॉलरा होण्यापूर्वी चारपाच महिने असृग्दर या विकाराने आजारी होती. त्यातून बरी होऊन सुमारे १५ दिवस होतात न होतात तोंच तिजवर कॉलऱ्याने झडप घातली दोनतीन उलट्या व दोन जुलाब होताच रोग्यास शक्तिपातावस्था प्राप्त झाली रोग्याचे सर्वांग घामाने डबडबले हात, पाय, गार पडून नाडी सुटत चालली व रोगी निश्चेष्ट पडला रोग्याच्या अंगास सुंठ व कायफळ चोळून शेकण्याचा उपक्रम सुरू केला अशा परिस्थितीत शरीरात कायम उष्णता टिकविणारे

हृदयास उत्तेजन मिळून सर्व शरीरभर रक्ताचा भरपूर पुरवठा करणारे, मूळ विकाराचे विषार नाहींसे करणारे असें औषध हवें होते सदर रोग्याचा पूर्वीचा विचार लक्षांत घेता खालील मिश्रणाचे चाटण देण्यात आले —

**समीरपन्नग** ½ गुज + **मडूर** -॥- गुज + **सुवर्णमाक्षिक** -॥- गुज + **प्रवाळ** १ गुज, सर्वाची मिळून एक पुडी अनुपानः—तुळशीरस, आलेरस व मध

वरील चाटण सारखे दहादहा मिनिटानी देण्यास सुरुवात केली तेव्हा सुमारे एक तासानें रोग्याच्या अंगात उष्णता येऊन रोगी शुद्धीवर आला पुढे एक वेळ **सूतशेखर** एक गुज, आलेरस व मध यातून आणि दोन वेळ **सजीवनी** मधातून, असा क्रम चालू केला व रोगी पूर्णपणें सुधारला

---

# (४६) कॉलरा व आक्षेपक

रोगी मुलगा, वय ७ वर्षे हा रोगी कॉलऱ्याने आजारी झाला. तेव्हा त्यास क्लोरोडिन ( chlorodine ) चे डोसेस् देण्यात आले होते त्यापासून फायदा मुळीच न होता रोग्याचे पोट फुगत चालले व पेटके ( cramps ) जोरानें येऊं लागले तेव्हा रोगी आयुर्वेदीय चिकित्सेकडे वळला सदर रोग्यास मूळ रोगाचे विषार नाहीसे होण्याकरिता व पोटातील आनाह नाहीसा होण्याकरिता **सूतशेखर** १ गुज + **ताम्रभस्म** -॥- गुज याचे मिश्रण, आलेरस व मध यातून देण्यात आले तेव्हा अर्ध्या तासाच्या अवधीत रोग्याचे पेटके थाबून आनाह नाहीसा झाला पुढें दर तासानें **सजीवनी गुटी** मधातून देण्यास सुरुवात केली रोग्यास लघ्वी होण्याकरिता कॉफी दिली व **चद्रप्रभेचीहि** योजना केली, तेव्हा रोग्यास लघ्वी झाली लघ्वी झाल्यावर रोग्याच्या जीविताची आशा वाटूं लागली

परंतु तिसरे दिवशी एकाएकी रोग्याची दातखिळी बसून त्यास आक्षेपकाचे झटके येण्यास सुरुवात झाली झटका सुमारे मिनीटभर टिकत असे परंतु तो इतका जोराचा येई की, यातच रोग्याचा अंत होतो की काय, अशी भीति वाटूं लागली तेव्हा त्यास एक वेळ **महायोगराजगुग्गुळ** आलेरस व मध यात व एक वेळ **सूतशेखर**, तुळशीरस व मध यात देण्यास सुरुवात केली दुसरे दिवशी झटका अगदीं हलक्या प्रमाणात व दोन तीन वेळ आला, आणि तिसरे दिवशी तर मुळीच आला नाही व रोगी उत्तम तऱ्हेने बरा झाला.

---

# (४७) कॉलरा व उचकी

रोगी मुलगा, वय १६ वर्षे कॉलऱ्यानें आजारी झाला लक्षणे हातापायास पेटके वगैरे वरीलप्रमाणेच यात विशेष म्हणजे रोग्याच्या मूत्रनलिकेत भयंकर

तिडका निघत व तो मूत्रेंद्रिय हातानें दाबून धरून लघ्वी होईल तर बरं, म्हणून मोठयान ओरडत असे त्यास लघ्वी होण्याकरिता शिरगोळा पाण्यात उगाळून दिला चंद्रप्रभा देण्यात आली कॉफीची योजना केली नाभीप्रदेशावर पळसाच्या फुलाने शेकून व पोटात पळसाच्या फुलाचा काढा लघ्वी होण्याकरिता दिला परंतु लघ्वी तर झाली नाहीच उलट उलट्या होऊन होऊन रुक्षता वाढल्याने रोग्यास उचकी सुरू झाली ती इतकी भयंकर की, एकदा सुरु झाली म्हणजे कितीतरी वेळ टिके आणि त्या अवधीत पन्नास वेळ तरी उचक्या येत असत अशा वेळी बृहण औषध ( बृहण शमन त्त्वेव वायो पित्तानिलस्य च । ) हवें होतें त्यास खालील मिश्रण दिले

समीरपन्नग ½ गुज + सुवर्णमाक्षिक ।- गुज + सितोपलादिचूर्ण २ गुंजा + सूतशेखर ।- गुज. अनुपान–आलेरस, तुळशीरस व मध

या चाटणापासून रोग्याच्या अंगात भरपूर उष्णता होऊन, त्याची उचकी थांबली दोन दिवस लघ्वी न होता त्याचे इंद्रियात तिडका निघत होत्या, म्हणून गोक्षुरादि गुग्गुळ २ गुंजा प्रवाळ १ गुज, उशीरासव अर्धा तोळा व पाणी १ तोळा, याचे तीन भाग करून दर दोन तासांनी एक एक भाग दिला यापासून त्याचे इंद्रियातील तिडका थांबून त्यास भरपूर लघ्वी झाली हें मिश्रण शीतवीर्य व वायुहि गुणानें शीतच असल्यानें त्यास पुन्हा उचकी सुरु झाली तेव्हा त्यास वर दिलेलें समीरपन्नगादि चाटण दिलें व त्यापासून उचकी थांबून रोगी चांगल्या तऱ्हेने सुधारला

---

# (४८) कॉलरा व मूत्राघात

रोगी मुलगा, वय ५ वर्षे कॉलऱ्यानें आजारी झाला व कॉलरा स्पेशल ड्यूटी पूर्व खानदेशचे डॉक्टर याच्याकडे चिकित्सेकरिता गेला त्याचे औषधापासून रोग्याचे उलटी, जुलाब थांबले, परंतु त्यास चार दिवस लघ्वी झाली नाही त्यामुळे लघ्वीतील क्षार शरीरात शोषले जाऊन, अपान व व्यानवायु दुष्ट झाले त्यामुळें रोग्याचा एक हात व एक पाय सारखा हालत असे शिवाय ओरडणे, चावणे, पांघरुणें फाडणें वगैरे लक्षणे होत होती वरील रोगाचे बुडाशी असलेलें मूत्रविष हे कमी करावयास पाहिजे होते परंतु यावर आमचेकडे औषध नाही असें म्हणून सदर रोगी चिकित्सेकरिता त्या डॉक्टरानी आमचेकडे दिला तेव्हा त्यास एक वेळ सूतशेखर, आलेरस व मध यात व दोन वेळ गोक्षुरादि गुग्गुळ व उन्हाळ्याचे औषध मधातून देण्यात आलें आणि हातापायास नारायण तेल देऊन शेकण्यास सांगितले पाचवे दिवशी रोग्यास भरपूर लघ्वी होऊन, वरील लक्षणेहि हलके हलके कमी पडून रोगी बरा झाला याप्रमाणे चिकित्सा करून महामारीचे शेकडा ९५ लोक सुधारले आहेत

---

# (४९) आक्षेपक व मलावरोध

रोगी पुरुष, वय १८ धंदा शेतीचा. सदर रोग्यास प्रथम थोडी थंडी वाजून ताप आला तो एकदोन दिवसानी बंद झाला. नंतर दोनचार दिवसानी हात व पाय ताठून त्यात कंप येत असे झटका आल्यानंतर तोंडातून फेस येत असे. मध्यतरी एकदोन दिवस झटका बंद होता नंतर पुन्हां झटके येऊं लागले छाती धडधडणे, डोकें दुखणे, श्वासोच्छ्वास कष्टाने होणें, जोराजोरानें कण्हणे ही लक्षणे झटका आला असताना विशेष असतात झटका गेल्यानंतर रोगी पूर्ण शुद्धीत असे झटका असताना रोगी परतंत्र व पूर्ण बेशुद्ध असे. प्रथमप्रथम दिवसातून पाचसहा झटके येत, तेच पुढें वाढत वाढत रोज दहापंधरापर्यंत येऊं लागले. रोग्यास मलावरोधाची पुष्कळ दिवसांची संवय. रुग्णस्थितीस प्रारंभ होण्यापूर्वी आठदहा दिवस त्यास शौचास झालेले नव्हते. भूक चागली लागत नसे ढेंकरा येत असत. झोप चागली लागत नसे व एकदोन वेळा उलटी आलेली होती या रोग्यास अडीच वर्षापूर्वी असाच प्रकारचे झटके अल्प प्रमाणात आलेले होते मलावरोध नाहीसा होण्याकरिता व स्थानिन वातदोषाचे प्रशमन होण्याकरिता पुढीलप्रमाणे योजना केली रोग्यास रात्रौ अडीच तोळे एरंडेल अच्छपानविधीनें देऊन सकाळी थोडें एरंडेल, मीठ व गरम पाणी याचा बस्ति रोज दिला जात असे झटके येऊन येऊन दुखणाऱ्या अगास चदनबलालाक्षादि तैलाचा अभ्यग करीत असे कोष्ठगत वाताचे शमन व्हावे म्हणून समीरपन्नग ½ गुंज प्रमाणानें लसणीच्या रसातून सकाळ-संध्याकाळ दिला जात असे अशा प्रकारे चिकित्साक्रम सुरू झाल्यानंतर तीन दिवसांनी झटके कमी होत होत सातव्या दिवशी रोगी पूर्ण बरा झाला.

---

# (५०) स्तनविद्रधि

रोगी स्त्री, वय १९, ब्राह्मण पहिली गरोदरावस्था सातव्या महिन्यात पायाला सूज, मलावरोध, चालताना श्वास लागणे, मूत्रोत्सर्ग त्रासाने होणे ही लक्षणे होती दिवस पूर्ण भरल्यानंतर हॉस्पिटलमध्यें बाळंतपण झाले त्यात बराच त्रास झाला अशक्तता--विशेषत हृदयाची अशक्तता--हे विशेष कारण होते बाळंतपणानंतर १५-१६ दिवसानी डाव्या स्तनात दुखूं लागलें ताप १०० पर्यंत होता स्तनामध्ये फार वेदना होत असत. दुधाचा जास्त सचय झाल्यामुळे ठणका असेल असे समजून 'ब्रेस्टपपानें' दूध बाहेर काढण्याचा प्रयत्न केला पीडा व सूज जास्त वाढली स्तनाग्र जाड झालें बाजूला जाड, लाल, तुळतुळीत सूज असून बाजूला पाढरट पवाळल्यासारखे दिसत होतें. पू गोळल्यामुळें सर्वत सूज आलेली आहे असे ठरवून, आयुर्वेदाप्रमाणें कफपित्तज विद्रधीची लक्षणे दिसत असल्यामुळे, तेच निदान ठरविलें ह्या रोग्यास

सकाळी हरताळभस्म १ गुंज प्रमाण, अनुपान मध. दुपारच्या वेळी व संध्याकाळी विडंगारिष्ट ५ तोळे + खर्जूरासव ५ तोळे + मृगशृंग १॥ मासा एकंदर मिश्रण करून त्याचे आठ भाग करून दर तीन तीन तासानी. रात्री निजताना शौचास होण्यासाठी सिंहनादगुग्गुळ बाह्योपचाराकरिता दशांगलेप, तूप व पाणी मिसळून गरम करून, वर बांधण्यात आला हया एकंदर उपचारपद्धतीने स्तनाच्या बाजूस भोक पडून बराच पू बाहेर आला (४ ते ८ औंस) त्रिफळ्याच्या काढ्याने जखम धुऊन जात्यादि तैलाची व्रणरोपणार्थ पट्टी ठेवण्यात येत असे असे सात आठ दिवस केल्यानंतर पू कमी होऊन जखम भरली व रोगी बरा झाला हल्ली ती बाई चांगल्या स्थितीत असून मुलाला दूध त्या स्तनातून पाजीत आहे हा रोग शस्त्रसाध्य खरा, परंतु आयुर्वेदीय चिकित्सापद्धतीने शस्त्रक्रिया न करता अल्प कालात बरा झाला ह्याच चिकित्सेने अंतर्विद्रधि व आन्त्रपुच्छविद्रधिसारखे रोग बरे झालेले आहेत

( अन्तर्विद्रधि व बाह्यविद्रधि हयात हरताळभस्म, विडंगारिष्ट व खर्जूरासव या औषधाचा उपयोग झाल्याचे वर डॉ साडू यानी दिलेले उदाहरण आयुर्वेदातील संप्राप्ति सत्य असल्याचे निदर्शक होय विद्रधि व कुष्ट यात आयुर्वेदीय संप्राप्तिशास्त्रदृष्ट्या बरच साम्य आहे दोघातहि " वातादयस्त्रयो दुष्टास्त्वग्रक्त मांसमम्बु च " हा सप्तक द्रव्यसंग्रह सामान्यत कारणीभूत असतो फक्त तीव्रतेत तरतमभाव आहे एवढाच फरक आणि म्हणूनच कुष्ठात उपयोगी पडणारी औषधे विद्रधिचिकित्सेतहि उपयोगी पडली —संपादक, भिषग्विलास )

---

## ( ५१ ) हस्तपादशोथ

रोगी ब्राह्मण स्त्री, वय वर्षे ३० किंचित् स्थूल प्रकृति रोग्याची लक्षणे— दोन्ही हातावर व कमरेपासून घोटापर्यंत दोन्ही पायावर अतिशय सूज त्यामुळे चालता न येणे आलस्य त्या सुजेत चमका व कळा सर्व सांध्याच्या ठिकाणी शूल, कमरेत चमका भूक न लागणे घशात जळजळ लागणे पोटात वायगोळा उठल्यासारखा होणे भोजनोत्तर परिणामशूळ, पोटात डाव्या बाजूस दाबले असता जास्त दुखणे निजून उठल्यानंतर सूज वाढणे रोग्यास दोन वर्षांपासून ऋतुस्राव बरोबर येत नसे व सूज येण्यापूर्वी ५ महिने मुळीच रजोदर्शन झाले नाही सुजेचे हेच मुख्य कारण असावे असे ठरवून नष्टार्तवजन्य वातशोथ असे निदान करून वातहर व शोथहर दशमूळाचा रक्तगुणवर्द्धिकर कल्प-- दशमूलारिष्ट--दिला वर लावण्यास वातनाशक तेल अभ्यंगार्थ दिले प्रथम पित्तविरेचनार्थ स्वादिष्ट विरेचन मनुकाचे फांटात दिले त्यायोगे घशाची जळजळ बसली पोट दुखणे थांबले व सुजेतहि थोडा फरक पडला परंतु सूज अजिबात कमी होईना.

म्हणून दशमूलारिष्टाबरोबर शोथघ्न पुनर्नवासव दिलें व महायोगराजगुग्गुळहि दिला परंतु सूज कमी झाली नाही म्हणून ह्या रोगाचे कारण नष्टार्तव हें स्पष्ट दिसत असल्यामुळें घृतगुडव्योषभार्गीरजोन्वित तिलक्वाथ (तूप, गूळ, सुंठ, भारंगमूळ यांच्या चूर्णाबरोबर तिळाचा काढा) दिला. त्यामुळे दोन तीन दिवसात रजोदर्शन होऊन सुमारें आठ दिवसाच्या अवधीत बाकीचीहि लक्षणे कमी होऊन रोगी साफ बरा झाला.

---

## ( ५२ ) विषूचिका व पित्तवृद्धि

रोगी वय अदमासें २२ शरीरानें मजबूत.

**लक्षणे**—प्रथम एकदम मोठया जुलाबापासून सुरुवात झाली पहिल्या दिवशी एकूण १० जुलाब सपाटून झाले दिवसात ४–५ वेळा वांति झाली प्रत्येक वांतीच्या वेळी पोटात गोळा उठल्यासारखा वाटत असे अंगास घाम व पायात दुसऱ्या जुलाबापासून पेटके उठूं लागले दुसऱ्या दिवशी तहान फार व त्याचप्रमाणे सर्वांगाचा सपाटून दाह सुरू झाला. पाणी प्याल्याबरोबर तें उलटून पडे श्वास घेतेवेळी उचलून फेकल्याप्रमाणे वाटणे, वगैरे.

**चिकित्सा**—दुसऱ्या दिवसापासून औषधोपचारास सुरुवात झाली ह्या वेळी जुलाब चालू होतेच पण त्यापेक्षा जास्त त्रासदायक लक्षणे म्हणजे वांति व दाह ही होती पहिल्या दिवशी जुलाब व वांत्या फार जोरदार अशा झाल्यानें शरीरातील सोमगुणात्मक जो अब्धातु त्याचा क्षय झाल्यानें उष्णगुणात्मक जें पित्त त्याचा प्रकोप झाला व त्यामुळें वांति व दाह ही फारच त्रासदायक अशी लक्षणे उत्पन्न झाली. यात प्रथम पाचन व गरदोषघ्न अशी व पित्तदोष कमी करणारी अशी दोन प्रकारची चिकित्सा सुरू केली शंखवटी व विषूचिकावटी आलटून पालटून २-२ गुंजा अर्ध्या-अर्ध्या तासानें पाण्याबरोबर देण्यास सुरुवात केली व छर्दि व दाह कमी होण्याकरिता चंदनचूर्ण + आमलकीचूर्ण ( ही दोन्ही शीतगुणाची असल्यानें पित्तशामक म्हणून ) ह्याचें मधातून चाटण सुरू केले पित्तवृद्धि फार झाल्यानें चक्कर व मुखपाक ही लक्षणेंहि त्यात होतीच वरीलप्रमाणे साधारण ६ तास उपचार केल्यानंतर वांति व दाह ही थोडया प्रमाणांत कमी झाली. यात गरघ्न अशी चिकित्सा पाहिजे होती व शिवाय वातपित्तप्रकोपामुळे उत्पन्न झालेली चक्करहि यात होतीच ती कमी होण्याकरिता सुवर्णयुक्त सूतशेखर ४ गुंजा ४ तासपर्यंत मधात चाटविण्यास दिला यातील सुवर्णाचें कार्य गरघ्न असें होते शिवाय यात ताम्र असल्यानें व ताम्रहि गरविषघ्न असल्यानें त्याचाहि या ठिकाणी उपयोग होतो. शिवाय पिंडिकोद्वेष्टनातहि ताम्राचा उपयोग होत असल्यानें सुवर्णयुक्त सूतशेखराचे या ठिकाणी चाटण सुरू ठेविलें. हे चाटण चालू असता, म्हणजे

एकीकडे गरघ्न अशी चिकित्सा चालू असता, दुसरीकडे पाचकदीपक अशी चिकित्सा म्हणून शखवटी व रसोनवटी (विषूचिकावटी) वरीलप्रमाणेंच सुरु ठेविली

याप्रमाणे दुसऱ्या दिवशी औषधोपचार केला याने सर्वच लक्षणे थोडया प्रमाणात कमी वाटली म्हणून तिसऱ्या दिवशी सर्व दिवस वरीलप्रमाणेच औषधोपचार केला मात्र सूतशेखराच्या चाटणात शीतगुणाची व पित्तशामक अशी प्रवाळ व गुळवेल सत्व ६–६ गुंजा प्रमाणात मिसळली व ते चाटण खडीसाखरेच्या पाकात चाटविण्यास सुरवात केली चौथ्या दिवशी सकाळी ही सर्व लक्षणे बहुतेक कमी झाली होती पण तहान, आग व शीर्षशूल हीं थोडी शिल्लक होती यासहि कारणीभूत कुपित पित्त असावे असे जाणून तिसऱ्या दिवशी अजिबात शौचास न झाल्याने दोषाच्या पाकाचे अनुमान करून पित्ताचे थोडेसे सौम्य प्रमाणात शोधन होण्याकरिता स्वादिष्टविरेचन २ मासे रात्री मनुकाच्या पाण्यात दिले पाचव्या दिवशी दुपारी शौचास झाल्यापासून हीं सर्व लक्षणे अजिबात थांबली, मात्र मुखपाक कायम राहिला. तो कमी होण्याकरिता पोटात प्रवाळ + गुळवेल सत्व २–२ गुंजा, २ पुड्या खडीसाखरेच्या पाकात घेण्यास दिल्या व तोंडास लावण्याकरिता "तावडे औषध" (यातील द्रव्ये रोपण, उपलेपक व पित्त-निर्वापण करणारी अशी आहेत) दिले याप्रमाणे ३ दिवस चिकित्सा केल्यानंतर रोगी बरा झाला अगोदर बराचसा विट्क्षय झाला असल्याने सदर रोग्यास पुढे पाच दिवस शौचास अजिबात झाले नाही या सर्व दिवसात अन्न म्हणून फक्त तांदुळाची कण्हेरी दिली होती पाच दिवसानंतर शौचाची आपोआप प्रवृत्ति होऊं लागली व रोगी पूर्ण बरा झाला.

या रोगात विषूचिकेची सामान्य अशी चिकित्सा गरघ्न, पाचक, दीपक, पाचन करून संग्रहण करणे ही करावी लागलीच शिवाय त्यात प्रकोप पावलेलें पित्त त्याचीहि चिकित्सा यात करावी लागली.

---

## (५३) वातभूयिष्ठ विषूचिका

रोगी वय २४ वर्षे ह्या रोग्यास वरीलप्रमाणेच लक्षणे होत असत फरक एवढाच की, श्वास तहान व दाह ही कमी प्रमाणात असून शूल अतिशय प्रमाणात होता ह्या व्याधीचा जोरहि फार होता म्हणजे छर्दि व अतिसार याचे वेग जोराचे असून शूलादि लक्षणे फारच तीव्र स्वरूपाची होती सदर रोग्यास एक जुलाब झाल्याबरोबरच पायात गोळे येऊं लागले रोगी एकदम अशक्त होऊन गेला त्याच्याने अंथरुणावर-सुद्धा उठून बसवेना पोटात फुगवटी व कंप ही वातभूयिष्ठ लक्षणे प्रत्येक जुलावा-

बरोबर वाढतच होती. सदर रोग्यास ८ जुलाब व ४ वात्या झाल्यावर चिकित्सेस सुरुवात झाली यात एकंदरीत लक्षणे वातभूयिष्ठ अशी होती. ह्यातील विशेषत: शूल हे लक्षण जास्त त्रासदायक होते. यास प्रथम गरघ्न, अन्नपाचक व वातशामक अशी चिकित्सा सुरू केली एका दिवसात रसोनवटी ३० गो.+शंखवटी ३० गो आलटून पालटून अर्ध्या अर्ध्या तासाने गरम पाण्यात दिल्या व सुवर्णयुक्तशेखर व लक्ष्मीविलास-गुटी दोन दोन गुंजा एकत्र करून मधात व आल्याच्या रसांत मधून मधून चाटविले यातील रसोनवटी ही अत्यंत पाचक व वातशामक अशी आहे त्याचप्रमाणे शंखवटी ही विशेषत शूल कमी करणारी अशी आहे सुवर्णयुक्त सूतशेखर वरील रोग्याप्रमाणेच गरघ्न व लक्ष्मीविलासगुटी ही हृद्योत्तेजक व हृदयास बल्य म्हणून उपयोगी पडते कारण लक्ष्मीविलासगुटीत अभ्रक भस्म हे चागल्यापैकी हृद्य असे आहे

ह्या व्याधीत विशेषत हृदयासारखी मर्मे साभाळावी लागतात. कारण विपाचा परिणाम मर्मावर त्वरित होतो व विषूचिकेंतील आमदोष हे गर म्हणजे विषरूपच असल्याने त्याचे परिणाम हृदयावर घडतात व म्हणूनच विषूचिकेत " हृदये रुजा " असे लक्षण दिले आहे. त्याचप्रमाणे शिर हेहि मर्म असल्याने त्यावरहि विषाचा असाच परिणाम घडून " शिरस भेद. " असे लक्षण विषूचिकेत उत्पन्न होते विषूचिकावटी व शंखवटी ही ज्याप्रमाणे पाचक आहेत, त्याप्रमाणे सग्रहण करणारी अशी असल्याने ह्यानें सदर रोग्याच्या वात्या व जुलाब हे कमी प्रमाणात आले, म्हणून पुन्हा तेच औषध व चाटण दुसऱ्या दिवशी दिले, तरी त्याचा शूल थांबेना. शौचासहि साधारण घट्ट होऊं लागले होते, म्हणून शूल थाबविण्याकरिता वातशामक, अन्नपाचक व विषघ्न अशी संजीवनीगुटी, विषूचिकावटी व वज्रवटी ही औषधें आलटून पालटून तुपातून दिली व शिवाय वरील लक्ष्मीविलास गुटीचे चाटणहि आल्याचा रस व मध यातून दिले या वेळी रोग्याची अवस्था म्हणजे ३६ तासापासून लघ्वीस अजिबात बंद झाले होतें शौचास दिवसातून ३ वेळा घट्ट असे झाले व शूलाचे प्रमाण फारच थोडें कमी झाले होतें. पोटास थोडी फुगवटी होतीच आतापर्यंतच्या चिकित्सेनें दोषाचे पचन बरेचसे झाले होते म्हणजे यात आमाचा संबंध जवळ जवळ नाहीसा झाला होता व शूल वातभूयिष्ठ होता, म्हणून त्यास स्नेहविरेचनार्थ एरडतेल सिद्ध दुग्ध करून ते दिले व पोटावर स्नेहस्वेद केला. याने ३ जुलाब होऊन दुसऱ्या दिवशी सकाळी थोडी लघ्वी झाली व शूल एकदम बराच कमी झाला व पोटाची फुगवटीहि कमी झाली

या ठिकाणी स्नेहविरेचन दिल्याने स्नेहाच्या योगाने वातशमन झालें व विरेचनाच्या योगाने वाताच्या मार्गात रोध करून त्याचा प्रकोप करावयास कारणीभूत असलेल्या मलाचे शोधन झाल्यानें रोधजन्य वातप्रकोप कमी झाला व अशा प्रकारे दोन्ही रीतीनी वातप्रकोप कमी झाल्याने शूल अजिबात कमी झाला पुढें दोषशेषाचें पचन व शमन होण्याकरिता व वायूचें अनुलोमन होऊन बृहण म्हणून एरडमूलसिद्ध दुग्ध ५ दिवस दिले

गान मलमूत्राचें उत्सर्जन व्यवस्थित होऊं लागलें आनाह व शूल हेहि अजिबात थांबले व रोगी पूर्ण बरा झाला पुढे सुमारे १५ दिवसपर्यंत पाचन अशी चिकित्सा (शंखवटी २-२ गोळया २ वेळ तुपातून याप्रमाणें) चालू होती या रोगांत एकूण वातभूयिष्ठ लक्षणेंच जास्त प्रमाणांत होतीं. म्हणून विषूचिका-सामान्य-चिकित्सा तर करावी लागलीच, पण विशेषत वातशामक अशी चिकित्साच जास्त कार्यकारी ठरली

( वरील दोन्ही रुग्ण नगरास आलेल्या विषूचिकेच्या साथींतील होते )

---

## ( ५४ ) गर्भिणीचा पांडुरोग

रोगी स्त्री, तेलगी, वडा गवंड्याच्या हाताखालीं मजुरी ४-५ महिन्यापूर्वी सरकारी दवाखान्यात अत्यंत गरिबीची स्थिति असल्यामुळे औषधोपचारार्थ गेली त्या वेळी नुकतीच पोट दुखण्याची तक्रार व अग्निमांद्य आहे असे समजून एक दिवस तीव्र जुलाब दिला गेला त्यामुळे तिला पुढे अतिसाराची व्यथा सुरू झाली पुष्कळच इलाज केले, पण दुरुस्त होईना त्या वेळीं परिस्थिति अत्यंत काळजी उत्पन्न करण्यासारखी होती

मुख्य लक्षणे—सर्व शरीरावर फिकटपणा, पांडुता, ज्वर १०२° हाताची व पायाची नखें पांडुरकी, जिव्हा पांढरी, डोळे पांढुरके हातापायावर व तोंडावर अत्यंत सूज अतिसार चार पांच वेळ, पुष्कळ घाम, लघ्वी कमी घबराट वरचेवर होणें, पोटांत दुखणें व फिरल्यासारखें होणें तोंड बेचव, गर्भवती ७॥ महिन्याची, अशीं लक्षणे होती म्हणून तिला पांडुरोगी म्हणून चिकित्सा खालीलप्रमाणें सुरू केली

प्रथम तिला शंखोदर २ गुं+लघमालिनी वसंत २ गुं+शंखभस्म २ गुंजा+प्रवाळभस्म २ गुंजा, यांचें मिश्रण करून ४ पुड्या मधांत देऊन वर तांदळाचें धुवण पिण्यास दिलें कारण पांडुरोगातील मुख्य पित्तदोषाचें शमन, अपानवायूचें नियमन व गर्भपालन व्हावें अतिसार कमी व्हावा म्हणून दोषप्रत्यनीक व व्याधिप्रत्यनीक म्हणून दिलें दोन दिवसानंतर अतिसार व घबराट कमी झाली परंतु पायावरील सूज कमी पडली नाहीं पोटांत फिरणें व शूल कमी झाला

तिसऱ्या दिवशीं सूज कमी व्हावी म्हणून बाईस शंखोदर २ गुंजा + लोहभस्म २ गुंजा + जवखार १ मासा + प्रवाळ २ गुंजा याप्रमाणें मिश्रण करून तें पांढरी वसू व गोखरू याच्या काढ्यातून दिलें त्याशिवाय पायावर शेवग्याची साल, सात्वरशिंग, वडाची साल याचा गोमूत्रांत लेप दिला यानें बाईस लघ्वी साफ होऊन तिला बरें वाटलें व सूज कमी झाली

परंतु पांचव्या दिवशी रात्रीं त्या बाईचें एकाएकीं पोट दुखूं लागलें व ती प्रसूत झाली. पण मुलगा वारला दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिला पाहण्यास गेलों असतां रोग्यास फारसा

त्रास झाला नाही व त्यापासून थोडे तास बरे वाटले रक्त फारसे न गेल्यामुळें व बाईच्या पोटातील वार सर्व पडल्यामुळें बाळंतपणामुळे जास्त अशक्तता वाटावयास पाहिजे, परतु तितकी न वाटता अशा स्थितीत जरा बरे वाटत होते हाताच्या नखावर साधारण अरुणरंगाची झाक मारूं लागली परतु दुसऱ्या दिवशी त्या बाईचे पोट व डोकें जास्त दुखू लागलें व श्वास जास्त होऊं लागला ताप १०२° घबराट अतिशय अशी उपद्रवाची लक्षणे दिसताच "मक्कल" असे निदान ठरवून तिला हिंगाष्टक २ मा+जवखार १ मा+शखभस्म ४ गु+तालीसादि चूर्ण १ मा+लोहभस्म २ ग, याचे मिश्रण दिवसातून तीन वेळा मधसाखरेतून दिले श्वास जास्त वाढूं नये म्हणून समीरपन्नग १ गु+श्वासकुठार २ गु. याचे मिश्रण आल्याचा रस व मध यातून दिले. डोक्यावर चदन, कापूर व सुठ उगाळून लाविलें रात्री निजताना आरोग्यवर्धिनीची योजना केली होती. दोन तीन दिवसानतर रोग्यास बरे वाटावयास लागले पायावरील सूज गेली रिष्ट लक्षणें पार नाहीशी झाली पण खोकला अत्यत वाढून कफाचे वेडके जास्त पडूं लागले, म्हणून दुष्टकफनाशनार्थ व वायूच्या वेगशमनार्थ तालीसादि १ मा + प्रवाळ १ गु. + लोहभस्म १ गु. याप्रमाणे मिश्रण ३-४ दिवस दिल्यानंतर रोगी पूर्ण बरा झाला

---

## (५५) योनिकंडु (ग्रंथि व व्रण)

रोगी बाई, वय सुमारे २३ वर्षे, जात मराठा, पोटाला अन्न व अगाला वस्त्र मिळण्याची पंचाईत अशी आर्थिक परिस्थिति.

**रोगाचे स्वरूपः**—प्रथम सुमारे एक महिना पुढीलप्रमाणे लक्षणे दृष्टोत्पत्तीस येत होती सर्वांगाचा दाह, कंबर दुखणे, हातपाय निर्जीव भासणे कबरेवरील भागावर वारवार रोमाच उभे राहणे सकाळी तांबूस व काही काळे शोथयुक्त चट्टे उद्भवून संध्याकाळी मावळणे स्तन व योनि यांमध्ये एकसारखा ठणका होऊ लागून काही अवकाशाने वरील दोन्ही इद्रिये बधिर होणे योनीत नेहमी गुदगुद व कडूहि असावयाची उत्कट कामेच्छा, परतु मैथुनोपभोगानतर सुमारे अर्ध्या तासाने ज्वर किंवा मूर्च्छा हे विकार होणे. दर पाच दिवसात एक दिवस प्रकृति उत्तम असावयाची. परतु त्या दिवशीच्या झोपेत इतका घाम यावयाचा की, त्यामुळे सर्व अंथरूण ओले होऊन खालील जमीन पण ओली व्हावयाची.

असा क्रम चालू असता एके दिवशी बाईने गुह्येंद्रिय खाजविल्यामुळें आतील व बाहेरील भागावर पापुद्र्याप्रमाणे बारीक पुरळ उत्पन्न झाला व त्यातून पाण्यासारखा

चिकट पदार्थ पाझरू लागला सुमारें तीन चार दिवसानी पुरळ अजिबात नष्ट होऊन **योनिमुखावर चारहि बाजूस बोराएवढ्या चार ग्रंथी** उद्‌भवल्या ही स्थिति दोन दिवस कायम राहून तिसरे दिवशी ग्रंथींचे वाढते प्रमाण पेरूएवढे होऊन त्यातून पुन्हा चिकट पाझर सुरू झाला येथपर्यंतच रोगाने आपलें वाढते प्रमाण थांबविलें नसून क्रमाने वृद्धि पावत ग्रंथी कवठाच्या आकाराएवढे बनले होते ह्यावेळी रोग्याची स्थिति अत्यंत केविलवाणी झालेली होती **आठ महिन्यांची गर्भवती.** डोळे इंगळा-प्रमाणें लाल हातपाय सारखे आवळणे, गडबडा लोळणे, डोळे वटारणे, एकाएकी उठून बसण्याचा प्रयत्न करणें, बडबड, आरोळ्या मारणे. ओ ओ शब्द करणें मधून मधून सुमारे ३–४ मिनिटेंपर्यंत पूर्ण बेशुद्धावस्था होत असून तोंडावाटे फेस, बुडबुडे, नाकावाटें कफासारखा पदार्थ वाहावयाचा, ही स्थिति शुद्धीवर आल्यानंतर नाहीशी व्हावयाची आणि ताब्याभर पाणी ढोसावयाचे असली ही विचित्र, किंबहुना भयंकर स्थिति पाहून बाई जिवंत राहणें अशक्य आहे असें वाटलें प्रत्यक्ष चिकित्सा करीत असता आणखी काही विलक्षण प्रकार निदर्शनास आले नाडीचा वेग दर मिनिटास १६८ ते १७२ पर्यंत असावयाचा, परंतु आणखी पाच तासानी पाहिल्यास ६० ते ६५ असावयाचा ध्वनियंत्राने तपासून पाहता राहून राहून गर्भाचे बेसुमार चलनवलन व्हावयाचे व त्यामुळे तिला असह्य वेदना व्हावयाच्या आणखी याहिपेक्षा आश्चर्य म्हणजे **ग्रंथींना चाळणीसारखीं छिद्रें** पडून त्यातून **काळ्या रक्ताचा स्राव** जोरानें सुरू झाल्यामुळें रोग्यास सर्वांगासनाप्रमाणे आपले पाय भिंतीला उभे ठेवावे लागत असत

वरील रोग्यास उपदंश किंवा तमल्या कोणत्याहि प्रकारची रोगाची बाधा नसून केवळ संचित रजोदोषाचाच हा प्रादुर्भाव असल्यामुळे रोगाच्या तीव्रतेप्रमाणे प्रथम दाह-प्रत्यनीक चिकित्सा करणे इष्ट वाटल्यावरून खालीलप्रमाणे इलाज करण्यात आला.

**मौक्तिकभस्म** २ गुंजा + **सुवर्णमाक्षिक** २ गुंजा + **प्रवाळभस्म** (चंद्रपुटी) ४ गुंजा + **सुवर्णवर्ख** १ पान + **मोरावळा** १ तोळा हे मिश्रण सकाळ, दुपार, सध्याकाळ व रात्रीं १२ वाजता याप्रमाणे दर ६ तासानी देण्यात आले

दोन दिवसात त्या औषधीनें रोग्यास जरी विशेष आराम वाटला नाही, तथापि त्यास होत असलेल्या भयंकर वेदना, घबराट, बडबड वगैरे बरीच कमी प्रमाणात होऊन दुसरे दिवशी थोडी झोपहि पण आली

पाचवें दिवशीं वरील औषध बदलून दोषव्याधिप्रत्यनीक चिकित्सा सुरू केली

(१) रजोदोषामुळें—गर्भाशयातील स्रोतसावरोध, वातवाहिन्यावर परिणाम, अपान-वायुक्षोभ आणि प्रकृतिनुसार तदाश्रयीभूत होत असलेली (गर्भाशयात रूक्षता, दाह, शूल, ठणका, व्रण, पाझर आदिकरून) लक्षणें.

(२) रक्तदोषामुळें—संचित झालेले सेंद्रिय विषार, रूक्षतेमुळे फाजील उष्णता, उदान व समानवायुकोप आणि तदनुसार होत असलेलीं खालील लक्षणें रक्तातील

विजातीय द्रव्यांमुळे गांठी, कंडू, सूज, अंगास चिरा किंवा छिद्रं पडणे, धमन्या, अस्थि-संधि, हातापायांची बोटे आखडणे, शरीरवेदना, अरुचि, चैन न पडणे, भोवळ येणे, कापरे सुटणे, पूं, लस इत्यादि घाणेरडे पदार्थ गळणे

(३) वातादि दोष---शारीरिक असह्य वेदनेमुळे, मेदूंतील रक्तवाहक आणि ज्ञान-वाहक ततूंवरील परिणामामुळे (दोषामुळे) बेशुद्धि तोंडावाटे फेस, लाळ, डोळे लाल होणे, तद्रा, बडबड, इत्यादि वरील निर्दिष्ट केलेल्या रोगाचे (दोषी लक्षणाचे) शमन करण्यास्तव खालील औषधियोजना करण्यात आली.---

**सकाळी**---**वडाच्या पारंब्या २॥ तोळे+उंबराच्या मुळचा २॥ तोळे**, एकत्र कुटून त्यात ४० तोळे पाणी घालून $\frac{1}{2}$ काढा उरविला व त्यात मध १ तोळा टाकून तीन-तीन तासानी दोन वेळा तो दिला

**दुपारी**---**पारदभस्म १ गुंज+विडचाच्या पानाचा रस ३ मासे+मध ६ मासे**, एक वेळ देण्यात आले

**रात्री**---**महागंधकरसायन १ मासा+खडीसाखरेचा पाक १ तोळा** ९ वाजता १ वेळ

याशिवाय दर तासास **रानतुळशीची तीन पाने नुसतीच खावयास देऊन बाह्योप-चारासाठी स्फटिकाभस्म १ छटाक आणि गरम पाणी २ शेर** यानी योनीच्या आतील व्रणाचे व ग्रथीचे प्रक्षालन करावयास सागितले

वरील औषधीचे गुणधर्म --

**वड**---शीत, रक्तपित्त, व्रण, रक्तदोष, दाह, तृषा, विसर्प, योनिदोष याचा नाशक आहे.

**उंबर**---शीतल, गर्भसधानकारी, व्रणाला शुद्ध करुन भरुन आणणारा, प्रदर, रक्तस्राव, रक्तदोष, कृमिनाशक याचा विशिष्ट गुण कसल्याहि योनिरोगाचा नाश करणे हा आहे

वडाच्या पारब्या किंवा उंबराच्या मुळ्या ह्याचा काढा गर्भपरिस्त्रावेक्षाहि जास्त गुणकारी आहे.

**पारदभस्म** -- जंतुघ्न, कुष्ठघ्न आणि योगवाही रसायन आहे.

**महागधकरसायन**---कुष्ठघ्न, जंतुघ्न, विषघ्न, योगवाही

वरील औषधापैकी **महागधकरसायन** ह्याच सिद्ध औषधाने अद्भुत् गुण दाखवला असें म्हटल्यास कांही हरकत होणार नाही कसल्याहि सेंद्रिय विषारानें अथवा जंतुज विषारानें दूषित झालेले दोष व सहा धातु याजवर **गधकरसायनासारखें** दुसरें औषधच नाही

**रानतुळस**---जलपाचनास उत्तम ' हिची ५-७ पाने खाऊन त्यावर दर वेळी शेर दीड शेर पाणी पीत गेल्यास कसलीहि तकलीफ होणार नाही

तुरटी---कृमिनाशक, रक्तस्तंभक, योनिसंकोचकर, व्रणशोधक व विषनाशक अशी आहे

वरील औषधें देऊं लागल्यापासून जो एक चमत्कार घडून आला तो असा की, एक ग्रंथी जिरून जाऊन तिन्ही ग्रंथींतून निव्वळ काळ्या रक्ताचा इतका जोराचा स्राव सुरु झाला की, त्यामुळे जमिनीवर ओघळ वाहू लागून सातवे दिवशी तिन्ही ग्रंथी कवचाप्रमाणे गळून पडल्या त्याचे वजन करून पाहिलें असता एकदर ४२॥ तोळे भरले !

बाईची प्रकृति समाधानकारक रीतीने सुधरून सुखाने प्रसूति झाली.

---

# (५६) पोटदुखी

एका सुमारे २० वर्षे वयाच्या रोग्यास २॥-३ वर्षांपासून पोटांत दुखण्याची संवय होती. पोटात नेहमी गुबारा, तोहि पुष्कळ प्रमाणात, त्यामुळे पोटाला सारखा ताण वाटत असे मल रूक्ष व खडे होण्याची प्रवृत्ति, भूक न लागणे वगैरे चिन्हे होती. शेकल्याने, चोळल्याने बरे वाटत होते. डाळीचे पदार्थ व इतर रूक्ष पदार्थ आहारांत होते वगैरेबरोबर हेहि एक कारण होते क्षुधानाश पुढें पुढें होऊं लागला येथें अपानवायूची मुख्यत दुष्टि होती अनुलोमक, पाचक असून बल्य अशा औषधाची व त्यास स्निग्ध व वातनाशक अनुपानाची योजना करणें जरूर आहे असें वाटल्यावरून वातगजांकुश गोळी ($\frac{1}{2}$ गु ), + $\frac{1}{4}$ तो सहचर तेलातून देण्याचे ठरविले वातगजांकुश, अपानवायूचा प्रकोप होता म्हणून (अपाने विगुणे पूर्वम् ) सकाळी व सध्याकाळी जेवणापूर्वी गरम सहचर तेलांतून देण्यास सुरुवात केली दोन दिवसांत शूल कमी झाला व भूक लागू लागली मलमूत्रप्रवृत्ति नीट होऊं लागली, म्हणून पुन्हा ६ दिवसाचे तेच औषध दिले आठ-दहा दिवसानतर शूल फार थोडया प्रमाणात होतो असें दिसून आलें आता शूल मुळींच होत नाही

---

# (५७) हस्तकंप

रोगी वय ३३ रोग्यास पूर्वी कोणत्याहि प्रकारचा रोग नव्हता एके दिवशी उजवा हात जड वाटूं लागला हातातून लेखणी सुटूं लागली हात हालूं लागला, बोटें

थरथर कापूं लागली त्यावर १–१॥ महिना इतर वरेच उपाय म्हणजे चोळणें, विजेचा उपचार हे केले. रोग्यानें दवाखान्यात येण्यापूर्वी पोटातून कोणतेहि औषध घेतलें नव्हते. रोगी आला तेव्हा हात, विशेषत: हाताची बोटें मारखी. कापत असत प्रकुपित वाताचा स्थानसंश्रय स्नायूमध्यें जेव्हा असतो, तेव्हा कप हा विकार उत्पन्न होतो "स्नायुप्राप्तौ स्तंभकम्पौ।" येथे वातनाशक कार्य, तेहि स्नायूंमधील वातनाशक कार्य, करणारा गुग्गुलुकल्पापैकी महायोगराज गुग्गुलु १ गुंज आणि स्नायूंना बल्य अशी शतावरी ८ गुंजा हे आले व तूप ह्या अनुपानातून दुपारच्या जेवणाचे वेळी म्हणजे (सामुद्ग) अर्धे औषध जेवणाचे अगोदर व अर्धे औषध जेवणानतर घेण्यास दिलें व जेवण हलके घेण्यास सागितले "कम्पाक्षेपकहिध्मासु सामुद्ग लघुभोजिनाम्।" तसेच रात्री सहचर तेल ½ तोळा सामुद्गच घेण्यास सागितले सहचर तेल कपहर आहे. "हन्ति वातान्। कम्पाक्षेपस्तम्भशोषादियुक्तान्।" दोन दिवसात लक्षात येण्यासारखा फरक पडला नाही, परंतु आणखी तीन दिवसानी सहज कळून येण्यासारखा फरक दिसून आला पुढें पुढे आठ दिवसातच पुष्कळच फरक आढळला हल्ली दिसे ना दिसे इतकाच कप आहे

---

## (५८) चक्कर येणें

रोगी, वय वर्षे ७५, डोळ्याचे ऑपरेशन केल्यानतर एक महिन्यानं चक्कर येऊ लागली. सुमारें अर्धा तास ती चक्कर राहात असे व चक्कर येऊन गेल्यावर डोके जड होई असा क्रम बरेच दिवस चालला होता अर्थात् ही चक्कर कफाची आहे असें ठरविलें चक्कर येणे ह्या विकाराचा इंद्रियस्थानातील नेत्रेंद्रियाशी प्रामुख्यानें सबंध असल्यानं त्या अवयवातील दोषनाशक असा महायोगराज गुग्गुलु व गुळवेलसत्त्व एकत्र करून "ऊर्ध्वजत्रुविकारेषु स्वप्नकाले प्रशस्यते" ह्या वचनानुरोधाने रोग्यास रात्री झोपतांना मधांतून घेण्यास सागितले त्याचा परिणाम दोन तीन दिवसातच चागला दिसावयास लागून आतापर्यंत तो विकार पुष्कळ प्रमाणात नाहीसा झालेला आहे हल्ली तेच औषध धमाशाचे काढ्यांतून देण्यास सुरुवात केली आहे.

---

# (५९) उपदंशज रक्तदुष्टि

रोगी, तीन महिन्याची मुलगी आईबापाना उपदंशाचा विकार उपदंश विकारातील विपाराचा परिणाम मुलीच्या रक्त व त्वचा ह्यावर अनिष्ट होऊन अगावर ठिकठिकाणी चट्टे आले खाजविल्यामुळे रक्त वाहू लागले रोगी पाहण्यात आला तेव्हा दोन्ही गुडघ्याचे मागचे बाजूस, दोन्ही कोपराचे पुढील बाजूस, दोन्ही ढुगणाचे खालचे बाजूस, माडीचे मागें जवळ जवळ -।- इच ते -॥- इच लावी रुंदीचे व्रण होते व्रणाच्या कडा जाड होत्या एका नाकपुडीत आणखी एक व्रण होता त्याच नाकपुडीतून रक्तस्रावहि होत असे इतर किरकोळ व्रण इतरत्र होते रक्तशोधक असा रक्तदोषातक ¼ तोळा दुप्पट पाणी घालून चमचा चमचा देण्यास सागितले सूक्ष्म अष्टमूर्ति १ गुज न आमलकी २ गुजा अगावरील दुधातून उपदशविषनाशक व रक्तदोषातकाचे कार्यास मदत म्हणून दिला. आणि व्रणावर लावण्यास अग्निदग्ध मलम दिले. त्यामुळे सर्व व्रण पुष्कळ लवकर भरून आले.

---

# (६०) अपानदुष्टि

रोगचिकित्सेमध्ये (१) प्रधान दोपाची चिकित्सा प्रथम करणे, (२) औषधि काल व (३) चिन्हांच्या कालिक क्रमावरून संप्राप्तिनिश्चय, या तीन गोष्टींचे महत्त्व पुढील रुग्णचिकित्सेंत स्पष्टपणे नजरेस येईल

रोगी स्त्री, वय ४५. वेगावरोधामुळे मलवाताची अप्रवृत्ति, आनाह, क्षुधानाश,अरुचि, शूल व श्वास ( जेवण झाल्यावर अधिक ) प्रकुपित अपान वायु ऊर्ध्वगामी (प्रतिलोम) झाल्यामुळे आनाह व समान वायूची विकृति व त्यामुळे क्षुधानाश व अरुचि ही लक्षणे उत्पन्न झाली शूल व श्वास यांपैकी शूल हे लक्षण अधिक त्रासदायक होतें

यथास्वजन्मोपशया. स्वतन्त्रा स्पष्टलक्षणाः (व्याधय.)। विपरीतास्ततोऽन्ये तु। विद्यादेव मलान्मपि ( दोषान्मपि )। या वचनाप्रमाणे पाहू गेले असता प्राण, समान व अपान याच्यापैकी अपानदुष्टिच यथास्वजन्म आहे हे उघड आहे चिकित्सेच्या परिणामावरून यथास्वोपशय आहे काय हेंहि कळेल पण अपानविकृतिच प्रधान आहे हे ठरविण्यास दोन तऱ्हेचे प्रयोग करता येतील "अपान चानुलोमयेत।" या वचनानुसार चिकित्सा करून लक्षणे कमी झाल्यास अपानविकृति प्रधान व समान किंवा प्राणविकृति अप्रधान असे ठरेल किंवा समान किंवा प्राणविकृतीची चिकित्सा करून लक्षणे कमी न झाल्याराहि अपानविकृति प्रधान असे ठरेल वरील रोग्यान अनपेक्षित रीतीने दोन्ही प्रयोगाचा अनुभव आला

रोग्याची वातप्रकृति, वय व इतर दृष्टीनेहि वातभूयिष्ठ अवस्था पाहून लशुनासारख्या रसायन, दीपक, पाचक, बल्य, श्वासनाशक पदार्थघटित व इतर अनुलोमक पाचकदीपक औषधांची जोड असलेली लशुनादिवटी, अपानकाली म्हणजे जेवणापूर्वी (अन्नादौ विगुणेऽपाने) ऊन पाण्यातून दिली.

रोगी पुन्हा आला तेव्हा कोणतेंहि चिन्ह कमी झालेलं आढळले नाही ! जास्त तपास केल्यावर रोग्यानें औषध अपानकाली न घेता समानकालीं म्हणजे जेवणामध्ये ( समाने मध्यभोजनम् । ) घेतल्याचें कळलें अर्थात समान दोष अप्रधान ठरला पुन्हा तेंच औषध अपानकाली घेण्यास बजावून सांगितलें त्यामुळें अपानवायूची अध प्रवृत्ति होऊं लागली, शौचास साफ होऊं लागले, आनाह कमी होऊं लागला, भूक वाढली, शूल व श्वास तर सुरुवातीसच कमी झाले म्हणजे "तेषां (दोषाणा) प्रधानप्रशमे प्रशम." ह्या सूत्राप्रमाणें अपानवायूचा प्रशम होताच सर्व चिन्हें नाहीशी झाली. अशा रीतीनें दोन्ही तऱ्हेचे प्रयोग अनपेक्षित रीतीनं केले जाऊन अपानदुष्टीच प्रधान ठरली

---

## ( ६१ ) कर्णार्श

एका मुलाच्या कानात कर्णार्श होता. ७-८ दिवस क्षारतैल कानात टाकल्यानंतर तो अर्श पूर्णपणे नाहीसा झाला. कर्णार्शाची वाढ फार जोरदार नसली, तर कर्णार्शावर क्षारतैलाचा उपयोग उत्तम होतो, परंतु वाढ जोरात असल्यास क्षारतैलाचे क्षरण फार मंदगतीचें ठरते मागें अशाच एका रोग्यात कर्णार्शावर क्षारतैलाचा उपयोग करून पाहिला होता परंतु त्या ठिकाणी वरीलप्रमाणे अनुभव आला त्या रोग्यावर पुढे शस्त्रकर्महि करण्यात आले परतु शस्त्रकर्मानंतर अवघ्या ७-८ दिवसात पुन्हा कर्णविवर पूर्ववत अर्शानें बंद झाले. इतका दोषाचा जोर त्या रोग्यात होता

व्रणातहि क्षारतैलाचा उपयोग अवसादनाकरिता करता येतो. व्रण भरून येताना मांसवृद्धि कांही काही रोग्यात होते त्या वृद्धीवर क्षारतैलाचा उपयोग उत्तम होतो. मांसवृद्धि कमी झाली की, क्षारतैलाचा उपयोग बंद करून रोपणक्रिया चालू करावी

---

धातूना क्रमशो मलाः । " ह्या चरकसुश्रुतोक्त सूत्राचे आधारे धातूचे दृष्टीनें अस्थि-धातूची विकृति असा या लक्षणाचा अर्थ निश्चित केला व तदनुरोधानें " मृगशृंग + धात्री + मुस्ता + गुळवेलसत्व " असा अस्थिधातूवर विशेषत्वानें पाचकस्वरूपात्मक कार्य करणारा योग देण्याचें ठरविलें. भृंगराजतेलाची केशवर्धक म्हणजेच अस्थिधातूवर कार्य करण्याची शक्ति लक्षांत घेऊन अनुपानार्थ योजना केली. हा योग सामुद्गकाली दिला या रोग्यास एक महिन्यातच आश्चर्यकारक गुण दिसूं लागला.

---

## ( ६४ ) मज्जाव्यापत्ति

रोगी स्त्री, वय ४५ वर्षें डोळे गळून जातात. चक्कर येतें पीडन केलें असतां बरें वाटतें. डोळे आत ओढल्याप्रमाणे वाटतात. झोंक जातो. या महत्त्वाच्या तक्रारी होत्या. " नेत्रविट् मज्जो मलः, ' " मज्जानेत्रगौरवम् " ह्या व इतरत्र अशा स्वरूपाच्या विखुरलेल्या लक्षणावरून नेत्र हा प्रामुख्यानें मज्जाघटित आहे असें पाहिलें वरील लक्षणाचा अर्थातच मज्जाव्यापत्तिदर्शक अर्थ स्पष्ट असल्यामुळे मज्जाधातुविकृति हें निदान निश्चित केले. या निदानास अनुसरून " धात्री + मुस्ता + गुळवेलसत्व " हा मज्जेवर कार्यकारी असा योग दिला. वरील लक्षणात संकोच हें एक लक्षण आहे. हें लक्षण स्नायुविकृति दर्शवीत असल्यामुळे वरील योगात शतावरी हें द्रव्य मिश्र करून तो योग पूर्ण केला कालाचे दृष्टीनें या ठिकाणी हा योग सामुद्गकाली मधतुपातून घेण्यास सांगितलें या औषधयोजनेचा उपशय स्पष्टपणें दिसून आला.

---

## ( ६५ ) अण्डवृद्धि

अण्डवृद्धीचा रोगी. सूज व जलसंचय दोन्ही लक्षणे होती. शौचास खडे व ओटी-पोटात शूल होता त्यावर प्रथम आरोग्यवर्धिनी व सहचरतैलाचा उपयोग केला. त्यामुळें शौचास साधारण बरे व शूल थोडासा कमी झाला. पुढें सात दिवस एरंडतेल दुधांतून सकाळी १ तो. प्रमाणें घ्यावयास सांगितलें. त्याने शौचास चांगले साफ होत जाऊन वृद्धिहि कमी झाली व शूलहि बराच कमी झाला. असा उपशय मिळाल्यामुळे गुल्मचिकित्सेतील मिश्रकस्नेह त्यास सिद्ध करून दिला व तो घ्यावयास सांगितला.

---

# (६६) श्वसनक सन्निपात (बालरोग)

रोगी, वय २ वर्षे अन्न-दुग्धाशी पूर्वी मृद्रस्थीचा विकार झालेला, प्रकृति साधारण अशक्त रोगी ता. १३-७-३५ ला ओपध घेण्यास आला त्या वेळी श्वसनक सन्निपाताची वरीच लक्षणें स्पष्ट दिसत होती. नाकपुड्या व पोट उडत होतें कोरडा खोकला, ज्वर, आध्मान, अल्पप्रमाणात अतिसार असून रोगी डोळे मिटून स्वस्थ पडून असे दूध देखील पीत नसे हा या ज्वराचा ४ था दिवस होता कफाचें व उरःस्थानाचें शोधन व्हावें म्हणून जेष्ठमधाचे कषायातून प्लीहोदरारि चूर्णाच्या ६ गुंजांच्या दोन पुड्या दिल्या. पण त्याने ओकारी न होता शौचाला मात्र झालें दुसरे दिवशीं कास अधिक प्रमाणात दिसून आल्यामुळें लक्ष्मीविलासगुटी १ गो + उत्पल ४ गु + आमलकी ४ गु + जेष्ठमध ४ गु + प्रवाळ चंद्रपुटी १ गु यांचें मोरावळ्यातून चाटण दिलें आणि आध्मान असल्यामुळे प्लीहोदरारिचूर्ण ३ गु गरम पाण्यातून दिलें

ता १६-७-३५ पासून त्यास अमृता ४ गु + अडुळसा ३ पानें + बिभीतक १ मा + पुनर्नवा ४ गु + जेष्ठमध १ मा + रिंगणी ४ गु याचा कषाय खडीसाखर घालून थोडा थोडा वारवार देण्यास सांगितलें तसेंच लक्ष्मीविलासगुटी १ गो + प्रवाळ १ गु + जेष्ठमध ४ गु यांचें चाटण आणि पुष्करमूळ + देवदार + सांवरशिंग + पुनर्नवा याचा छातीवर दुधातून लावण्यास लेप दिला हीच योजना ता २३-७-३५ पर्यंत सुरू होती

ता १६ ते २० पर्यंत ताप १०० चे वर होता; पुढें तो कमी झाला त्याचप्रमाणें श्वसन प्रथम ५० होतें ता. २० नंतर तें ३८ वर आलें नाडीचे ठोके ता १६ ला १५५, ता २० ला १३५, ता २३ ला १२० या प्रमाणात होते

ता २०-७-३५ ला रोग्याला खोकताना फारच त्रास होत होता व अधिक प्रमाणात घाम येत होता

ता २३-७-३५ ला रोग्याची स्थिति बरीच समाधानकारक होती. रोगाचा जोर सुरुवातीपासून प्रबळ असून रोगी अशक्त असल्यामुळे काळजी वाटत होती ती दूर झाली या दिवशीं त्यास बरीच हुषारी वाटत होती आध्मान नव्हते शौचास साफ होत होतें. तापमानहि कमी होते नाकपुड्याहि फारच कमी प्रमाणात उडत होत्या ता २३ पासून पुढील औषध देण्यास सुरुवात केली

पुनर्नवा ४ गु + गुळवेल ४ गु + रिंगणी ४ गु + जेष्ठमध ६ गु + अभया ४ गु याचा कषाय थोडा थोडा वारवार दिला लक्ष्मीविलासगुटी १ गो + जेष्ठमध ४ गु यांचे मधातून चाटण दिलें

यानें रोग्याला हळूहळू आराम वाटूं लागला रात्रीं ताप येईनासा झाला कास कमी कमी होऊं लागला हुषारी वाटूं लागली व ता २९-७-३५ ला तर " मला भाकर खावयास दे " म्हणून हट्ट घेऊं लागला

या दिवसात तापाचे प्रमाण ९७॥ ते ९८॥ चे दरम्यान, श्वसनाचे प्रमाण ३८ ते ३३ चे दरम्यान व नाडीचे ठोके १२० ते १२८ चे दरम्यान होते

ता. २९–७–३५ ला रोग्याला वरीच हुषारी वाटत होती. नाकपुड्या उडत नव्हत्या, आणि छातीत रोध नव्हता, म्हणून रोग्यास व्याधिप्रत्यनीक पण बलकर असा योग-- आमलकी २ गु. + सितोपलादि २ गु. + जेष्ठमध ४ गु. + गुळवेलसत्व १ गु याच्या दोन पुड्या खडीसाखरेचे पाकातून देण्यास सुरुवात केली

या रोग्यांत बद्धलकफ असा कधीच सुटला नाही. आहार गाईचे दुधाचा होता रोगी समाधानकारक रीतीनें सुधारला

---

# (६७) अपानावृत व्यान

अपानेनावृते व्याने भवेद्विण्मूत्ररेतसाम् ।
अतिप्रवृत्तिस्तत्रापि सर्वं संग्रहण मतम् ॥

रोगी पुरुष, वय १५. ह्या रोग्यास ५ वर्षापूर्वी टायफॉईड झाला होता त्यात डिलीरिअम (उन्माद) व अतिसार हे उपद्रव म्हणून झाले होते ज्वर बरा झाल्यापासून दिवसांतून ७-८ वेळा शौचास जावे लागे. प्रत्येक वेळी शौचास पातळ होत असे तसेंच रोगी दिवसा शौचाचे वेळेखेरीज लघवीला २-४ वेळा जात असे तसेंच रात्रीहि ३-४ वेळा लघवीला उठावे लागत असे. ह्या पुरीष व मूत्र ह्याच्या अतिप्रवृतीबरोबर वेग आवरला न जाणे, विशेषत: जेवण झाल्यानतर मुळीच वेग आवरला न जाणे हहि लक्षण होतें ज्वरातून उठल्यानतर बृंहण-रसायन-चिकित्सा न झाल्यामुळे त्या वेळी झालेला व्यानाचा व अपानाचा प्रकोप शात न झाल्यामुळे अपानाने व्यानाचे आवरण केलं त्यामुळें अतिविष्टाप्रवृत्ति तशीच राहिली व तीबरोबरच अतिमूत्रप्रवृतीहि सुरू झाली. वय हल्ली १५ असल्यामुळे व गेल्या ५ वर्षाचा काल शुक्रव्यक्तीचा नसल्यामुळे शुक्राची अतिप्रवृत्ति सुरू झाली नव्हती आतां जर चिकित्सा सुरू झाली नसती तर पुढील १-२ वर्षात ही दिसूं लागली असती

ह्या ठिकाणी अजीर्ण हे कारण नव्हते. रोगी दररोज ३-४ मैल शाळेस जात असे त्यामुळें अन्नपचन चांगले होत असे भूक उत्कृष्ट लागत असे. केवळ दोन्ही वातांची दुष्टीच होती, कारण वातूळ व तिखट पदार्थ खाल्ल्याने चिन्हे वाढत असत.

**चिकित्सा:**—येथें "तत्रापि सर्वं संग्रहणं मतम्" ह्या वचनाप्रमाणे संग्रहणचिकित्सा करणे जरूर होते ते संग्रहण केवळ कषायादि रसाच्या वातप्रकोपक औषधानी करून उप-

योगी नाही, तर दीपनपाचन व वातशामक (म्हणजे स्निग्धादिगुणयुक्त) अशाच औषधीचा येथे उपयोग स्वतंत्रपणे किंवा पाचनधर्माला अनुकूल असलेल्या स्तंभक आणि वातशामक बल्य अशा तिक्तरसाच्या औषधाबरोबर केला पाहिजे तसेच तें कषाय व तिक्तरस हे अप्रधान पाहिजेत संग्रहण वातशामक पाहिजे येथें आवरक जो अपान त्याचे शमन झाले पाहिजे, म्हणून कषाय परंतु अम्ल, स्वादुपाकी, स्निग्ध, बलकृत्, वातपित्तजित् अशा रौप्यभस्माची (½ गुंज) योजना शतावरी घृतातून केली शतावरी तिक्त मधुर बल्य, तिचे घृत बल्य व वातपित्तजित् असे आहे रौप्यभस्म हे ताम्रादिधातूच्या भस्माप्रमाणे स्वातन्त्र्याने वापरण्याची पद्धति नाही ते पारदकल्पाबरोबर द्यावयाचे असते. म्हणून रससिंदूर (½ गुंज) त्याचेबरोबर दिला त्यामुळे (रससिंदूर उष्ण असल्यामुळे) शतावरी घृत व रौप्यभस्म ह्याचे शीतत्वहि कमी झाले. शतावरीघृताने रौप्याचा परमलेखन धर्म कमी झाला व सर्व योग वातनाशकबल्य असा झाला हा योग व्यान व अपान दोन्ही वायूंना शामक व्हावा म्हणून सामुद्गकाली दिला

हा योग दिल्यानंतर दुसरे दिवशी शौचाच्या वेळा तितक्याच होत्या, परतु एकदोन वेळा शौचाला गेल्यानंतर शौचास झाले नाही तिसरे दिवशी शौचाच्या वेळा कमी झाल्या तीन-चार वेळा शौचास गेला व रात्री १-२ वेळाच लघ्वीला उठला पाचवे दिवसापासून सकाळी फक्त एकच वेळ शौचास आणि तें बांधून झाले. रात्री लघ्वीला मुळीच उठेनासा झाला सर्व दिवसात ३-४ वेळेलाच लघ्वीला जाऊं लागला हा विकार ५ वर्षाचा जुना होता त्यावर रौप्य हे दीर्घरोगघ्न म्हणून शीघ्र उपयुक्त झाले

रौप्यभस्माचे गुण —रूप्य शीत कषायाम्ल स्वादुपाकरस सरम् । वयस स्थापन स्निग्ध लेखनम् वातपित्तजित् ॥ आयुष्य दीर्घरोगघ्नं रजत लेखनं परम् । पक्व भस्मापि तन्नैव योज्य ताम्रादिभस्मवत् ॥ अभावाद् व्यवहारस्य योज्य रसादिषु ॥

---

## (६८) स्त्रियांतील जन्मतः शुक्रधातूचें अबलत्व

रोगी स्त्री, वय २५ रस, मज्जा व शुक्रक्षयाची लक्षणे मूळचा शुक्रधातू अबल होता त्याच्या क्षयाने मज्जाक्षय झाला व प्रसूतीनंतर झालेला रसक्षय भरून आला नाही प्रस्तुत स्त्रीस नऊ वर्षापूर्वी एक मुलगा झाला त्यानतर मूल झालेच नाही प्रसूतीच्या अगोदर प्रकृति चागली होती प्रसूतीनतर शुक्रक्षय व रसक्षय सुरू झाले कामवासना मूळचीच कमी अशा स्थितीत पतीच्या विषयवासनेला सादर व्हावे लागत असल्यामुळे व प्रथमप्रसूतीनतर पहिल्यापेक्षाहि विषयवासना कमी झाल्यामुळे शुक्र-

क्षय अधिकच होत गेला. त्याचा प्रतिलोमपद्धतीनें मज्जाक्षय सुरु झाला. शुक्र-क्षयाची अशक्तिमैथुनें, मैथुनासहत्व, योनिवेदना, अगस्पद, इ. लक्षणे सुरू झाली हीं वाढत चाललीं तशीं मज्जाधातूच्या क्षयाची तमःप्रवेश, मलबद्धता व मलस्तंभ (मज्जेचा मल, पुरीषस्नेह), तसेंच अंतर्दाह व बहिःशैत्य, त्वचा रूक्ष, पर्वभेद अशी चिन्हे होऊं लागली. त्यांत रसक्षयाची भर पडून रौक्ष्य श्रमः शोषो, ग्लानिः शब्दासहिष्णुता व हृत्पीडाकम्प आणि हृदयं ताम्यति स्वल्पचेष्टस्यापि ही चिन्हें व्यक्त झाली त्यांत प्राणाची विकृति म्हणून ढेंकर फार येत असत. हें चिन्ह मागाहून कळलें

येथें शुक्र व रसादिधातुंवर बृहणकार्यकारी मधुमालिनीवसत १ गुज, रसवृद्धीकरिता व धातुक्षयोक्तदाह (रसक्षयोक्तदाह, हातपाय ह ची आग) कमी करण्यास प्रवाळभस्म १ गुज व मज्जाक्षय कमी करण्यास व तज्जन्य दाह, अतर्दाह व नेत्रदाह कमी करण्यास गुळवेल सत्व १ गुज घालून मोरावळयात व्यानकालीं दिले हें एकच औषध दिलें, तेंहि एकच वेळीं दिलें. त्याचा अत्यंत आश्चर्यकारक असा परिणाम दिसून आला की, दुसरे दिवशीं शौचाला साफ झाले. औषध हें व्यानकाली दिलें असता शौचास साफ झालें, ह्याचा अर्थ वरील योगानें मज्जा व शुक्रधातूंची वृद्धि केली व त्यांच्या क्षयानें जो अपानाचा प्रकोप झाला होता तो कमी होऊन अपानाचे अनुलोमन होऊन शौचास साफ झाले तेव्हांपासून आतापर्यंत कधीच मलावरोध झाला नाही व सर्व रस-मज्जाशुक्रक्षयाची लक्षणे भरून येऊं लागली. आज अत्यल्प प्रमाणात काही चिन्हे मात्र आहेत आठ दिवसानी उद्‌गारबाहुल्य हे चिन्ह कळून आलें हं प्राणदुष्टीचे लक्षण म्हणून प्राणस्थानापैकी ज्या स्थानात प्राणप्रकोप आहे, त्या आमाशयस्थानावर मधुरविपाकानें कार्य करणारें शंखभस्म २ गुजा, वातशामक सूक्ष्म समीरपन्नग ३ गुजा व जेष्ठमध ४ गुजा, मोरावळयांत प्राणकाली चाटणाकरितां हा योग दिला त्यामुळें तें चिन्ह कमी झालें.

सदर स्त्रीच्या वडील दोन वहिणीतहि शुक्रधातूची अबलता कळून आली. त्या दोघीना दोन दोन मुलेंच झाली. पुढें कांहीं नाही. त्या मातापित्यांच्या ऐन तारुण्यातल्या होत्या म्हणून दोन दोन मुलें तरी झाली. त्यांची प्रकृतीहि ह्या स्त्रीप्रमाणेच मुलें होईपर्यंत चांगली व पुढें जवळजवळ असेंच विकार सुरू झाले होते ह्यावरुन हा शुक्रदोष, शुक्राचें अबलत्व, वरील तिन्ही स्त्रियांमध्यें होता असें दिसते

---

## (६९) प्राणदुष्टि

एका रोग्यास छातीत रोध झाल्यासारखा वाटत असे. गिळतांना त्रास होई, श्वासास थोडीशी पंचाइत पडत असे व पोटांतहि थोडें दुखत असे अन्न खाल्ल्यावर त्रास होत

भेंं, पण गिळतानाच बराच त्रास होई. पाण्याच्या घोटानें घास गिळावा लागत असे. दुसरी विशेष कोठलींच लक्षणे नव्हती. याप्रमाणे ४-५ महिन्यापासून चाललें होते.

या रोग्यात अनुमानानें प्राणदुष्टि ठरवून शूलघ्न व वातशामक असा महावातविध्वंस व त्याच्यावरोबर वातशमनास स्निग्धोष्णत्वामुळे उपयोगी पडणारी व रोधनाशक अशी सुंठी ही एकत्र करून "ग्रासग्रासान्तयोः प्राणे" या प्राणवायूच्या चिकित्साकालाप्रमाणे वातशामक असा घृत या अनुपानातून दिली व वरून स्नेहस्वेद मागितला. शिवाय कोष्ठ-शूलहि थोडा होता तेव्हा अपानाचें अनुलोमनाकरिता भास्करलवण व सौवर्चल (वायूचें अनुलोमन जास्त प्रमाणात व्हावें म्हणून) अशी एक पुडी रात्री निजताना तुपात घेऊन वर गरम पाणी घेण्यास सागितले. या चिकित्सेचा तावडतोब (फक्त तीनच पुड्यात) घडलेला परिणाम म्हणजे त्यास पाण्याशिवाय घास गिळता येऊं लागला व गिळताना होणारा त्रासहि जवळ जवळ अजिबात नाहीसा झाला व श्वास मोकळा होऊं लागला. कोष्ठशूल मात्र थोडासा राहिला होता तोहि मग याच चिकित्सेनें विशेषतः केवळ भास्करलवण+सौवर्चल या चिकित्सेने बरा झाला. एकदां दुष्टवायूंची निश्चिति झाल्यानतर तच्छामक द्रव्याचा त्या त्या काली उपयोग केल्यास वातशमन फारच त्वरेनें होतें

---

# (७०) वातभूयिष्ठ ग्रहणी

एका वातभूयिष्ठ ग्रहणीच्या रोग्यात समानकालीं पचामृतपर्पटी+सौवर्चल ह्या अम्लद्रव्यावरोबर (ताकावरोबर) दिलेल्या योगाने फारच लवकर फायदा वाटला. पचामृतपर्पटी ही ग्रहणीला बल्य व तत्स्थ वातदोषशामक व त्या ठिकाणी वातामुळें होणारा अपानावरोध नाहीसा करून कमी करण्याकरिता सौवर्चल असा योग दिला होता विशेष म्हणजे या ग्रहणीत अम्लाचा उपशय चागल्याच तऱ्हेने अनुभवास आला पथ्य ताकच ठेविलें होतें

---

# (७१) शीतपूर्वक ज्वर

शीतपूर्वकज्वराच्या ७ रोग्यात पारिजातककषाय शीतता दूर करण्यास उपयोगी पडला एक दिवस पारिजातक कषाय दिल्यानबरोबर दुसऱ्याच दिवशी शीताचे प्रमाण बरेंच कमी होई. प्रमाण:—मोठ्या मनुष्यास दिवसातून १५ ते २० पानापर्यंत दिलें गेलें.

---

# (७२) वातज अश्मरी ( मुतखडा )

रोगी वय १३, पुरुष. सहा महिने झाले, लघ्वीला त्रास होत असे. ज्या सप्ताहात रोगी औषध घेण्यास आला त्या सप्ताहात लघ्वीला नेहमी थेंब थेंब होत असे. लघ्वी करतेवेळी लघ्वीची जागा चोळाविशी वाटे. (गृह्णाति मेदन नाभि पीडयति . .।) पोटात पाठीमागचे बाजूला कळा निघत, माडी घालून ताठ बसता येत नसे व पळताना बस्तीत कळा निघत.

वातजअश्मरी असें निदान करून रोग्यास ता १९–८–३५ पासून " पाषाणभेदो वसुको "'। ' इत्यादि मूत्राघात चिकित्सोक्त द्रव्यानी गाईचे तूप सिद्ध करून सकाळ सध्याकाळ सामुद्ग अवपीडक मात्रेनें घेण्यास सागितलें. ता. २२–८–३५ ला थेंब थेंब लघ्वी होण्याचे बंद होऊन लघ्वी धारेनें होऊं लागली लघ्वीचे सुरुवातीस होणारा त्रास कमी झाला, पण मागून होणारा त्रास मात्र पूर्ववत् होता

औषधीचा उपशय आलेला पाहून तेच घृत सुरू ठेवलं. ता. ३–९–३५ ला तर रोग्यास बरेच समाधानकारक वाटूं लागलें. पण बसता उठता लघ्वीचे जागी होणारी कळ मात्र कमी होईना. म्हणून तेथें वातनाशक तेल चोळण्यास दिले ,

ता. २१–९–३५ ला निघणारी कळहि नाहींशी झाली व मुलगा काही एक त्रास न होता धावूं शकला.

आहारात डाळीचे पदार्थ वर्ज्य केले होते मूत्रल अशी करडूची भाजी खाण्यास सागितली होती.

वरील घृताच्या पाठांतील प्रतिवाप द्रव्यांतील शिलाजतु सोडून इतराचा कल्क केला होता व शिलाजतूचा प्रतिवाप दिला होता

या रोग्याच्या मूत्राशयांत एषणी घालून अश्मरीचा आकार जाणून घेतला नव्हता

---

# (७३) वातज अश्मरी

रोगी वय ९ वर्षें, पुरुष. याची लघ्वीची तक्रार काही कांही महिने मध्यतरी जाऊन पुन्हां पुन्हा उद्‌भवत असे. आणि ज्या वेळी लघ्वीला त्रास होई, त्या वेळी अतिसार सुरू होत असे. लघ्वीचे वेळी वांकडे व्हावे लागे लघ्वी थेंब थेंब येऊन लघ्वीचे वेळी ती जागा चोळावीशी वाटे एषणी घालून पाहता अश्मरी असल्याचे आढळून आलें.

यासहि " वातजाश्मरी " असें निदान ठरवून वरील " पाषाणभेदादि घृत " देण्यात आलें सकाळसंध्याकाळ सामुद्ग व अवपीडक मात्रेनें (अ हृ. सू अ ४ श्लो. ७।८) घृत दिलें जात असे या रोग्यास एका महिन्याने बरें वाटूं लागलें लघ्वी सुरळीत होऊ लागली व त्रास कमी झाला

---

# (७४) वातज अश्मरी

रोगी वय ६ पुरुष अश्मरीचा विकार २–३ वर्षापासून होता यास लघ्वीचे वेळीं अति त्रास होत असे लघ्वी मध्यतरी एकाएकी थाबून बंद होई व या वेळी रोग्याला अत्यंत त्रास होऊन पातळ शौचास होई लघ्वीची जागा व नाभी दाबत असे

यासहि वरील " पाषाणभेदादि घृत " दिलें सात-आठ दिवस औषध दिलें, पण उपगय आला नाहीं रोग्यास फारच त्रास होत असल्यामुळे शस्त्रक्रिया करून अश्मरी काढण्यात आली ती सुपारीएवढी साधारणपणे होती

वरील रोग्याचें शस्त्रकर्म करण्यात आलें मूत्रमार्गात थोडासा पूहि होता मूत्राशयाला बांधलेल्या टाक्यामधून लघ्वी पोटात येऊन बाहेरच्या जखमेतून पट्टीवर आली इतकें झालें तरीहि शोधन तेलाचा उत्तरबस्ति दिल्यामुळें जखम पूर्णपणे बरी झाली व रोगी आता शस्त्रकर्माच्या पूर्वी होत असलेल्या दु खातून मुक्त झाला आहे

यावरून उक्त घृताचा जुनाट व मोठ्या अश्मरीवर त्वरित परिणाम होत नसावा असें वाटतें अश्मरीभवनाला नुकतीच सुरवात झाली असल्यास " अवपीडन " (अ हृ सू अ ४ श्लो ७-८) कल्पनेनें वरील घृत दिल्यास उपयोग झाल्याचें आढळून येते

---

# (७५) जलोदर

रोगी वय ८, मुलगी चिकित्सा सुरू करण्यापूर्वी सुमारें ६ महिने अगोदर देवी आल्या होत्या ,त्याशिवाय हिवताप वगैरे विशेष आजार झाला नव्हता रोग्याला बद्धकोष्ठाची सवय नव्हती किंवा शौचाला साफ व्हावे म्हणून वारवार विरेचनहि घ्यावे लागत नसे पण देवी निघून गेल्यावर सुमारे ४ महिन्यानी जलोदराची चिन्हें दिसू लागलीं

औषध सुरु झालें त्या वेळीं पोट पाण्याने तुडुंब भरलें असून पोटावर निळया शिरा दिसत होत्या शौचाला एकदोन वेळा जावें लागत असे पण साफ होत नसे भूक चागली लागत नव्हती रोगी आला त्या वेळीं त्याचे पायावर सूज नव्हती

उदरवेध करून पाणी काढून टाकण्यात आले. यकृत्प्लीहा वाढलेली नसल्याचे आढळून आले

या रोग्यास पुढील औषधि सुरू केली पुनर्नवा १ मा. + देवदारु १ मा. + हरितकी २ मासे + गुळवेल १ मा याचा कषाय करून " उदरावरील योग " (अष्टांगहृदय, हृदय चिकित्सास्थान अ. १८ वा श्लो ३९ वा अमृता द्वितयं " " ) २-३ गुंजा सकाळ-संध्याकाळ देण्यास सुरुवात केली

अन्न'—ताक, भात, गाईचे दूध यागिवाय अन्य काही देण्यात आले नाही अन्न म्हणून द्यावयाचे ताकाबरोबर चोवीस तासात एक मासा त्रिकटु द्यावयास सांगितले

सुरुवातीपासून वरील औषधें सुरू होती त्यात बदल करण्यात आला नाही

मध्या मुलीचे उदरात पुन्हा पाणी साठण्याची प्रवृति कमी झाली असून शौचाला साफ होते व भूकहि नीट लागते

---

# ( ७६ ) गुदभ्रंश

रोगी वय ३ गुदभ्रंश, आवरक्त, लघ्वी पाढरी व शौचास कुंथावे लागून शौचास बसले की, त्या स्थितीत एकसारखे बसून राहावयाची कुथावयाची प्रवृत्ति याप्रमाणे लक्षणे २॥ महिन्यांपासून चालू होती.

यातील सर्व लक्षणाना सामान्य कारण अजीर्ण हे होते. कारण अजीर्णामुळे उत्पन्न झालेल्या रसातून मूत्र ताकाप्रमाणे गढूळ होई. बऱ्याच दिवसाच्या आमामुळें व कुथण्यामुळें गुदभ्रंश होई व रक्तहि पडत असे. तसेंच गुदाच्या ठिकाणी वातप्रक्षोभ असल्याकारणाने गुदशूलहि होत होता. यात चिकित्सा वातानुलोमक, बल्य (ग्रहणी व आत्र, गुद, इत्यादिस) व दीपक पाचक अशी पाहिजे होती म्हणून—

१ बल्य व पाचक असा राजवल्लभ रस सकाळी ½ गुंज मधातून दिला.

२ दुपारी व रात्री दीपक, ग्रहणीवर बल्य कार्य करण्याकरिता म्हणून पचामृतपर्पटी दिली. त्याबरोबरच मुरडा कमी करणारी शतपुष्पा व वायूचे अनुलोमन करून आम सोडविणारे सौवर्चल हेंहि दिले. ग्रहणीवर विशेष कार्य होण्यास समानकाल योजण्यात आला अनुपान ताकच ठेवण्यात आले होते पथ्यहि ताकच होते

३ शौचाहून उठण्याची प्रवृति कमी व कुंथण्याची प्रवृति जास्त ह्या दोन्ही लक्षणांवर धोतऱ्यामुळे वातप्रक्षोभ कमी करणारा असा कनकसुदर रस हाहि पर्पटीबरोबरच दिला होता.

बाह्य उपाय म्हणून गुदशूल कमी होण्याकरिता व त्याला थोडेंसे मार्दव येऊन तें गुद आत बसावें म्हणून चिचुद्रीच्या अगर उदराच्या मासात स्नेह व लवण टाकून त्यानें शेकण्यास सांगितलें पण तें न मिळाल्यामुळें त्या दिवशीं भातातच तूप टाकून त्यानें शेकण्यास सांगितलें व मायफळ मधानून लावण्यास सांगितलें दुसऱ्या दिवशीं मात्र अजमांसाने शेकण्यास सांगितलें

ह्या सर्व चिकित्सेचा परिणाम ३ दिवसातच चांगला दिसला सर्व लक्षणें कमी झाली, पण एक दिवस शिरा खाण्यात आल्यावर पुन्हा लघ्वी पाढरी व आम एवढींच लक्षणें पुन्हा दिसलीं पण वरील चिकित्साच पुन्हा ५-६ दिवस दिल्यानें तीं सर्व लक्षणें कमी झालीं गुदभ्रंश कमी झाला. आता भ्रंश होत नाही आंव्हि पडत नाही रक्त तर पहिल्या दोनच दिवसात अगदी बंद झालें वरील शिऱ्याचा अनुपशय हा सुद्धा अजीर्ण हें कारण मानावयास पोपक असाच झाला

---

# ( ७७ ) हृदयशूल ( अपानविकृतिजन्य )

रोगी, वय २८ वर्षे अंगानें साधारण मध्यम, सकृत्दर्शनीं निरोगी पण पुढील लक्षणांनी पीडित होता —(१) मधून मधून छातीत हृदयाच्या ठिकाणीं कळ (२) हातापायास मुंग्या व आग, कधी कधीं सर्वांगास मुंग्या व आग (३) पोट फुगणें (४) शौचास साफ न होणे (५) भूक न लागणे, ही लक्षणें ४–५ महिन्यापासून होत असत

"ज्या ज्या वेळीं रोगी छातीसंबंधी काही तक्रार करील त्या वेळी पोट तपासणें," या नियमानुसार पोट तपासलें व छाती पाहिली त्यात कोणत्याहि तऱ्हेची विकृति आढळली नाही

सुरुवातीपासूनचा इतिहास पाहिल्यानतर त्यात असें आढळून आलें कीं, त्याची पहिली तक्रार बद्धकोष्ठाचीच होती व नंतर बाकीची लक्षणें उत्पन्न झाली यात मूळ कारण अपानदुष्टीचेंच होतें कारण अपानाची प्रवृत्ति व्यवस्थित न झाल्याने मलमूत्र-प्रवृत्ति व्यवस्थित होत नसे व अपानाच्या रोधाचा परिणाम म्हणून अपानवृद्धि व त्यामुळें समानविकृति व समानविकृतीमुळे अग्निमांद्य तसेंच ही परिस्थिति बरेच दिवस राहिल्याकारणानें त्याचा परिणाम व्यानावर झाला व त्यामुळे सर्वांगात मुंग्या येऊं लागत व हृदयाच्या ठिकाणी शूल होई

प्रथम बद्धकोष्ठ, त्याचा परिणाम अग्निमांद्य व अग्निमांद्यामुळे पुन्हा बद्धकोष्ठ, याप्रमाणें हे चक्र चालू होतें. स्रोतसांना मोकळा ठेवणारा समान विकृत झाल्यामुळे पुन्हा बद्धकोष्ठ होई बद्धकोष्ठ व अग्निमांद्य यामुळे विदग्ध स्वरूपाचें पित्त वाढल्यामुळें व

पुष्कळ काल झाल्यामुळे धातूंच्या ( रसरक्ताच्या ) ठिकाणीहि एक प्रकारची विदग्धता उत्पन्न झाली व त्यामुळें हातापायाची व सर्व शरीराची आग होई

या दृष्टीनें विचार करिता मूळ कारण जें अपानदुष्टि ते नाहीसें करावयास पाहिजे व " अपान चानुलोमयेत् । " या सूत्राप्रमाणे स्रोतोरोधनाशक व अनुलोमक असे भास्करलवणचूर्ण या रोग्यास सकाळी १ मासा व दुपारी व रात्री अपानकाली १-१ मासा देण्यांत आले. सकाळचा कफकाल असल्याकारणाने अनुपान गरम पाणी देण्यात आले दुपारी व रात्री अपानावर शामक कार्य व्हावे म्हणून तूप व गरम पाणी ठेवण्यात आले. याचा प्रथम व इष्ट परिणाम म्हणजे अपानप्रवृत्ति व्यवस्थित होऊं लागली व त्यामुळे पोटातील जडपणाहि कमी वाटूं लागला व आध्मान नाहींसे होऊन त्याचा जो छातीवर खालच्या बाजूने दाब पडत असे तोहि कमी झाला व भूक वाटूं लागून, छातीतील दुखणेंहि बऱ्याच प्रमाणात कमी झालें. ही लक्षणे कमी झाली, तरी अंगाची आग व मुंग्या मात्र विशेष कमी झाल्या नाहीत. म्हणून व्यानवायूवर कार्य करण्याकरिता म्हणून व्यानकाली ( व्यानेऽन्ते प्रातराशस्य ) ( स्निग्ध वातशामक व पित्ताचा व रक्ताचा विदाह कमी करणारी ) गुडूची ( गुळवेल )+( पित्तशामक, शीत, दाहशामक व विदग्धपित्तयुक्त वायूला अविरोधी असा ) पांढरा चंदन + ( रक्तावर पित्तशामक कार्य करणारी ) मंजिष्ठा अशा तिन्हींचा काढा करून त्यात तूप घालून दिला शिवाय भास्करलवणहि चालू होतेंच रात्री कोष्ठशुद्धीकरिता तिलादिमोदक (पथ्यातिलगुडैः पिंडो कुष्ठ सारुष्करैर्जयेत ।) ( १ गोळी ) दिला होता पोटावर एरंडेल व पादेलोण चोळून शेक देण्यास सांगितला होता.

या सर्वांचा परिणाम फारच लवकर झाला सर्वच लक्षणे तावडतोब कमी होत गेली. व्यानवायूचे शमनानें मुंग्या व दाहहि कमी झाला व हृदयशूलहि कमी झाला. अपानशमनामुळें बद्धकोष्ठ व आध्मान कमी झाला व अपानाच्या शमनामुळे समानविकृतीहि नाहीशी होऊन भूक लागूं लागली. शेवटी वातशामक, बल्य, दीपक असें अश्वगंधारिष्ट सुरू ठेविलें होते

या अवस्थेंत निरूह बस्तिहि उपयोगात आणिता आला असता पण बस्तिचिकित्सा करण्यांत आली नाही

केवळ मज्जाक्षीणतेमुळें ( स्नेह कमी झाल्यामुळें ) बद्धकोष्ठ व त्वचेचा दाह वगैरे लक्षणे होऊं शकली असती, पण यातील ( मज्जाक्षीणातील ) बद्धकोष्ठात मलाचे खडे रूक्ष व शुष्क असे होतात तसेंच इतर मज्जाक्षीणाची लक्षणे आढळली नाहीत म्हणून मज्जाक्षीणतेची चिकित्सा न करिता वरीलप्रमाणे चिकित्सा केली गेली

एका ठिकाणचा वायु व विशेषतः अपानवायु दुष्ट झाल्यानतर इतरहि वायु विकृत होतात. अशा वेळी प्रथम दुष्ट झालेल्या वायूची व विशेषतः अपानाची अनुलोमक चिकित्सा केल्यानें इतरहि वायूंची दुष्टि कमी होते व त्याच्यामुळें उद्‌भवलेली लक्षणे कमी होतात

---

# (७८) श्वास

रोगी, वय वर्षें ४०. दवाखान्यांत आला तो उसासा टाकीतच बाकावर बसला. त्यास काही काल तर बोलता येईना बऱ्याच वेळाने त्याने आपली हकीकत सांगितली दरसाल याच दिवसात (पावसाळा व हिवाळा याच्या संधिकालात) दमा उठतो. आज पंधरा दिवस झाले, दमा सुरू झाला त्याला छाती तपासली. बारीक आवाज (cooing sounds) ऐकूं येत होते. परसाकडेस साफ होत नव्हतेच छाती दुखत होतीच त्यास प्रथम यष्टिमधु ४ गुंजा + मृगशृंग २ गुंजा + सितोपलादि चूर्ण ४ गुंजा दिले, पण उपयोग दिसला नाही श्वासकुठार, समीरपन्नग देऊन पाहिला, पण उपयोग व्हावा तितका झाला नाही मग छातीस तेलाने मर्दन करून मिठाने शेकून घाम काढण्यास सांगितलें व सकाळी ओटण्याकरिता धोतऱ्याच्या पानाची पूड + कडु वृंदावन चूर्ण + मनशीळ याचे एकत्र चूर्ण दिलें. सांगण्याचे आश्चर्य कीं, या धूमाने त्याची छाती साफ मोकळी होऊन त्यास दुसरे दिवशी बरें वाटले व रोगी आनंदित झाला

---

# (७९) विषूचिका

रात्रीं १० वाजण्याची वेळ एकाएकी एक इसम घाईघाईने मजकडे आला व घरी चलण्यास विनंति केली जाताना जेवढी माहिती काढणे शक्य होती तेवढी काढून घेतली जागी जाऊन रोग्यास तपासलें

रोग्याची लक्षणे --पोट भयंकर फुगलें होते, जीव घाबरा होत होता, हातापायास भयंकर पेटके येत होते थोडक्यात, बेचेन स्थितीत असून तो फार घाबरलेला होता हातपाय गार लागत होते, डोळे तारवटलेले दिसत होते

पूर्व लक्षणे --सकाळपासून सारख्या वात्या व जुलाब होत होते व दुपारपासून लघ्वी बंद झाली होती

पूर्व इतिहास - तो आदले दिवशी रात्रीच परगावाहून आला होता वाटेत बरेच ठिकाणी पाणी प्याला असून ज्या गावी गेला होता तिकडील हवा बिघडल्याची वदंता होती खाण्यात शिळया भाकरी आल्या होत्या

चिकित्सा-- विषूचिकेची (cholera) शंका येणे साहजिकच आहे, पण इतर लक्षणावरून अपचन हेच मुख्य कारण आहे हेहि लक्षात येते. पोट वायूने फुगले होते वायूचे अनुलोमन करणारी व पाचक चिकित्साच हवी होती म्हणून अर्धा चमचा लसुणाचा

रस घेऊन त्यातून चाटण्यास १ गुंज कनकसुंदर दिला एवढ्याच चिकित्सेनं त्याचं पोट दोन तासांत साफ झालें. दुसरे दिवशी कांही एक खाण्यास न देता पाण्यावर ठेवलं तिसरे दिवशीं ताकावर ठेवलें व पुढें इतर पदार्थ खाण्यास परवानगी दिली

---

# (८०) रजोवृद्धि ( अत्यार्तव )

सामान्यत विटाळ खूप प्रमाणात व बरेच दिवस जात असेल तर त्याला रक्तप्रदर समजून त्याची रक्तस्तंभक चिकित्सा केली जाते. योनिमार्गानें रक्तातिसृति असताना ती कोणकोणत्या योनिरोगांत असू शकते ते रोग दृष्टीपुढें आणून योग्य चिकित्सा केली जाईल तर लवकर व चागला गुण येतो असें या हकीकतीवरून दिसून येईल ह्या रुग्णाच्या निदानचिकित्सेवरून रजोवृद्धि ह्या उपधातुवृद्धीची कल्पना चांगली येऊं शकेल अभ्यासूंच्या दृष्टीने हा रोगी अत्यंत महत्त्वाचा आहे

रोगी चौदा वर्षाची अविवाहित मुलगी एक वर्षापूर्वी तिला रजोदर्शन झालें तेव्हा-पासून रोगी पाहण्यात येईपर्यंत स्राव बंद झाला नाही मधून मधून सरासरी एक महि-न्याच्या अंतरानें ३-४ दिवस थोडया प्रमाणात स्राव कमी होत असे इतरत्र बरेच उपाय केले, परंतु काहीं उपयोग झाला नाही

चिन्हे:—रज स्राव, अंग दुखणे, थोडी दुर्गंधी, अग्निमांद्य, छातीत धडधड, शोष ही लक्षणें होतीं रजाचा रंग किंचित् काळसर (ईषत्कृष्ण) होता व त्याचा डाग पडत नसे ( यद्वासो न विरञ्जयेत् । ) वरील चिन्हांचें वर्गीकरण असें:—

रज स्राव, अंग दुखणे, रजाला थोडी दुर्गंधी ही रजोवृद्धीची लक्षणें. छातीत धडधड व शोष व अबलत्व ही रसक्षयाची लक्षणें अग्नि मंद हे वरील रजोवृद्धि रोगाचें निदान दोषप्रकोपजन्य रक्तयोनि ( रक्तप्रदर ) हा रोग अधोग रक्तपित्त, पित्तयोनि, पित्तावृत. अपान ह्या रोगांपासून व धातुवृद्धिस्वरूप रक्तवृद्धि व रजोवृद्धि ह्या रोगापासून भिन्न केला पाहिजे

कोणताहि दोषप्रकोपजन्य विकार एक वर्ष सारखा चालू असला तर त्याचे उपद्रव तरी होतील किंवा धातूंचा क्षय तरी होईल (दोष· प्रकुपितो धातून् क्षपयत्यात्मतेजसा।) तर ज्या रोगात दोषधातूंचा स्राव सारखा होईल त्या रोगात किती अनिष्ट परिणाम होईल तें सांगावयास नको या रुग्णांत एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे ती ही की वर्षभर स्राव होऊनहि शरीरावर त्या मानानें वरील प्रकारचा कांहीच परिणाम झाला नाहीं ज्याअर्थी जोराचा धातुक्षय किंवा इतर उपद्रव झाले नाहींत, त्याअर्थी दोषप्रकोपजन्य

हा विकार नसावा, उलट धातुवृद्धिस्वरूप अर्थात् रजोवृद्धिस्वरूप हा विकार असला पाहिजे, असे म्हणावयास काही हरकत नाहीं. दोषप्रकोपजन्य हा विकार नाहीं, याला आणखी एक प्रमाण आहे दोषचयप्रकोपांच्या अवस्थाची संप्राप्तींतील चिन्हें दिसावयाला पाहिजेत ती चिन्हे या हकीकतीत मिळाली नाहीत हेतु, पूर्वरूपे व रूपें ह्यावरूनहि हा विकार त्यात घेऊं शकत नाही हें थोड्याशा विस्तारानें पाहूं

वर दाखल केलेल्या दोषप्रकोपजन्य विकारापैकीं प्रथमत रक्तयोनि व रक्तपित्त हे घेऊ ह्या दोन्ही विकाराचीं कारणें अगदी समान आहेत ती ( रक्तपित्तकरैर्नार्या रक्तं पित्तेन दूषितम् । अतिप्रवर्तते । च चि. ३० ) ह्या कारणाचा तपास करिता ती आढळली नाहीत रक्तप्रदरातील योनिवेदना हे चिन्ह निदान पुष्कळ काळानंतर तरी उत्पन्न व्हावयास पाहिजे होते तसेच अतिस्रावाचें उपद्रवांपैकी पाडुतेसारखा एखादा तरी उपद्रव आढळणे जरूर होतें तेहि नाही. ( तस्यातिवृद्धौ दौर्बल्य भ्रमो मूर्च्छा तमस्तृषा । दाह प्रलाप· पाण्डुत्व तन्द्रा रोगाश्च वातजा । )

रक्तपित्ताचीहि पूर्वरूप चिन्हें व दौर्बल्यश्वासकासादि उपद्रव नाहीत म्हणून, तसेच वर्षांत ऋतुमानाप्रमाणे केव्हाहि स्राव कमी जास्त नाही यावरून रक्तपित्तहि नाहीं असे म्हणावयास हरकत नाही

पित्तयोनि म्हणावें तर पित्तप्रकोप निश्चित ठरविता येईल अशीं दाह, पाक, ज्वर, उष्मा याची पीडा, पिवळा, काळा, उष्ण असा रक्तस्राव ही चिन्हेंहि नव्हती ( दाह-पाकज्वरोष्णार्ता नीलपीतासितार्तवा । भृशोष्णकुणपस्रावा योनि· स्यात्पित्तदूषिता ॥ च चि ३० )

पित्तावृत अपान असें निदान करावे तर त्याची " रजसश्चातिवर्तनम् " या सामान्य चिन्हाखेरीज, मूत्रपुरीष पिवळया रंगाचें असणे, गुद, मूत्रमार्ग व योनि यांचे ठिकाणी ताप असणे ही पित्तचिन्हे नव्हतीं

( हारिद्रमूत्रवर्चस्त्वं तापश्च गुदमेढ्रयो । लिङ्ग पित्तावृतेऽपाने रजसश्चातिवर्तनम् ॥ च चि २८ )

यावरून दोषप्रकोपजन्य हा व्याधि नाही. आतां धातुवृद्धिस्वरूप अशी रक्तवृद्धि आहे काय ते पाहूं. रक्तवृद्धीत अक्षिमुखादि पाक, पिटिका, कुष्ठ, रक्ताङ्गनेत्रता वगैरे-पैकी १-२ तरी चिन्हे असावयास पाहिजे होतीं त्यापैकीहि चिन्हें नव्हती.

( कुष्ठविसर्पपीटिका असृग्दराक्षिमुखमेण्ढ्रगुदपाक—
रक्ताङ्गनेत्रता वातरक्तैरेभिरन्यैश्च पित्तविकारप्रायैरसृक् ॥ अ स १९ )

यावरून रक्तवृद्धि नव्हती असे म्हणता येईल. आता रजोवृद्धीचा विचार करू रजाची अतिप्रवृत्ति ह्या मुख्य लक्षणावरोबर अंगमर्द, दौर्गंध्य हीं चिन्हे होती (आर्तवं अङ्गमर्दमतिप्रवृत्ति दौर्गन्ध्य च।) अशी असणारी चिन्हे रजोवृद्धीची होत असे म्हणावयास काही हरकत नाही रजोवृद्धि हा प्रधान व्याधि आणि रसक्षय हा परतन्त्र व्याधि.

परतंत्र व अल्पप्रमाणात असलेल्या व्याधीची चिकित्सा करण्याचें कारण नाही चिकित्सा रजोवृद्धीची करणें जरूर आहे. चिकित्सा करतांना रजाचा घटक धातु जो रस व निमित्त धातु जो शुक्र याचेकडेहि लक्ष देणें अवश्य आहे पैकीं वैषयिक त्रस्तता नव्हती त्यामुळें त्याचा विचार सोडून घटकधातु रस याचाच विचार प्रामुख्यानें करणे आवश्यक होते

( रसादेव स्त्रिया रक्त रज सज्ञ प्रवर्तते । ) रसधात्वग्नि अव्यवस्थित व मद असल्यानें रसापासून रजोत्पत्ति अधिक. रसधात्वग्नि चांगला व्हावा म्हणून रसगामी ( रसावर कार्यकारी ) कटुतिक्त रसाचें, दीपक इन्द्रजव हे द्रव्य दोन्ही समानकाली मध ह्या अनुपानाबरोबर दिले रोगी दुसरे दिवशीच ८ दिवसाचें औषध घेऊन परगांवी गेला. त्यामुळें अधिक सूक्ष्म विचार करता आला नाहीं अशा स्थितीत ६, ७ दिवसाच्या औषधाच्या सेवनानें काय परिणाम झाला हे आलेल्या पत्रातील मजकुरावरून ध्यानी येईल " औषधापासून बराच गुण आहे. स्राव बंद आहे मध्यें दोन चार दिवस पोट दुखत असे हल्ली बरें आहे भूक लागते व अशक्तता कमी आहे औषध पाठवावें."

---

## (८१) कामला

रोगी वय ३५ वर्षें. लक्षणें १२ दिवसापासून ताप, पोटात दुखणे, मळमळ, डोळे नखें, मूत्र, जिह्वा ही फारच पिवळीं झालेली, शौचास किंचित् चिकट पण पांढरट व भसरट, सुस्ती व यकृत्वृद्धि थोडया प्रमाणात झालेली

सदर कामला कफरुद्धपित्तमार्गजन्य असल्याकारणाने पित्तमार्गरोधनाशक चिकित्सा पाहिजे व त्याबरोबर पित्तस्रावी द्रव्याची योजना पाहिजे म्हणून यकृत्वृद्धि कमी करणारी, किंचित् लेखन, कफघ्न, पित्ताचा स्राव करून अनुलोमन करणारी अशी आरोग्यवर्धिनी व जवळ जवळ आरोग्यवर्धिनीच्या धर्माची अशी कटुका ही आरोग्यवर्धिनीबरोबर दिली औषध घेण्याचा काल पित्ताशयावर कार्यकारी असा म्हणजे समान ठेविला होता व कफामुळें उत्पन्न झालेला रोध नाहीसा करून त्याचें, पित्ताचे व वायूचे अनुलोमन करणाऱ्या मुळयाच्या रसाची अनुपानाकरिता योजना केली होती. पित्त व विट्प्रवृत्ति व्यवस्थित होत नव्हती म्हणून विट्शोधन व विशेषत यकृत्पित्तविरेचक द्रव्याची योजना पाहिजे म्हणून आरोग्यवर्धिनीबरोबर (आरोग्यवर्धिनीत ५० टक्के कटुका असूनसुद्धां ) आणखी कटुकेची योजना केली.

कटुकंचे प्रमाण दिवसास ६ मासे देऊनसुद्धा त्यास विट अगर पित्तप्रवृत्ति व्यवस्थित झाली नाही म्हणून चौथ्या दिवशी पित्तांचें शोधन, कफाचें द्रवीकरण, वायूचे अनुलोमन व परपरेने शाखास्थित पित्तांचेंहि शोधन व्हावें म्हणून त्रिवृत् ३ मासे + कटुकाचूर्ण ३ मासे + सौवर्चल ६ गुंजा अशी एक पुडी सकाळी ( कफपित्तशोधनाचे सामान्य-काली ) अनुलोमक अशा गरम पाण्यात दिली यायोगें विट्प्रवृत्ति बरीच झाली. पित्तांचेंहि शोधन होऊन लगेच इतर ठिकाणचा पिवळेपणा कमी झाला व रसानुग पित्त कमी झाल्यामुळे ज्वरहि कमी झाला. आमाशयस्थ कफाचेहि शोधन होऊन मळमळ कमी झाली शाखास्थित पित कमी झाल्यामुळे धातूंच्या शैथिल्याच्यायोगें झालेलें अवलत्व कमी होऊ लागलें ( कारण ज्या ठिकाणी स्वेद त्या ठिकाणी शैथिल्य, ज्या ठिकाणी उष्ण स्पर्श त्या ठिकाणी स्वेद व ज्या ठिकाणी पित्त त्या ठिकाणी उष्ण स्पर्श, म्हणूनच ज्या ठिकाणी पित्त त्या ठिकाणी शैथिल्य येते व शैथिल्य हें सघातविरुद्ध असल्याने धातुसघातस्वरूपी शरीरबलाला विघातक होते )

या चिकित्सेचा उपशय दिसल्यामुळे हीच चिकित्सा आणखी ३ दिवस चालू ठेविली आणि शाखास्थित पित्तांचे निर्वापण व शमन होण्याकरिता उन्हाळ्याचे औषध ४ गुंजा १ पुडी दुपारच्या जेवणानतर ( शाखावर कार्य होण्याकरिता व्यानकाल जास्त उपयुक्त ) तापवून थड केलेले पाणी + साखर यात दिली तीन दिवसानी शोधन चिकित्सा बद करून केवळ शामकचिकित्सा चालू ठेविली या चिकित्सेचा परिणाम चागला झाला व ७ दिवसात रोगी चागलाच सुधारला सर्व लक्षणे कमी प्रमाणात झालीं

लक्षणसमुच्चयावरून अगर लक्षणावरून दोष अनुमित होतात या रोग्यातील लक्षणावरून कफपित्त या दोषाची अनुमिति होते या शोध्य अशा कफपित्त या दोषाच्या शोधनाकरिता विरेचन हे जास्त उपयोगी पडले कारण कामला हा व्याधि विरेचनसाध्य आहे त्यातल्या त्यात त्रिवृत् हे कफपित्तनाशकात उत्तम असून त्याबरोबर कफपित्त-नाशक अशा तिक्तरसाच्या कटुकेची योजना केली यातील मळमळ हें लक्षण जरी आमाशयस्थ उत्क्लिष्ट कफाचे लक्षण वाटत असलें, तरी त्याला उत्क्लिष्ट करावयास मूळ कारण पित्त होते तेव्हा मळमळ या एका लक्षणावरून रोगी वमनार्ह ठरला असता असें नाही शिवाय वमनाच्या अयोगात्मक व्यापत्तीमुळें दोष पुन्हा शाखास्थित होण्याची शक्यता राहिली असती तसेच पित्ताचा रोध करणारी किंवा पित्तानुलोमनप्रतिबधक स्थिति ज्या ठिकाणी ते कार्यक्षेत्र विरेचनाचे होते. शिवाय ज्वर येऊनहि बरेच दिवस झाले असल्याकारणाने त्या ज्वराचे दोष नाहीसे करण्यास विरेचन हेंच योग्य होते नुसत्या शमनाने यात लवकर फरक पडला नसता

---

# ( ८२ ) क्षतशुक्र ( नेत्ररोग )

रोगी, वय ११ वर्षे. झुडपाच्या फांदीचा फटकारा डोळयाला बसून कृष्णमंडलावरील प्रथमपटलाचा भेद झाला. डोळयातून अश्रू सारखे वाहात असत डोळयात टोचणी व रक्तिमा पुष्कळ प्रमाणात होती त्यावर लाख+गेरू+चदन ही तिन्ही जाईच्या फुलाच्या रसांत उगाळून घालण्यास सागितली व त्रिफळा हा व्रणाकरिता व नेत्रबलाकरितांहि उत्कृष्ट म्हणून अर्धा मासा रात्री निजताना तूपमधांतून दिला

( वर्तयो जातिमुकुललाक्षागैरिकचन्दनै· । प्रसादयन्ति पितास्रं घ्नन्ति च क्षतशुक्रकम्। वाग्भट उत्तरस्थान, ३२-११ ) त्रिफला मधुसर्पिभ्या निशि नेत्रबलाय च ।

वरील चिकित्सेनेंच शुक्र चागल्या रीतीनें बरे झालें. रोगी आला तेव्हा त्याला त्या डोळयानें पाहवत नव्हते तीन दिवसात लाली, टोचणी व अश्रू ( पाणी ) कमी होऊन पाहता येऊं लागले

---

# ( ८३ ) तमकश्वास

रोगी, वय ४५ वर्षे नेहमी पडसे येऊन श्वासाला सुरुवात व्हावयाची "मासस्य खमलः" । ह्या वचनानुसार पडसे आल्यानतर जो मल ( शेंबूड ) येतो तो मासधातूचा मल समजला जातो ज्याला पुन्हां पुन्हा पडसे येते त्याचा मांसधातु अबल असल्याचे दिसून येते क्वचित् असेहि लोक पाहण्यात येतात की, लहानपणी ज्याना सारखा शेंबूड येत असून मोठेपणीहि सारखा शेंबूड येत राहतो अगामध्यें मासधातु अत्यंत असार ( अबल ) आहे असे समजावे त्याचप्रमाणे ज्याना पडसे येण्याची नेहमीची सवय असते, त्यांचाहि मासधातु अबल असतो वरील रोग्याचे ठिकाणी मासधातूच्या अबलतेची लक्षणे दिसून येत होती नेहमी पिढऱ्या दुखणे, अंग दुखणे, अबलत्व इ लक्षणे श्वास नसताहि असत. हृदय अबल आणि वायूचा प्रकोप हीहि लक्षणे होती कागदाच्या कारखान्यांत सदर रोगी असल्याने त्यात उपयोगात येणाऱ्या रासायनिक द्रव्याच्या वाफा श्वासोच्छ्वासात गेल्याने फुफ्फुसातील मुख्य रक्तधातूचाहि ( यकृत्फेनप्रभव फुप्फुस· ) प्रकोप झाला होता.

या ठिकाणी उर.स्थानातील रक्तप्रकोप नाहीसा करणारी, मासधातूला व हृदयाला बल देणारी योजना पाहिजे

दोषाच्या दृष्टीने अपानाचा प्रकोप पोटात गुबारा धरणे हे चिन्ह होते. श्वास म्हणजे ऊर्ध्व झालेला (प्रतिलोम) कफसयुक्त प्राणवायु तेव्हा अपानाचे अनुलोमन व प्राणवायूचे अनुलोमन करणे व त्याचा सहकारी कफ नाहीसा करणे ही चिकित्सा येथे करणे अवश्य आहे

कफ फार थोडा सुटत असे सुटला तर घट्ट असे कफ सोडविणाऱ्याहि औषधाची जरूरी आहे म्हणून

१ भास्करलवणचूर्ण ४ गुजा, रात्री जेवणाचे पूर्वी ( अपानकाली ) गरम पाण्यातून दिले

२ हृद्यवटी* १ गुज व्यानकाली महाळुंगाच्या पाकातून दिली महाळुग हृद्य व मासधातूवर वातशामक व बल्य आहे. " व्यानो हृदि स्थित " ह्या वचनाप्रमाणे हृदयावर कार्य करण्याकरिता व्यानकाली औषध दिले पाहिजे. व्यानकाल म्हणजे " व्यानेऽन्ते प्रातराशस्य ।"

३ सीतोपलादिचूर्ण ६ गु + सूक्ष्मसमीरपन्नग ३ गु + जेष्ठमध ४ गु रात्रीच प्राणकाली जरदाळूच्या पाकात दिले.

सितोपलादिचूर्णः—कास, श्वास नाशक, रक्तधातु वाढविणारे, अबलत्वनाशक, कफनाशक आहे समीरपन्नग.—कफवातनाशक परतु कफ सोडविणारा आहे जेष्ठमध —कफ सोडविणारा व बल्य आहे जरदाळू:—रक्त व मासवर्धक.

श्वास प्राणाची दुष्टि म्हणून प्रत्येक घासाबरोबर चाटण्यास दिले " ग्रासग्रासान्तयो प्राणे प्रदुष्टे मातरिश्वनि " या सर्व चिकित्सेचा उपयोग दुसरे दिवसापासून चागला दिसू लागला अपानाचे अनुलोमन होऊ लागले छातीतील वडवड कमी झाली, दम कमी झाला, बल वाढू लागले याप्रमाणे सर्व सुधारणा होऊ लागली दम त्याच रात्री कमी झाला

तीन-चार दिवसानी प्राणकाली द्यावयाच्या योगात सहस्रपुटी अभ्रकभस्म ½ गुज मिश्रण करून देण्यास सुरुवात केली रोगी चागला बरा झाला

---

## (८४) नेत्रदाह

रोगी पुरुष, डोळे उघडे ठेविले असता असह्य दाह ( डोळ्याचा ) होणे हे त्याच्या रोगाचे मुख्य लक्षण होते डोळे मिटले असता हा दाह बराच कमी होई हा दाह पहाटे ४ ते ६ या कालात विशेष भासत असे ह्या रोग्यास दाहनाशक ( पित्तदोषनाशक

---

* शेळीच्या हृदयाचे चूर्ण करून त्यापासून बनविलेल्या गोळ्या

व वाताला अविरोधी ) अशी प्रवाळासारखी औषधें देण्यात आली परंतु त्यामुळे दाहात बिलकूल फरक पडला नाही. तेव्हा ज्याअर्थी डोळे उघडे असता हा दाह वाढतो व मिटले असतां तो कमी होतो, त्याअर्थी डोळ्यात येणारा स्नेह हा या दाहाचे कारण आहे असे अनुमान करण्यात आले. कारण डोळे उघडले असता या स्नेहाचा स्राव जास्त होत असतो. आता हा स्नेह मज्जेचा मल होय ( अष्टांगहृदय शारीरस्थान अ ३ रा, श्लो. ६४) अर्थात् मज्जास्थित पित्तदोषामुळें हा दाह झाला असें समजून " गुडूच्यामलकं मुस्तम् । " हा कषाय देण्यात आला दुसऱ्या दिवशीच दाह जवळ जवळ नाहीसा झाला यावरून " मज्जास्थितपित्तदोषजन्यदाहत्वावच्छिन्नप्रतियोगिताकध्वंसं प्रति गुडूच्यादिकषायस्य कारणत्वम् । " ही गोष्ट सिद्ध होते

# (८५) उरोस्थिदाह

रोगी पुरुष. पूर्वी यास उपदंश झाला होता आपले त्रासदायक लक्षण तो " उरातील त्रिकास्थीच्या खालील हाडावर ( manubrium sterni ) हात ठेवून हृदयात दाह होतो," असे सागत असे. दवाखान्यातील वैद्याने रोग्याने हात ठेवलेल्या जागेकडे लक्ष न देता हृदयस्थ पित्तामुळे हा दाह होतो असे निदान करून वासाघृत व शतावरीघृत या घृताची योजना केली; परतु ४–५ दिवसपर्यंत ही औषधे घेऊनहि रोग्याचा दाह कमी झाला नाही मग धातुगत दोष असले पाहिजेत असें समजून (हृदयस्थ दाह मासाश्रित पित्तामुळे असल्याने ) निम्ब पटोल त्रिफला हा कषाय देण्यात आला परतु दाह बिलकूल कमी झाला नाही नंतर मेदोगत दोषावरील किराततिक्तमभृता– हा काढा दिला तरी दाह जशाचा तसाच कायम राहिला. इतकें झाल्यानंतर वैद्याचे लक्ष रोग्याने दाखविलेल्या स्थानाकडे गेले अर्थात अस्थिमज्जागत दोष असल्यामुळे " गुडूच्यामलकं मुस्तम् । " हा काढा देण्यात आला दुसऱ्या दिवशी हा दाह अजिबात कमी झाला. तसेच जसजसे कषायाचे कार्य होत गेले, तसतसा अपानवायु वराच सरला व दाहहि कमी होऊं लागला असे रोग्याने सागितले रोग्याने अपानवायु सरण्यासारख्या कोणत्याच पदार्थाचे सेवन केलेलं नव्हते हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

---

## (८६) विषमज्वर व ज्ञानेंद्रियदुष्टि

विषमज्वराचा रोगी या रोग्यानें हिवताप जाण्याकरिता पूर्वी कोयनेल (quinine) बरेच घेतलें होतें त्यामुळे त्यास कानात आवाज होणें, डोक्यात भ्रम, डोळयाची आग व सुप्ति व बरोबर न दिसणे इत्यादि लक्षणे होत होती. त्याचप्रमाणें ज्वर, कंबर, टोंके, पाय इत्यादिकांच्या ठिकाणी शूल हीहि लक्षणे होती लक्षणांचा प्रथम समुदाय प्रबल असल्यामुळे प्रथम कानात घालण्याकरिता लशुनसिद्ध तेल दिले व भ्रमाकरिता सूतशेखर + प्रवाळ दिले दुसऱ्या दिवशी कानातील आवाज कमी झाला, पण भ्रम बिलकूल कमी झाला नाही पुन तेच औषध देण्यात आलें. परंतु भ्रम व डोळयाची आग ही लक्षणे जशीच्या तशीच कायम राहिली दुसऱ्या लक्षण-समुच्चयातील शूल व ज्वर हीं लक्षणे महायोगराजगुग्गुलाने कमी झाली, परतु भ्रम व आग ही लक्षणे कमीहि झाली नाहीत व वाढलीहि नाहीत. मस्तुलुग (brain) ही मज्जा असल्यामुळे मज्जदोषावर म्हणून "गुडूच्यादि" कषाय दिला परंतु भ्रम व आग कायमच ही आग व भ्रम सारख्याच्या वेळेस वाढते व उन्हाच्या वेळी थोडी कमी भासते तसेंच रोग्याचा भ्रम शिरोविरेचनाने वाढतो असेहि कळलें. अर्थात् येथे शीतगुणवृद्ध वातप्रधान वातपित्त संसर्गानें हे कार्य होते असे सिद्ध झाले कफावृत वात-पित्त हे जर रोगाचे कारण असते, तर शिरोविरेचनाने हलके वाटावयास पाहिजे असो ह्या रोगावर खालील दिलेली संयोगाची कल्पना करण्यात आली

"गुडूच्यामलकं मुस्तम्" या संयोगाचा काढा त्यात घातलेल्या जलाच्या निम्या प्रमाणात आटवून तयार करण्यात आला त्याचप्रमाणे "शुंठीपिप्पली" या संयोगाचा काढा त्याच पद्धतीनें तयार केला. नतर दोन्ही कषाय एके ठिकाणी करून त्याचा अष्टमांश काढा केला. या कृतीनें दोन्ही संयोगाचे विशेषत्व कायम राहून त्यांच्या संयोगाचा फायदाहि आपणास मिळाला अशी कल्पना जेव्हा दिली, तेव्हा भ्रम व दाह ही लक्षणे दुसऱ्या दिवशी एकदम वरीच कमी झाली हीच कल्पना पुढे तीन दिवस देण्यात आली. नंतर डोळयाची व भुवयाची सुप्ति व अंधुक दिसणे हीं लक्षणेहि कमी आली

---

## (८७) मलशोष

रोगी एक मूल ब्राह्मण त्याचे मुख्य लक्षण मलशोष हे होतें. हे मूल गर्भात फक्त सात महिनेच राहिले असल्यामुळे त्याचे धातुस्नेह अर्थातच क्षीण होते विरुस्नेह ह्या

मज्जेचा मल असल्यामुळें ( अ हृ. शारीर अ. ३ रा श्लो ३४ ) व तो नि:स्नेह येत असल्यामुळें हा मलशोष उत्पन्न झाला आहे असें अनुमान केले ह्याच्यापूर्वी एरंडेल तेलाचा बस्ति देऊनहि मलशोष नाहीसा झाला नाही, म्हणून हे अनुमान केलें हे लक्षात ठेवावे. मज्जेंतील स्नेह वाढावा या उद्देशानें " गुडूच्यामलकं मुस्तम् " या कषायानें दूध सिद्ध करून दिलें, परतु दोन दिवस हे सिद्ध दुग्ध देऊनहि विट्स्नेह वाढला नाही. म्हणून धातूंचा मार्ग कफरुद्ध असावा असे अनुमान करून वरील शंका निरसन करण्याच्या हेतूने " गुडूच्यामलकं मुस्तम् शुंठी पिप्पली " या द्रव्यानी दूध सिद्ध करून दिले. परतु मलशोष नाहीसा झाला नाहीं. मग वरील† संयोगविशेषाची कल्पना दिली लागलीच दुसऱ्या दिवशीं मलशोष नाहीसा झाला. वरील दोन प्रयोगानी खालील गोष्टी निष्पन्न झाल्या:—

(१) कलिंगकादि पंच कषायाचा प्रत्येक सयोगविशेषच त्या त्या धातूवर कार्य करतो. (२) त्या त्या सयोगविशेषाबरोबर दुसरा सयोग दिला असता धातुस्थित निरनिराळया दोषाचाहि नाश होतो.

---

## (८८) गुल्म व गर्भधारणा

रोगी स्त्री या बाईस गर्भधारणा व गुल्म ही दोन्ही बरोबरच होती गुल्म, अर्थातच गर्भाशयाच्या वरच्या बाजूस ( फंडस् ) होता. पाचव्या महिन्यात चिकित्साक्रम सुरू केला त्या बाईना उत्तम प्रसूति लाभून गुल्महि नाहीसा झाल्याचे चार महिन्यानी नजरेस आले त्यांना:—

**गोक्षुरादिगुग्गुळ** १ गुंज + **वंगभस्म** १ गुंज + **उन्हाळ्याचे औषध** २ गुंजा, सारख्या प्रमाणांत चार पुड्या करून दिवसातून चार वेळा. **उशीरासव** २ तोळे + **अशोकारिष्ट** २ तोळे याचे चार भाग करून पुड्या त्यात मिश्र करून देण्यात आल्या होत्या याचबरोबर आहारात डाळी वर्ज्य केल्या होत्या. आणि पालेभाज्या, ताक व दूध जास्त प्रमाणात देण्यास सांगितले होते.

---

† निवडक रुग्णचिकित्सा क्रमांक ८६ द्वितीय परिच्छेद.

## (८९) रक्तप्रदर व गुल्म

रोगी स्त्री, ब्राह्मण, वय ३२ ह्या बाईंना रक्तप्रदराचा विकार फार जोराचा झाला. सुमारें वर्ष दीड वर्ष हा विकार सुरू होता आणि त्याचबरोबर रक्तगुल्महि होता रक्तगुल्माचा घेर वरून बराच मोठा म्हणजे दीड दोन फूट होता. बेंबीच्या वर चार पाच बोटेंपर्यंत तो वाढलेला होता वर्तुलाकार, हातास जाडसर लागणारा व वाढीस लागल्यापासून केव्हाच कमी न झालेला असा हा गुल्म, चिकित्सा करण्याकरिता, याप्य म्हणून सागून घेतला औषधिचिकित्सा लागू पडली तर त्रास, कटकट व शस्त्रकर्माचे श्रम वाचतील, अशा एकदर हेतूने बाईंच्या नातलगानी औषधिचिकित्सेस अनमोदन दिले त्या बाईंना अद्यापहि मधून मधून रक्तप्रदर असेच. पण आता पहिल्याइतका जोराचा नव्हता त्याना खालील मिश्रण दिले.

गोक्षुरादिगुग्गुळ १ गुंज + वंगभस्म १ गुंज + उन्हाळ्याचे औषध २ गुंजा + गुळवेलीचें सत्व ४ गुंजा. या औषधाच्या सारख्या चार पुड्या करून त्या दिवसातून चार वेळ डाळिंबाच्या लेहात देत असू अशोकारिष्ट २ तोळे, सकाळी व रात्री १ तोळा प्रत्येक वेळी चौपट पाण्यात देण्याचा क्रम ठेविला होता.

अद्याप रक्तप्रदर असल्याने व मधून मधून ज्वरोष्मा थोडा अधिक होत असल्याने ह्याना गुळवेलसत्व द्यावे लागले हे औषध देऊ लागल्यापासून बरोबर तीन चार दिवसात औषध लागू पडल्याचे दिसून आले, आणि सुमारे दोन महिन्यात गुल्म साफ नाहीसा झाला.

---

## (९०) रक्तप्रदर

विषयासक्त स्त्रिया किंवा अतृप्तकाम अशा स्त्रिया याना एकप्रकारे मानसिक अस्वास्थ्य प्राप्त होते त्याचा परिणाम अंडकोशावर होतो आणि रक्तप्रदर उत्पन्न होतो ह्या प्रदरात चंद्रकला ½ गुंज प्रमाणाने कोहळ्याच्या रसांत दिल्यास चागला फायदा होतो चंद्रकलेप्रमाणेंच सारस्वतारिष्ट, लोध्रासव व अरविंदासव याचाहि उपयोग होतो असिद्ध औषधापैकी धमासा, गोखरू व खडीसाखर एकास दोन या प्रमाणानें घेऊन त्यात पावशेर पाणी घालून अष्टमाश काढा उरवून तो दिवसात तीन वेळा गाईचे तूप १ तोळाभर मिश्र करून दिल्यासहि चागला फायदा होतो वंगभस्म, प्रवाळभस्म व सुवर्णमाक्षिकभस्म याचे समभाग मिश्रण करून १ गुंज प्रमाणाने आंवळेपाकाबरोबर दिल्यासहि फायदा होतो.

गर्भाशयाच्या अंतस्त्वचेची किंवा गर्भाशयाची दुष्टि व सूज यामुळें रक्तप्रदर असल्यास अशोक हें फारच चांगल्या प्रकारचें औषध होय. मांसार्बुदादि मांसवृद्धीसारखी कारणे वगळल्यास रक्तप्रदराच्या विकारांत खालील औषधाचा कल्प उपयुक्त होय.

अशोकाची साल १ तोळा+आम्ब्याची साल ½ तोळा+जांभळीची साल ½ तोळा +बोरीची साल ½ तोळा + ४० तोळे पाणी. ⅛ काढा शिजवून उरविणे

त्यांत तोळाभर गाईचें तूप व ½ तोळा साखर टाकून तें मिश्रण दुपारी चार वाजता देणे

अशोक, उपळसरी, मंजिष्ठा, दारुहळद याचाहि रक्तप्रदरावर चांगला उपयोग होतो. अबलासंजीवनीकल्पात ही औषधें असतात.

रक्तप्रदराचे कारण अंतःस्रावक पिंडांची दुष्टि हें असल्यास चंद्रप्रभावटी हे फार उत्तम कार्य करणारें औषध आहे. चंद्रप्रभा व अबलासंजीवनी ही दोन्ही वेगवेगळी अथवा एकत्र देता येतात. याच्यायोगे घबराट थांबतो हातापायांची जळजळ, वारंवार रक्त पडण्याची (इतर भागातून) सवय व रक्तप्रदराची सवय थांबून सर्व अवयव नियमित कार्य करूं लागतात. चंद्रप्रभावटी असल्या प्रकारात फार उपयुक्त होय. याचबरोबर प्रवाळभस्म प्रवाळपंचामृत, कामदुधा, मौक्तिकभस्म याचाहि उपयोग करता येतो.

---

# (९१) आगन्तु व्रणचिकित्सा

रोगी स्त्री, वय ७० वर्षें रस्त्याने जात असता पडल्यामुळे डाव्या मांडीला फरशीच्या टोकाने जखम झाली. जखम सात इंच लांब, दोन इंच रुंद व अर्धा इंच खोल जखम झाल्यानंतर तीन दिवसपर्यंत रोगी घरीच होता, त्यामुळे तावडतोब करण्यात येण्यासारखे इलाज करता आले नाहीत. चिकित्सामंदिरात दाखल करून घेण्याच्या वेळी जखमेच्या कडेची कातडी कुजून गेली होती. कातडीच्या खालील चरबी उघडी पडल्यामुळें कुजून गेली होती व वास येत होता. वय सत्तर वर्षांचें असल्यामुळें नैसर्गिक शक्तीहि कमी झालेली व त्यात जखम दूषित झाल्यामुळे आणखी थोडासा ज्वर अशी स्थिति असताना “प्रयत्न करून पाहूं” एवढें सांगून रोगी दाखल करून घेण्यात आला. चिकित्सेंतील मुख्य औषधे म्हणजे शोधन तैल व रोपण तैल. पहिले दहा पंधरा दिवस, म्हणजे जखम स्वच्छ होईपर्यंत, शोधन तैलच वापरण्यात आले व नंतर रोपण तैल वापरलें. जखम दीड महिन्यातच पूर्णपणे भरून आली.

वरील रोगी चिकित्सामंदिरात असताना दोन तीन डॉक्टर चिकित्सामंदिरास भेट देऊन गेले व त्यानासुद्धा जखम इतक्या लवकर भरून आलेली पाहून आश्चर्य वाटलें व " जखम जादूप्रमाणे भरून आली," असें एकानें लिहून ठेवले

---

## (९२) कर्णपालीछेद

एकदा मद्यपी माणसाची मारामारी झाली. मारामारीत एका धार असलेल्या लाकडाचा मार एका माणसाच्या डाव्या कानावर बसला त्या आघातानें सदर इसमाचा कान चिर । तो असा चिरला की, तो जणू काय मुद्दाम कातरीनें कातरला असावा असा दिसत होता छेद आडवा होता वरचा भाग वर व खालचा भाग खाली असे दोन्ही भाग निरनिराळे झाले होते हयाशिवाय पाठीवरहि व इतर भागावरहि बराच मार लागला होता व ते भाग सुजले होते त्याप्रमाणें कानहि सुजला होता त्रिफळयाच्या काढयानें कान धुतला गरम गरम काढयानें कान शेकला नंतर कोरडा केला. रक्त वाहतच होते. धन्वंतरी पानाचा रस वस्त्रगाळ करून त्यात कापूस भिजविला. तो कापूस कानाच्या आतून बाहेरून बांधला व कान हलणार नाहीं असे बंध बांधले पोटात घेण्याकरिता मंजिष्ठ व हळद गुळातून घेण्यास दिली इतर सर्व अंगास स्नेहस्वेद रोज सुरू ठेवण्यास सांगितले तिसरे दिवशी कान सोडला तो कान जुळून येत आहे असें दिसलें कानाची सूज उतरली व व्रणात पूं वगैरे झाला नव्हता. व्रण स्वच्छ होता व्रणवेदनाहि कमी झाल्या होत्या पुन पूर्वीप्रमाणेंच विधि केला नंतर तीन दिवसानीं व्रण धुणें इ उपचार केले त्यानंतर मात्र रोज व्रण धुऊन नवीन नवीन रसाचे बोळे जखमेसभोवार बांधले तेराव्या दिवशीं कान पूर्ण जुळून आलेला दिसला. एक लाल, ग्बोलगट आडवी अशी व्रणाची खूण मात्र दिसत होती हयानंतर बंध वगैरे काहीं बांधले नाहीत व्रणावर खपली धरली ४-५ दिवसात ती खपलीहि पडली व कान पूर्ववत झाला तुटल्याची खूण मात्र अद्याप कायम आहे

---

# (१३) जलोदर

रोगी मुलगा, वय १२ वर्षे. मुलास सारखें २ मिनिटें देखील चालता येणे अशक्य झालें असून चालण्याचा प्रयत्न केल्यास दम लागून ताबडतोब विश्रांति घ्यावी लागत असे. अत्यंत थंडीनें ज्याप्रमाणे अंग कडकतें, तद्वत् शरीरावरील कातडी झालेली असून पाय, हाताचे मणिबंधाखालील भाग, नाभि, तोंड व मांड्या यावर सूज होती . उदर सरासरी लहानशा घागरीएवढें मोठें झाले असून आंत खूप पाणी साठलेलें होते व वरचे भागी निळसर रंगाच्या शिरांचे जाळें दिसत होते यकृताची किंचित् वृद्धि असून शौचास दिवसातून १-२ वेळ पांढरट पिवळे परंतु घट्ट असे होत असे. हृदय क्षीण, नाडी दोरीसारखी बारीक व अशक्त असून १ मिनिटांत तिचे ठोके ५५ ते ६० पर्यंत पडत होते. अन्न दिवसातून २ वेळ घेत असे सर्व दिवसांत मिळून जोंधळयाची भाकर एक ते दीड चतकोर व थोडे तुरीच्या डाळीचे वरण इतके अन्न जात असे व जेवल्यानंतर एका जागी बसूनहि सुमारे १ तासभर रोग्यास दम लागत असे या लक्षणांच्या मानानें रोग्याची झोपेविषयी मात्र बिलकूल तक्रार नव्हती

**रोग्याची पूर्वीची हकीकतः**—एक वर्षापूर्वी रोग्यास खाण्यापिण्याच्या आविक्रयामुळें अतिसार सुरू झाला होता. त्यास डॉक्टर किंवा वैद्य यांचे उपचार न करितां घरगुती स्तंभक उपचार सुरू केले गेले व त्यांतच स्निग्ध व दह्यासारखे जड पदार्थ खाण्यांत आले. पुढें कांही दिवस औषध घेतल्यानंतर अतिसार साधारण बरा होऊन अग्निमांद्याची लक्षणें उद्भवली व ४-६ महिन्यांत वर सांगितल्याप्रमाणे रोग्याची स्थिति झाली, तरीहि रोग्यास घरगुती इलाजच सुरू होते दोन-तीन महिने औषध देऊनहि सूज आणि पोट यांचा आकार वाढतच चालला व रोगी जास्तच क्षीण होऊं लागल्यामुळें दवाखान्यांत आला रोग्याची एकंदर परिस्थिति पाहून रोग्याचे पालकास एखाद्या सर्जनकडे जाऊन शस्त्रक्रियेने पोटातील पाणी काढून टाकून नंतर पाहिजे तर औषध सुरू करण्याविषयीं सल्ला दिली, परंतु रोग्यानें व पालकानेंहि ही गोष्ट मान्य न केल्यामुळें त्यास औषधोपचार सुरू केले प्रथमतः रोग्यास—

**अश्वकंचुकी** ४ गुंजा + **वज्रक्षार** २ गुंजा + **ताप्यादिलोह** २ गुंजा ह्या मिश्रणाच्या मारख्या ४ पुड्या करून ३-३ तासांनी मधातून देण्यास सांगितले व पुडी घेतल्यानंतर पिण्याकरिता **कुमारीआसव** २ ड्राम + **गोमूत्र** २ ड्राम यांचें मिश्रण ४ भाग लावून दिले १ दिवस आड करून **घाम काढणे** व दररोज **पोटास गोमूत्र चोळून वाळूच्या पुरचुंडीने शेकणें** हे उपायहि सुरू ठेवण्यास सांगितले हे उपाय सुरू केल्यापासून रोग्यास दिवसरात्रीस मिळून १५-२० जुलाब पातळ, पांढरट व पाण्यासारखे होत असत आठ दिवसांत पायावरची व हातावरची सूज कमी होऊं लागली औषध तेच कायम ठेवले. औषधापासून इतर उपद्रव कांही झाले नाहीत. पुढच्या आठवड्यांत हात, पाय, तोंड

यावरील सूज कमी होऊन पोटहि थोडें कमी झालें परतु रोग्यास अशक्तपणा वाटूं नये एतदर्थ मध्ये ४ दिवस औषध अजिबात बद ठेविलें चार दिवसानतर पूर्वींचेच ओषध सुरू केलें, व रोग्यानें तूप खाण्याविषयीं फार उत्सुकता दर्शविल्यामुळें गोमूत्रात तूप घालून, गोमूत्र आटवून ते तूप देण्यास सागितलें: परतु ते तूप कडू लागते या सबबीवर रोग्याने साधे लोणकढे तूपच सेवन केलें. त्यामुळें रोग्यास खोकला व ज्वर हे दोन उपद्रव सुरू झाले हे उपद्रव सुरू झाल्यानतर पूर्वीचें सर्व औषध बद करून फक्त महामृत्युजय ३ गुजा दिवसातून ३ वेळ घेण्यास दिला व तूप वर्ज्य करण्यास सागितले ३ दिवसपर्यंत महामृत्युजय सुरू होता. या मुदतीत ताप व खोकला कमी झाला पुढें पूर्वींचेच ओषध सुरू केलें, परतु त्याने ३-४ जुलाब व तेहि साधारणच होऊ लागल्यामुळें अश्वकचुकी ४ गुजा + ताप्यादिलोह २ गुजा + शुद्ध जेपाळ १ गुज या मिश्रणाच्या मारल्या ४ पुड्या करून मधात घेण्यास दिल्या व कुमारी-आसवात गोमूत्राऐवजी कडु इंद्रायणीचा (विशाला) काढा घालण्यास सागितलें यानें मात्र पूर्वींप्रमाणेच १५-२० जुलाब होऊं लागले मधून मधून १-२ दिवस औषध अजिबात बंद ठेवीत असू याप्रमाणें ओषध घेतल्यानतर रोग्याची स्थिति पुष्कळ सुधरली पोटातील पाणी बहुतेक सर्व कमी झालें, अगावरची सूज नाहींशी झाली, अन्न जाऊं लागलें व रोगी आपल्या पायानीं दवाखान्यापर्यंत व दवाखान्यापासून घरापर्यंत चालत जाऊ येऊ लागला रोग्यास नंतर शक्तीकरिता मंडूर आणि मृगशृग याचें मिश्रण दिलें

---

# (९४) क्षयरोग व बस्तिविधि

एका क्षयरोग्यास वृहण ओषधें पोटात देत असता बस्तिविधीहि सुरू ठेविला रोग्यास सुमारें दोन वर्षापासून प्रथमत ज्वर व आमसग्रहणी अशा प्रकारच्या पीडेस सुरुवात झाली आमसग्रहणीकरिता व ज्वराकरिता अनेक उपचार सुरू असत त्या उपचाराचा तात्पुरता उपयोगहि होई परतु कायम असा उपयोग फारसा झाला नाहीं. त्यातल्या-त्यात ज्वरात तर काहींच पालट दिसला नाही अशा स्थितीत दीड वर्ष गेलें त्यामुळे रोगी अगदी थकून गेला त्या वेळी त्याचे निदान क्षयरोग आहे असे झालें

उपचारास आरभ करताना रोग्याची स्थिति अतिशय कष्टप्रद होती दिवसातून सात-आठ वेळा आवरक्तयुक्त शौचास होत असे ज्वर तर सारखाच असे रोज सकाळी ज्वरोष्मा शभरपर्यंत असे दुपारी १०२° पर्यंत चढत असे हातापायावर सूज आलेली होती हृदय अशक्त झालेलें, खोकला मनस्वी, अशा स्थितींत उपचारार्थ रोगी आल्यानतर निदान नक्की ठरल्यासारखे होतें।

प्रथम दिवसापासून त्या रोग्यास खालील बस्तीची योजना केली होती —

गुळवेल २ तोळे + कडुनिंब २ तोळे + जेष्ठमध २ तोळे. पाणी चार शेर

याचा काढा चतुर्थांश म्हणजे १ शेरभर उरवून त्यात मध व सैंधव टाकून तो बस्तीमध्यें घालून गुदमार्गें बस्ति रोज सायंकाळी देण्यास सुरुवात केली. पहिले एक-दोन दिवस बस्तीनंतर थोडें रक्त जास्त आले बस्ति घेण्याची माहिती कमी, त्याचाहि परिणाम झाला. परंतु हा उपचार सुरु केल्यानंतर पहिल्या आठच दिवसात रोग्याचा ज्वर कमी होऊं लागला. तो एक महिन्याच्या सुमारास ज्वर साफ निघाला. हा बस्ति प्रथम प्रथम रोज देत असूं पुढे पुढें मात्र एक दिवसाआड, पुढें दोन दिवस टाकून, तीन दिवस टाकून असें अंतर वाढविता वाढविता पुढे एक आठवड्याने एकवार बस्ति देऊं लागलो. ह्याच बस्तीनें आतड्यातील व्रण भरून आले, सूज कमी झाली, आव-रक्त वगैरेहि बंद झाले आणि हलके हलके रोग्याची शक्तिहि वाढूं लागली बस्ति देऊ लागून दोन महिन्यांनंतर रोगी मैल मैल हिंडत असे

अशा प्रकारें बस्ति सुरू असता पोटांतहि औषध सुरूच होते परंतु निव्वळ ह्या औषधानी रोग्यात झाली इतपत सुधारणा क्वचितच झाली असती असे आमचे मत आहे बस्तिद्वारा औषधाचे प्रयोग जास्त प्रमाणावर होऊन त्यांचे गुणावगुण ठरविले गेल्यास रुग्णजनाच्या दृष्टीने फार मोठें कार्य होईल असे वाटते

---

## (९५) कुक्ष्युदर ( Wet Pleurisy )

ह्या रोग्यास १९२२ साली प्रथमतः इन्फ्ल्युएन्झा झाला नंतर काही दिवसानी त्याच्या फुप्फुसावरणात जलसंचय झाल्याचें दृष्टोत्पत्तीस येऊं लागले त्याबरोबर ज्वरहि वाढत चालला १०२°-१०३° पर्यंत असे त्या रोग्यास प्रथमतः १०-१२ इंजेक्शन्स ( सूचिकाभरणे ) देण्यात आली: त्यामुळे ज्वर कमी झाला; परंतु बाकीची लक्षणे होतीच आणि ज्वरहि ९९°-१००° पर्यंत रोजचा असेच. त्याबरोबरच रोग्यास थोडा थोडा खोकला व दमाहि असेच रोगी बराच अशक्त होत चालला व फुप्फुसावरणात संचयहि थोडा थोडा वाढत चालला म्हणून रोग्याने पहिली चिकित्सा सोडून आयुर्वेदीय चिकित्सेचा अवलंब केला. ह्या रोग्यास भाङर्ग्यादि कषायातून लसूण व एरंडेल टाकून देण्यांत आले त्यायोगें सरासरी एक महिन्याच्या अवधीत ज्वर नाहीसा झाला ज्वरोष्मा नेहमीसारखाच असे किंवा क्वचित एकादा अंश वाढे भूक वाढली खोकला कमी झाला छातीतल्या चमका कमी झाल्या छातीतील कफाची घुरघुर काही काळ

शिल्लक असे, परंतु एक महिन्याच्या औषधोपचारानंतर हे सर्व विकार कमी होऊन रोग्यास पूर्णपणे आराम पडला

भार्ङ्ग्यादि कषायातील औषधे—भारंगमूळ १ तोळा + सुंठ १ तोळा + रिंगणी १ तोळा याच्या सारख्या ४ पुड्या करून पावशेर पाण्यात अर्धा छटाक काढा शिजवून उरवावा तो गाळून घेऊन त्यामध्ये २ मासे मध टाकून रसोनसिद्ध एरंडेलचे ५ थेंब त्यात मिश्र करून हे मिश्रण द्यावे

ह्या औषधाने बरे वाटल्यानंतर शक्तिवर्धक म्हणून च्यवनप्राशावलेह दिला.

---

## (९६) कायमचा गुण

रोगी बरीच वर्षे पूयप्रमेहाच्या विकारानें आजारी होता इतके दिवस आजार असण्याचे कारण औषधे घेऊन रोगाची लक्षणे पूर्णपणें नाहीशी झाली कीं, तो एकदम औषध सोडून देत असे या वेळेसहि औषध सुरू केल्याबरोबर लक्षणें कमी होत होत सात-आठ दिवसात पार नाहीशी झाली पण मागील अनुभव असल्यामुळे त्याने औषध एकदम न सोडता प्रथम औषधाचे प्रमाण कमी केलें; नंतर दिवसातून एकच वेळ औषध घेत असे व नंतर एक दिवसाआड, दोन दिवसाआड असे करून आठवड्याने एकदा औषध घेण्याची पाळी आल्यावर मग सोडून दिलें व तो पूर्णपणे रोगमुक्त झाला रोगाशी बाहेरची औषधें देऊन झगडा न करता स्वतःच्या शरीरात प्रतिविषे उत्पन्न होण्यास मधि मिळून मग औषधाची गरज संपली

---

## (९७) प्रमेह ( बहुमूत्रत्व )

रोगी पुरुष, वय वर्षे ३०. केवळ बहुमूत्रत्व हे लक्षण होते. सर्व डॉक्टरी उपाय करून थकलो असें रोगी सांगत होता. " नगरला दोन तीन दिवस राहणार आहे; आयुर्वेदाचा अनुभव घेऊन पाहावा म्हणून आलो," असे रोगी म्हणाला. रोग्यास रात्रीं लघ्वीचा असह्य त्रास होत असे अर्ध्या अर्ध्या तासानें त्यास लघ्वीस उठावें लागत असे. दिवसाहि त्रास होत असेच लघ्वीच्या रात्रभर त्रासानें झोंप येणे अशक्य झाल्यामुळें

" मोहमूर्धाक्षिगौरवालस्यजृम्भिका । अङगमर्दश्च । " ही वाग्भटोक्त लक्षणे त्यास सहन करावी लागत होती

ह्या रोग्याचें हें विशिष्ट लक्षण इतर शक्य संप्राप्तीपासून भिन्न करण्याकरितां पाश्चात्य निदानाची थोडी मदत घेतली, व त्याचे मदतीने हे लक्षण " डायबेटिस् इन्सिपिड्स् " इत्यादि शक्य व्याध्यवस्थेपासून भिन्न केले. परंतु ह्या लक्षणाची उपपत्ति बराच वेळ लक्षात येईना. कांही वेळानें " मूत्र हा अन्नाचा मल आहे," ह्या आयुर्वेदीय सिद्धाताचे स्मरण झाले. [ तत्राऽच्छं किट्टमन्नस्य मूत्रं विद्यात् घनं शकृत् वा. शा अ. ३ ] ह्या सिद्धान्ताप्रमाणे त्याचे अन्नाचे पचनव्यापारामध्ये द्रवमलाचेंच विभजन जास्त होत होते. ह्या अनुमानास जास्त आधाराचे अपेक्षेने त्याचे अन्नाची चौकशी केली त्याचे अन्नात अभिष्यंदी, द्रवभूयिष्ठ पदार्थ जास्त असल्याचे दिसून आले. अर्थातच अपेक्षे-प्रमाणे सिद्धातास जास्त पुष्टि मिळाली. शरीरात एतत्स्वरूपी आमसंचय झाला असता बहुमूत्रत्व हे लक्षण उद्‌भवूं शकेल.

वरीलप्रमाणे निदान निश्चित झाल्यावर चिकित्सेकरितासुद्धा वरील गोष्ट लक्षात घ्यावी लागली आमपाचक हेंच ह्या अवस्थेचें मुख्य चिकित्सासूत्र होतें. आमपाचक सिद्धौषधीपैकी राजवल्लभ या औषधाची ह्या ठिकाणी योजना केली

राजवल्लभ ह्या विशिष्ट औषधिकल्पातील, " लवग, हिंग, जिरे, सुठ, मिरे " ही सर्व द्रव्यें आमपाचक व कफघ्न स्वभावाची आहेत. ह्यातील अभ्रक रसायन सूक्ष्मस्रोतो-गामी आहे, लोह हे संग्राही व रसायन, जायफळ हे संग्राही असून ह्यातील कज्जली योगवाही व रसायन आहे. अर्थातच आमपाचनार्थ हा योग योग्य व अनुभवलेला होता.

औषधिकालाचे दृष्टीने विचार करीत असता औषधियोजना समानकाली करणे शास्त्रीय अतएव आत्यवश्यक होतें ( पक्वामाशयमध्यस्थः पित्तं चतुर्विधमन्नपानं पचति विवेचयति च दोषरसमूत्रपुरीषाणि । समानो वह्निसङगत सोऽन्नं पचति तज्जाञ्च विशेषान् विविनक्ति हि । )

वरीलप्रमाणे औषधिकल्पना व भेषजकाल ह्याचा विचार करीत असता औषधियोजना खालीलप्रमाणे केली, व दोन दिवसात त्याचे बहुमूत्रत्व हे लक्षण कमी झाल्याचें प्रत्ययास आलें

औषधियोजना—राजवल्लभ १॥ गु + सुठ २ गु. + मिरेचूर्ण २ गु = ३ पुड्या सकाळी व रात्रीं समानकाली (समाने मध्य इष्यते) अनुपान—आलेरस + मध

दोन दिवसांत उपशय दिसल्यावर, त्यास तेंच औषध आणखी कांही दिवस घेण्यास दिलें.

# (९८) कृमिरोग व खोकला

रोगी, वय १२. या रोगाचे विशेष लक्षण खोकला हे होते व त्याबरोबर ज्वर, कोष्ठशूल व शीर्षशूल ही अन्य लक्षणे होती या रोग्याला बरेच दिवसापासून कृमि होते. परंतु त्यानीं विशेष कोणतीच लक्षणे उत्पन्न केली नव्हती रोगी तपासता त्यात यकृतवृद्धि, गिलायुवृद्धि ही आढळून आली सुरुवातीस सजीवनीगुटी २-२ गुंजा २ पुड्या मधातून दोन वेळ दिल्या व तसेच तालीसादिचूर्ण + चिडग याचे मिश्रण मधातून चाटण्यास दिलें हे औषध २ दिवस दिले नतर आध्मान, यकृतवृद्धि व कोष्ठशूल याच्या दृष्टीने सजीवनीगुटी कमी करून सोवर्चल ४ गुंजा + शुद्ध नवसागर ३ गुंजा ही एकत्र करून त्याची एक पुडी समानकाली दिली याचा इष्ट व सद्य - परिणाम असा झाला की, त्याचा ज्वर कमी होऊन आध्मानहि कमी झालें तसेंच कृमिपतनाची प्रवृत्ति सुरू झाली आणखी दोन दिवसानी कृमिपातन म्हणून त्रिवृत् + पिपळी ह्याची एक पुडी विरेचनाकरिता दिली त्यामुळे शोधन होऊन बरेच कृमि पडले. यानंतर खोकल्याशिवाय सर्व दृश्य लक्षणे कमी झाली त्या खोकल्याला कारण यकृतवृद्धि व गिलायुवृद्धि ती कमी करण्याकरिता गिलायुवृद्धियोग* + शुद्ध नवसागर याच्या तीन पुड्या तीन वेळा गरम पाण्यात घेण्याकरिता दिल्या याने यकृतवृद्धि व कास ही दोन्ही कमी झाली गिलायुहि हळूहळू कमी होत आहे गलप्रतिसारणा(throat paint)-करिता माबफळ मधातून उपयोगात आणिलें

---

# (९९) कृमिरोग व शीतपूर्वक ज्वर

रोगी, वय १५ विशेष लक्षण शीतपूर्वक ज्वर दिवसातून बऱ्याच वेळा थंडी वाजे व ताप येई इतर लक्षणे—तृष्णा, शीर्षशूल व प्रसेक या लक्षणावरून कृमीचे अनुमान करून कृमिघ्न व कोष्ठशुद्धिकर म्हणून कपिला + वावडिंग + स्वादिष्टविरे-चनचूर्ण याच्या सकाळ सायंकाळ दोन पुड्या गरम पाण्यात दिल्या व शिवाय शीतपूर्वक ज्वराकरिता म्हणून हिंवतापगुटी २-२ गोळ्या सकाळी ६ व ८ वाजता गरम दुधातून दिल्या या चिकित्सेने २ दिवसातच थंडी कमी झाली व कृमि पडूं लागले हीच चिकित्सा आणखी ६ दिवस चालू ठेवून पुढे पुन्हा कृमींची प्रवृति होऊ नये म्हणून विडंगारिष्ट काही दिवस घेण्यास सांगितले

---

* हिरडे गोमूत्रात शिजवून त्यास वाळा, बडिशेप, कोष्ठ याच्या भावना देणे ( वाग्भट उत्तर, २२-१०२ )

## ( १०० ) कृमिरोग व आंत्रिक सन्निपात

रोगी, मुलगा ११ वर्षाचा, मुसलमान. सदर रोग्यांत आन्त्रिकाची सर्व लक्षणें दिसत होतीं रोगी ज्वर येण्यास लागल्यापासून १५ व्या दिवशी चिकित्सेकरिता आणण्यात आला त्यांत ह्या वेळपर्यंत सर्व प्रकारचे अपथ्य केलें गेले होते घनान्न दिलें गेले होतें अंगावरांयावर घेऊन हिंडविला गेला होता शिवाय याहिपेक्षां मोठी चूक म्हणजे १३ व्या दिवशीं त्यास कांही तरी तीव्र असे जुलाबाचें औषध देण्यांत आले होते. रोगी १५ व्या दिवशीं आला त्या वेळी नाडी क्षीण होती, पोट फारच डामरलेलें होतें व खोकल्यामुळें रोगी अगदी त्रस्त दिसत होता. ( या रोग्यास मागें २ महिन्या-पूर्वी कृमि पडत असत ) चिकित्सा—सुरवातीस आध्माननाशक व कासाला कारण जो स्रोतोरोध त्याला नाशक अशी कापूर + हिंग यांच्या समभाग मिश्रणाची गुटी चाटणा-करितां दिली लक्ष्मीनारायण १ गोळी + प्रवाळ २ गु याच्या २ पुड्या २ वेळ माक्याचा रसांत दिल्या व कृमिघ्न म्हणून सजीवनीगुटी १ गुंज १ पुडी रात्री देण्यात आली. या चिकित्सेमुळें नाडी व्यवस्थित झाली. आध्मान कमी झाले व एक मोठा जंत पडला. ४ दिवसपर्यंत ह्या चिकित्सेनें लक्षणमार्दव उत्पन्न होत असल्यामुळे काही फरक केला नाहीं. रोजच्यारोज कृमि पडत होतेच. ५ व्या दिवशी नाडी क्षीण वाटू लागली. कर्पूरहिंगाचे प्रमाण थोडेसें वाढविलें. त्याने नाडीचें अवलत्व तात्पुरते कमी होई, परंतु पुन्हा अवलत्व येई उत्तरोत्तर स्रोतोरोध वाढून श्वासमार्ग रुद्ध होऊं लागून रोगी पंचत्व पावला यात चिकित्साविरोध असा की, कृमींना गुंगवून अगर मारून शोधनानें बाहेर काढून टाकणें अत्यावश्यक, परंतु तेवढेंच आंत्रिकांत ते अशक्य पडलेल्या लहानमोठया कृमींची संख्या ११५ वर गेली होती

---

## ( १०१ ) कृमिरोग व शीर्षशूल

रोगी, वय १८. यात विशेष लक्षण—शीर्षशूल इतर लक्षणें—कोष्ठशूल, पोटात आग, डोक्यास जडपणा, सुस्ती, निरुत्साह, इ. हा शीर्षशूल वारवार होत असे पोटात दुखणेंहि २ वर्षापासून होते

चिकित्सा—सदर रोग्यास कृमिघ्न म्हणून कपिला ४ गु + सजीवनीगुटी २ गुंजा एकत्र करून त्याच्या २ पुड्या करून त्या दोन वेळ अपानकाली मधातून घेण्यास सांगितल्या व तंद्री व अनुत्साह कमी करण्याकरिता कफघ्न व स्रोतोरोधनाशक म्हणून

तालिसादिचूर्ण २ मासे, (१ पुडी) रात्रीं स्वप्नकाळीं गरम पाण्यात घेण्यास दिलें हे औषध २ दिवस दिले पण पोटातळ शूल कमी झाला नाहीं म्हणून कपिला + शतपुष्पा (वडिशेप) ह्यांच्या २ पुडया दिल्या

ह्या चिकित्सेनें कृमि पडं लागले, कोष्ठशूल व शीर्षशूल कमी झाला. तद्राहि कमी झाली, तसेंच पोटातील आगहि कमी झाली आणखी ६ दिवस हेंच औषध चालू ठेविलें होते त्यात विशेष लक्षण शीर्षशूल होतें. अग्निमांद्य व उत्क्लेशहि होता ही सर्व लक्षणें कृमींमुळे उत्पन्न होणाऱ्या उत्क्लेशामुळें होतीं व तीं सर्व वरील उपचारानें बरीं झाली

---

## (१०२) कृमिरोग व कुष्ठ

एक रोगी ह्यात विशेष त्रासदायक लक्षण कोणतेच नव्हतें एकच लक्षण होतें ते हें की, त्याच्या दोन्ही हातावर व पायावर लववर्तुळाकार काळे डाग होते इतर कोणत्याहि ठिकाणीं नव्हते डाग खरखरीत, रूक्ष, पाढरट अशा लक्षणाचे होतें ह्यावरून रस व रक्तगत कुष्ठाचे निदान करून पूर्वी एकदा जलौकावचारण व तदनुषंगत दोषप्रशमनाचा उपक्रम केला गेला , पण त्याचा काही उपयोग झाला नाहीं शेवटी कृमींची कल्पना आली व त्याप्रमाणें कृमिघ्न उपचारास सुरुवात केली प्रथम कुष्ठघ्न म्हणून गधकरसायन + मजिष्टा दोन पुडया दोन वेळ रसकाळी ( व्यानोदान काली ) मधांतून देण्यात आल्या होत्या पण कृमीच्या कल्पनेनतर कृमिघ्न व कुष्ठघ्न म्हणून विडगारिष्ट + खदिरारिष्ट २ वेळ व्यानोदानकाली तेवढेंच पाणी टाकून दिलें याने पहिल्यापेक्षां शौचास जास्त वेळा होऊ लागून कोष्ठशुद्धि व कृमिपतन होऊं लागलें थोडयाच दिवसात इष्ट असा परिणाम घडून आला आता डाग बऱ्याच प्रमाणात कमी झाले आहेत सदर रोग्यास मागे एकदा घृष्टव्रण झाला होता. तो भरून येऊन सुद्धा विवर्णता व कार्ष्ण्य कायम होते तेहि या चिकित्सेने नाहीसे झालें

विशेषत. जुनाट कुष्ठाच्या विकारात तर कृमीचा अनुबंध किंवा कृमीचे कारणत्व तरी बऱ्याच अंशानें आढळून येते "सर्वाणि कुष्ठानि सवातानि सपित्तानि सश्लेष्माणि सकृमीणि च भवन्ति।" सु नि अ ५-५ कृमि व कुष्ठ याना कारणें व चिकित्साहि जवळजवळ सारखीच असते त्यामुळें सामान्यत. वरेच दिवसपर्यंत राहिलेल्या कुष्ठात कृमींची (कोष्ठस्थ व रक्तस्थ) चिकित्सा बऱ्याच प्रमाणात फलदायी होते

सामान्यत. कोष्ठशूल, शीर्षशूल, ज्वर व तृष्णा ही लक्षणे असता कृमीचे निदान महसा चुकत नाही

कृमीच्या ह्या सर्व रोग्यांमध्यें असा विशेष दिसून आला की, ही सर्व लक्षणे रात्रीच्या वेळी जास्त होत असत

---

## ( १०३ ) कृमिरोग व मुंग्या येणें

रोगी स्त्री, वय सुमारे ३५. सर्व अंगात सारख्या मुंग्या येत असत त्यामुळें ती अगदी बेचैन होत असे. हें सरासरी २-३ वर्षे सारखे चालले होते. वरील चिन्हाच्या जोडीला अग्निसाद, भक्तद्वेष, शूल, विष्टम्भ, पारुष्य, रोमहर्ष, प्रसेक, ग्लानि, गुदकडु ही लक्षणे होती. शिवाय हनुवटीच्या डाव्या बाजूच्या भागात एक ग्रंथीहि होती ग्रंथीखेरीज बाकीची चिन्हे कृमीची अगदी स्पष्ट होती ग्रंथीवर केलेले उपचार, कृमीवर जोपर्यंत उपचार केले गेले नव्हते तोपर्यंत, लागू झाले नव्हते ग्रंथीकरिता अमरकंद चूर्ण मधांत दिले आणि कृमीकरिता डिकेमाली, वावडिंग, कपिला व पादेलोण, सर्व समभाग प्रमाणानें १ मासा ऊन पाण्यातून सुरू केले. आश्चर्याची गोष्ट अशी की, जवळ जवळ तीन महिने बारीक कृमि सारखे पडत होते. आता कृमीची सर्व चिन्हे नाहीशी झाली ग्रंथि अत्यल्प प्रमाणांत आहे.

---

## ( १०४ ) कृमि व क्षय (Suspected T. B.)

रोगी स्त्री, वय सुमारें २० क्षय (टी. बी.) म्हणून अॅलोपॅथीची चिकित्सा सुरू होती लक्षणेः—ज्वर १००° च्या आंतबाहेर दररोज दुपारी २-३ च्या सुमारास यावयाचा डोळयाची जळजळ, निरुत्साह, अग्निमद, डोके दुखणें, अन्न नकोसे वाटणे, इ. चिन्हे होती. ज्वर ३-३॥ महिने होता रोगी प्रथम पाहण्यात आला, तेव्हा सारखें नाक कोरतो आहे असे दिसून आलें व केव्हा तरी कृमि पडलेले दिसले अशी हकीकत मिळाली. म्हणून वरील कृमियोग दिला. औषधानें कृमि जवळजवळ एक महिना मधून मधून पडत होते परंतु ज्वर अजिबात नाहीसा होईना. म्हणून, चिन्हाची

पुन्हा विचारपूस केली, परंतु काही जमेना म्हणून क्षयाची सिद्धौषधि-चिकित्सा सुरू केली तिचा परिणामहि दिसला नाहीं विशेष तपासणीनंतर ज्वराचे, डोळ्याची आग हें मुख्य चिन्ह आढळून आलें. इतर ज्वराची चिन्हें मिळत नव्हती यावरून हा **रक्तगत ज्वर** असावा ही कल्पना करून **"पटोल सारिवा मुस्ता पाठा कटुकरोहिणी"** ह्या वचनातील योगाने घृत सिद्ध करून देण्याचे ठरविले घृत सिद्ध होईपर्यंत वरील योगाचा फाट उपशयार्थ देऊन पाहावा म्हणून दिला त्याचा परिणाम त्याच दिवशी उत्कृष्ट तऱ्हेने अनुभवास आला. ज्वर वाढलाच नाही पुढे ज्वर कमी झाला घृतहि सुरू केले. पुटे ढेकूण इ कारणानी दोन-तीन दिवस झोप आली नाही त्यामुळे पुन्हा ज्वर सुरू झाला परंतु त्यात डोळ्याची आग हे चिन्ह न उद्‌भवता अत्यंत त्रासदायक असा अंगमर्द (सर्व अंग, पिंडऱ्या वगैरेसुद्धा दुखणें) सुरू झाला पुन्हा रोगी पाहिला तेव्हा **मासगतज्वरा-वरील "पटोलनिंबत्रिफलामृद्वीकामुस्तवत्सका. ।"** ह्या योगाने सिद्ध घृत दिलें तावड-तोब अंगमर्द कमी झाला व ज्वर थोडा कमी झाला घृत चालूच ठेविलें. पुढे रोगी गावाला गेला सरासरी महिन्यानंतर पत्र आले प्रकृति हल्ली चागली आहे ताप वगैरे मुळीच नसतो घृत चालू आहे असा मजकूर होता

---

## (१०५) जीर्णज्वर व नेत्रदाह

रोगी, वय सुमारे २५ दररोज सरासरी ९९°-९९॥° पर्यंत ज्वर येत असे असा क्रम न चुकता वर्षभर चालू होता डोळ्याची आग व लघ्वीची अत्यल्प प्रमाणात आग हीं चिन्हें होती म्हणून रक्तगत ज्वराची कल्पना करून रक्तगतज्वरावरील योगाचे घृत सिद्ध करण्यास सागितलें व तोंपर्यंत **प्रवाळभस्म** ( चंद्रपुटी ) १ गुंज फक्त सुरू केलें प्रवाळभस्म देताच ज्वर आला नाहीं डोळ्याची किंवा लघ्वीचीहि आग नाहीं घृत सिद्ध झालें तरी ते मुद्दाम दिले नाहीं व प्रवाळभस्मच सुरू ठेविले रोगी नुसत्या प्रवाळाने चागलाच सुधारला

प्रवाळभस्माची व रक्तगत ज्वरावरील पटोलमित्यादि योगाची अवस्था भिन्न करणें जरूर आहे

---

## ( १०६ ) स्वप्नावस्था (कृमिज)

रोगी, वय १९ वर्षे. अंगाने सडपातळ, उंच, फिक्कट वर्ण असलेला, अशक्तपणाची, त्याजबरोबर अग्निमांद्याची, अपचनाची व स्वप्नावस्थेची तक्रार असलेला असा होता इतर लक्षणापेक्षाहि स्वप्नावस्थेच्या तक्रारीवर तो जास्त भर देत होता. सुरुवातीस त्याच्या विशेष लक्षणाकडे दुर्लक्ष करून त्यास सामान्य अग्निदीपक व अनुलोमक असे भास्करलवणचूर्ण २ वेळ अपानकाली गरम पाण्यात घेण्यास दिले हेतु हाच की, पाचन व अनुलोमन व्हावे व वातक्षोभामुळे उत्पन्न होणारी स्वप्नावस्था परंपरेने कमी व्हावी. हें चूर्ण प्रथम ३ दिवस दिले. पण थोडयाशा अपानप्रवृत्तीखेरीज इतर लक्षणे कमी झाली नाहींत; तरी आणखी थोडेसे प्रमाण वाढवून ३ दिवसाकरिता तेच औषध दिले. याचा परिणाम थोडासा अग्नीवर होऊन भूक लागतेसे वाटूं लागले, पण कधी रोज तर कधी एक दिवसाआड होणारी स्वप्नावस्था कमी झाली नाही म्हणून जास्त तपास केला तो अपान देशाच्या ठिकाणी एक प्रकारच्या क्षोभाची तक्रार सागूं लागला प्रथम अपानमार्गात व मूत्रमार्गाच्या आजूबाजूस कंडु व त्यानंतर क्षोभ होतो असेहि सागूं लागला व क्षोभाचा परिणाम जागृतावस्थेत मुष्टिमैथुनात होऊं लागला व रात्री अगर दिवसाहि झोपेत असताना स्वप्नावस्थेत होऊं लागला ही स्थिति ५-६ महिने चालली होती अपचनहि बरेच दिवसाचे, त्यामुळे धातुपोषण व्यवस्थित होत नव्हतेंच, त्यामुळें व शिवाय मैथुन व स्वप्नावस्था या दोहोमुळेंहि यथापूर्व व यथोत्तर सर्वच धातूंना अबलत्व आल्यामुळें क्षीणताहि वाटू लागली होती त्याला स्वतःला तर क्षयाचीच शंका वाटल्यामुळे तो दिवसानुदिवस मानसिक दृष्टया व शारीरिक दृष्टयाहि अबल होत चालला. म्हणून त्यानें मधुर पदार्थ, दूध, दही, साखर, बदाम इत्यादि चालू केले होते. पण त्याचा इष्ट परिणाम न होता उलट त्यास जास्त त्रास वाटू लागला. या सर्व आहारविहारामुळें त्याचे अपचन उत्तरोत्तर वाढत जाऊ लागले व त्याचा परिणाम गुदकंडूवर व त्यामुळे उत्पन्न होणाऱ्या क्षोभजन्य स्वप्नावस्थेवर जास्तच होऊं लागला.

गदकडु हे लक्षण कफभूयिष्ठ अर्श, अनुवासनाचा अतियोग, कफभूयिष्ठ असा उपलेप व कृमि इत्यादि विकारांत सापडते अर्शाच्या दृष्टीने तपास काढता त्या रोग्यात ते आढळून आले नाहीत अनुवासनाचा अतियोग नव्हताच, कारण त्यानें अनुवासन घेतलेले नव्हतें तेव्हा राहिली दोन कारणे एक कफभूयिष्ठ उपलेप व दुसरे कृमि. या दोहोच्या दृष्टीनेंहि सामान्य असा एकादा विडगक्वाथ वगैरेचा बस्ति द्यावा असे ठरविले. पण तो बस्ति घेण्यास कबूल नसल्याने त्यास त्रिवृत्+विडग+कपिला याचे चूर्ण गूळ व गरम पाणी यावरोवर विरेचनाकरिता व कृमीपतनाकरिता सकाळी दिलें त्यास सायंकाळपर्यंत ४ जुलाब होऊन बारीक बारीक सुतासारखे बरेच जंतु पडले दुसऱ्या दिवशींच गुदकंडु कमी झाला, म्हणून पुन्हा नुसताच विडंगक्वाथ दिला; कारण

सुतासारख्या कृमीं( thread worms )वर विडंगाचा चांगल्यापैकी उपयोग होतो असा अनुभव व विडगासारखें कटुविपाकी व कफघ्न द्रव्य असा दुहेरी उपयोग म्हणून तेंच वापरलें. शिवाय विडंग पाटुत्वनाशक, दीपक व त्याचबरोबर अनुलोमक असल्यानें व कार्यहि कोष्ठातच विशेषतः करावयाचें असल्यानें विडंगाच्या चूर्णाच्या योजनेचा उपशयच झाला विडंगामुळें दिवसातून २-३ वेळा शौचास होई. (कारण विडंगांत भेदनधर्म आहेच.) व प्रत्येक वेळी २-२, कधीं कधी ६-६ पर्यंतहि कृमि पडत असत. जसजसे कृमि पडून जाऊं लागले, तसतशी त्याचीं सर्व लक्षणें कमी होऊं लागली. विशेषत. कृमीमुळें उत्पन्न होणारा गुदकंडु कमी झाला व त्यामुळें तदुत्तर लक्षण म्हणजे स्वप्नावस्थाहि कमी प्रमाणात होऊं लागली. ६ दिवस विडगचूर्ण + गूळ ही गरम पाण्यात दिल्यानंतर शुक्रस्थानाला बल्य अशा वंगभस्माची योजना केली व आता तर सर्वच लक्षणे कमी होऊन रोगी चागलाच बरा झाला आहे

यात मुख्य त्रासदायक लक्षण स्वप्नावस्था हें होते. पण या अवस्थेंत वंगभस्मासारखी केवळ शुक्रस्थान, बस्ति ह्याना बल्य अशा उपायाची योजना उपयोगी पडली नसती. यांत कृमीमुळें अपान प्रदेशात दोषाचा उत्क्लेश होत असे व त्यामुळें गुदकंडु उत्पन्न होत असे, त्या उत्क्लेशाचा व तज्जन्य अपानप्रकोपाचा परिणाम तत्स्थानिन क्षोभ करण्याकडे होई. बरेच दिवसाच्या मुष्टिमैथुनाच्या सवयीमुळे व स्वप्नावस्थेमुळे वृषण व आसमतातील भाग ही अबल झालीं होतीं व अपानाच्या प्रकोपामुळें उत्पन्न झालेल्या क्षोभामुळे अबल स्थानावर परिणाम घडून स्वप्नावस्था होई मानसिक अबलत्वहि याला पोषक असेंच होई

या सर्वांस मूळ कारण जें कृमि, तन्नाशक चिकित्सेचा याचर इष्ट असा परिणाम लवकर झाला बस्तीचा उपयोग (त्यातल्या त्यात निरुह बस्तीचा उपयोग) चागलाच झाला असता, पण रोगी बस्ती घेण्यास कबूल नसल्यामुळें त्यास बरे होण्यास वेळ लागला

कृमि हे कोष्ठात दीर्घकाळपर्यंत राहून विशेष लक्षणें उत्पन्न करीत नाहीत असा आपणास पुष्कळ वेळा अनुभव येतो त्याचबरोबर कधीहि कल्पना न येणारी लक्षणेहि कृमीपासून उत्पन्न होऊं शकतात करिता सामान्यत· बरेच दिवसपर्यंत ज्या रोग्याच्या काही कोष्ठाच्या तक्रारी असतील त्यामध्यें कृमीच्या चिकित्सेचा बऱ्याच वेळा उपशय होतो असे अनुमान सहसा चुकीचें ठरणार नाही

# (१०७) पित्तज़ पोटशूळ

रोगी मुलगा, वय ११. पोटात सारखा शूल होतो ही मुख्य तक्रार होती. शूल दोन वर्षे दररोज होत असे. पित्ताच्या काली व अन्न जिरत असता अधिक होत असे. तसेंच श्वासोच्छ्वास जोरांत केल्यानेंहि शूल अधिक वाढत असे. छातीत व घशात जळजळ, आवट येणे, पोटात आग, शौचास साफ न होणे, एकादे वेळीं वांति होणे ही चिन्हें होती. पोट नेहमी शिंपीमध्यें (नाभीच्या वर) एक रुपयाएवढया जागेंतच दुखत असे.

यास मुख्य कारणः—अभ्यासाकरिता बराच काल रात्रीचे जागरण हे आढळलें

उपचार—जेष्ठमध, अश्वगंधा, आमलकी यांनीं सिद्ध केलेले दूध सकाळ, संध्याकाळ दोन वेळा दिलें. त्यानें शूल व इतर बहुतेक चिन्हे कमी झाली, फक्त पोटातील आग कमी झाली नाही. औषध एक महिन्यात धरसोडीने १७ दिवस घेतले आग कमी व्हावी म्हणून साळीच्या लाह्या, चंदन, साखर, सारिवा, वाळा ह्यांनीं सिद्ध केलेलें दूध दिले गेलें रोग्यानें तेंहि फक्त तीन दिवसच घेतले

त्यानंतर तीन महिन्यांत पोट दुखलें नाही थोडी आग मधून मधून होत होती औषध आणखी कांही दिवस घेणे आवश्यक होतें.

---

# (१०८) नेत्रबलाकरितां त्रिफळा

रोगी पुरुष, वय ४० च्या वर, धंदा सोनारकीचा. डोळयानें बारीक काम करण्यास त्रास होत असे चष्म्याकरितां डोळे तपासून घेण्याकरिता रोगी आला. त्याला "अगोदर औषध घेऊन पाहा. औषधाने दृष्टि न सुधारली तर डोळे तपासून घ्या," असें सांगून "त्रिफला मधुसर्पिर्भ्याम् निशि नेत्रबलाय च" ह्या वचनाप्रमाणे त्रिफला मधतुपाबरोबर रात्री निजतांना घेण्यास सांगितलें त्याप्रमाणें सदर गृहस्थांनी नियमानें दोन-तीन महिने औषध घेतले. त्याचा दृष्टीवर चांगला परिणाम आढळून आला.

---

## (१०९) घामगळंड

उन्हाळयाच्या दिवसात उत्पन्न होणाऱ्या ग्रंथि ( घामगलाडी ) चे रोगी ह्या ग्रंथीच्या रोग्यांस प्रथम विरेचनाकरिता त्रिवृत् + कणाचूर्ण ही देत असूं. दोष उष्णतेच्या योगाने रक्तस्थित होऊन ह्या ग्रंथि उत्पन्न होत असल्याकारणाने त्रिवृत् ह्या विरेचक द्रव्याबरोबर रक्तस्थित दोषाच्या शुद्धीकरिता कणा (लेंडी पिंपळी) चूर्ण देत असूं विरेचनाने त्या ग्रंथींचा जोर लवकरच कमी होई. वर लाविण्याकरिता गोपीचंदन, पांढरा चंदन व वाघाटीचे मूळ या द्रव्यांचा स्वतंत्रपणे उपयोग करून पाहिला व तिघांचाहि ग्रंथीभूत दोषप्रसादनाकरिता चांगलाच उपयोग झाला पोटांत घेण्यास त्रिफला + सारिवा यांचा कषाय बराच उपयुक्त ठरला.

---

## (११०) कंठगत शोथ (Pharyngitis)

रोगी, वय २० वर्षे अतिशय थंड वारा अगर थंड पाणी याच्यायोगाने अगर अन्य कारणानीं बऱ्याच वेळां गळयाच्या ठिकाणी आतून रोध होतो यात केवळ एकदोषात्मकताच असते असें नाही, निरनिराळया दोषांचेंहि बाहुल्य यात आढळते. यांत रोग्यास गिळता येत नाहीं, शीर्षशूल थोडया प्रमाणात असतो, थोडेसें पटसें आल्याप्रमाणे वाटते, जीभहि दुखते, गळा दुखतो, अस्वस्थपणा फारच वाटतो

अशा प्रकारच्या एका रोग्याचा गळा रात्री एकाएकीं दुखूं लागला व आवंढा गिळता येईनासा झाला एकदम बराच त्रास वाटूं लागल्याने दुसरेच दिवशी सकाळी रोगी औषधाकरिता आला या रोग्यात कफभूयिष्ठ दोष पाहून वाग्भट उत्तरतंत्रातील मुखरोगप्रतिषेधाध्यायातील " कंठरोगेषु ....हरीतकीकषायो वा पेयो माक्षिकसंयुत. ।" (अध्याय २२, श्लोक ५४-५५) या वचनाप्रमाणे हरीतकी चूर्ण ८ मासे घेऊन त्याचा काढा २ वेळ थोडेसें द्रव अगर घन अन्न खाल्ल्यानतर घेण्यास सांगितला. काढयात तो थंड झाल्यावर मध टाकण्यास सांगितला होताच हरीतकी ही रसस्थित दोषाचे व कण्ठस्थित कफभूयिष्ठ दोषाचे शोधन व पाचन करणारी असल्याकारणाने केवल हरीतकीनें यात उत्तमच कार्य केले गलस्थित दोष कमी करण्याकरिता काल दोन्ही वेळा काही खाल्ल्यानंतरचा (व्यानोदान) ठेवला होता याचा विशेष असा की, हरीतकी कषाय हा तुरट असल्यानें व त्यात आणखी मधहि असल्याने तो काढा एकदम घेववला नाही. त्यामुळे तो थोडा वेळ तोंडात राहिला व त्याच्या तुरटपणाच्या योगानें कफ-

भूयिष्ठ दोषांचेयोगानें उत्पन्न झालेले शैथिल्य थोड्याच वेळांत कमी होऊन रोध कमी वाटूं लागला व थोडेसे गिळता येऊं लागलें म्हणजे बाकीचें कार्य पोटात घेतलेल्या काढयाच्यायोगानें झाले. यानें शौचास साफ झाल्यानंतर गळा बराचसा मोकळा वाटूं लागला व गिळताहि येऊं लागलें. याप्रमाणे आणखी एक दिवस हा काढा चालू ठेविला होता. दुसरें कोणतेंहि औषध पोटात दिले नव्हतें.

याचप्रमाणें आणखी ८ रोग्यावर या हरीतकीकषायाचा चांगलाच उपयोग झालेला आहे.

---

## (१११) कृमिरोग व वांति

रोग्यास कृमीचीं सर्व लक्षणे होती. आध्मान होते, शूलहि चालूच होता व बरेच दिवसांची मळमळ होती. एके दिवशीं ह्यास सकाळीच वांत्या होऊं लागल्या वात्या कडु, आंबट, पिवळ्या अशा होत आमाशयस्थ पित्तदुष्टि व आमाशयक्षोभ ही कमी करण्याकरितां उपयोगी पडणारा चंदन (श्वेत) चूर्ण+आमलकी चूर्ण समप्रमाण संयोग मधांतून चाटविण्यास दिला. छर्दी सारखी चालू होती त्यामुळें प्रथम १-२ वेळचें चाटण ४-५ मिनिटातच ओकून पडले तरी चाटण हें सारखें चालू ठेवलें याने आमाशयक्षोभ कमी होऊन व वातपित्ताचे प्रशमन होऊन छर्दी लगेच थांबली यानंतर कृमीची चिकित्सा ( कपिला + विडंग ) करून इतर लक्षणें कमी झाली. वरील छर्दिघ्न संयोग आतांपर्यंत साधारणतः कोणत्याहि प्रकारच्या छर्दीत उपयोगी पडत आला, त्यामुळे या योगाची छर्दिप्रत्यनिकताच आहे असे म्हटलें तरी काही अतिशयोक्ति होईल असे वाटत नाही. ही द्रव्यें कोठेंहि मिळूं शकतात. त्यामुळें हा संयोग कोठेंहि वापरता येईल. कृमिज छर्दीत याचें कार्य होण्यास थोडा वेळ लागतो, पण इतर छर्दीत मात्र फारच लवकर परिणाम घडतो.

---

## (११२) पित्तज वांति

या रोग्यास वांति अतिशय आंबट, कर्पट अशी होई व प्रमाणहि भरपूर असे वांत होण्याच्या पूर्वी ४ दिवसपर्यंत सारखें गुर्वन्नभक्षण होत होते वातीला सुरुवात दुपारच्या

जेवणानंतर ३ तासांनीं म्हणजे (पित्ताच्या) पच्यमानावस्थेच्या वेळी एकाएकी आली यात पित्ताची विदग्धता जास्त होती म्हणून पित्तनिर्वापणाकरिता कामदुघा ४ गुजांची एकच पुडी थोड्याशा थंड पाण्यात दिली औषध पोटात जाताक्षणींच जळजळ कमी झाली व पुन्हा वांतिच झाली नाही. यात कार्य दोन प्रकारचें झालें थंड पाण्यानें विदग्ध पित्त सौम्य होऊन त्याचे पुरस्सरण (अन्नाशयातून) होण्यास मदत झाली (विदग्धाजीर्णांत थंड पाण्याचा उपयोग करण्यास सांगितलेला आहे सुश्रुतसूत्र अ ४६ श्लोक ५०९) व कामदुघेमधील क्षार द्रव्यानीं अम्ल अशा पित्ताचें निर्वापण होऊन शिवाय आमाशयाला बळहि मिळालें कामदुघेचा उपयोग आणखी अशाच प्रकारच्या विदग्धाजीर्णातील वांतीत व जळजळींत ऱ्याच रोग्यात केला व त्याचें कार्यहि चांगलेंच झालें आहे

---

## (११३) बद्धकोष्ठापासून वांति

रोगी मूळ बद्धकोष्ठाचा, त्यास ३-४ दिवसानीं शौचास होत असे पण ३-४ दिवसाच्या पुढें काल गेला कीं, त्यास वांति होऊं लागे व वांतीस मलसदृश घाण येई वांति फार प्रमाणात होई असें नाही, पण पोटात लगेच दुखे मात्र म्हणजे वातभूयिष्ठ, छर्दीची लक्षणे वाटत यास मूळ कारण बद्धकोष्ठ हे, ते नाहींसें व्हावें एवढ्याकरिता स्वादिष्टविरेचनचूर्ण ( ६ भाग ) व त्याचबरोबर मलाचें भेदन करून वातानुलोमन करणारा यवक्षार (१ भाग) याचें मिश्रण ४-४ गुंजा प्रमाणात दर अर्ध्या तासानें गरम पाण्यात दिलें याने त्यास शौचास होत असे, थोड्या ढेंकराहि येत असत व वाऱ्याहि पावत असत पुढें काही दिवस हीच योजना थोड्या प्रमाणात घृत या अनुपानाबरोबर केली व त्याचें बद्धकोष्ठ नाहींसें होऊन छर्दीहि पुन्हा झाली नाहीं

---

## ( ११४ ) कष्टसाध्य आंत्रिक सन्निपात

यावत् कण्ठगत प्राणस्तावत्कार्या प्रतिक्रिया ।
कदाचिद्दैवयोगेन दृष्टरिष्टोऽपि जीवति ॥

रोगी, मूल वय ७ टायफॉइड हें निदान व त्याला अनुसरून चिकित्सा चालू होती.

एकदोन डॉक्टराच्या मतानें रोगी अगदी असाध्य ठरला एका डॉक्टरच्या मताने तर काही तासांच्या आत अंत होईल असे ठरून रोग्याच्या आप्ताला त्याप्रमाणे सूचनाहि केली गेली नंतर रोगी पाहण्यात आला. त्या वेळी डॉक्टरद्वयांचे मतच ग्राह्य वाटलें व तसे रुग्णपालकास सांगितलेंहि. परंतु पालकांचा फारच आग्रह पडला, त्याच्या विनंतीचा अव्हेर करता येईना, म्हणून वरील वचनाला अनुसरून प्रयत्न करून पाहावा म्हणून चिकित्सेला आरंभ केला.

रोगी पाहिला तेव्हाची स्थिति—रोगी अत्यत कृश (बलमासविहीन), ज्वर १०४° ते १०५°, नाडी अशक्त व शीघ्र गतीची, ७-८ दिवसापूर्वीपासून अतिसार, १५ दिवसापूर्वीपासून सारखी मूर्च्छा, मूर्च्छेतच प्रलाप व मधून मधून मोठ्याने ओरडणे, डोके सारखे हालवीत असे ( शिरसो लोठनम् ), डोळे निस्तेज व गढूळ आणि त्यातून सारखे अश्रु वाहात असत. दात मधून मधून विचकीत असे अंतराळात कांही आहे असे समजून त्याला हातानी धरण्याचा प्रयत्न करीत असे डोक्याचा मागील भाग डोके हालविल्यामुळें सारखा अंथरुणाला घासत राहिल्याने त्या भागाला शोथ आला होता कमरेच्या मागें त्रिकाजवळ अंथरुणाला खिळल्यामुळे व्रण (बेड सोअर्स) झालेले होते

उपचार—रोग्यास २४ तासांत सरासरी १ डझन मोसंबी, दूध व अंड्याचा बलक हा आहार दिला जात असे तो एकदम बंद करून लघन दिलें व पुढें **साळीच्या लाह्याची पेज, भाताची पेज व मधून मधून मनुकाचे पाणी, डाळिंबाचा रस** (क्वचित् मिळत असे) हा क्रम ठेवला होता

औषधिचिकित्सा—अतिसारनाशक, पाचक **सजीवनी** १ गुज, वातप्रकोप कमी करणारा **महावातविध्वंस** १ गुज व हृदयाला बल्य **लक्ष्मीविलासगुटी** २ गुजा हा योग **कांद्याचा रस, तुळशीचा रस व माक्याचा रस** ह्यात कालवून, त्यापैकी थोडे मिश्रण चमचात कोमट पाणी घेऊन त्यात घालून १०-१० मिनिटांनी देण्यास सुरुवात केली डोळे **त्रिफळाच्या फांटाने** धुण्यास सांगितले. चार-पांच तासात किंचित् फरक वाटला पुन्हा वरील मिश्रण दिले. दुसरे दिवशी मानेची हालचाल थोडी कमी झाली प्रत्येक हालचालीमधला काळहि लावत चालला डोळ्याचा निस्तेजपणा कमी झाला डोळ्याचं पाणी कमी झालें. नाडी थोडी बलवान् लागूं लागली. वरीलप्रमाणेच दोन दिवस चिकित्सा केली मूर्च्छा कमी होऊन शुद्धीवर येऊ लागला. ताप १०२°च्या वर जात नसे मळाची घाण कमी झाली. पूर्वीच्या मानाने ह्या दोन दिवसात डोके हालवणे मात्र जितके कमी व्हावयास तितके कमी झाले नाही, म्हणून **सजीवनी** १ गुज व **वातगजांकुश** २ गुजा ह्याचे मिश्रण **कांदा, माका व कोमट पाणी** ह्यातून वरीलप्रमाणेच सुरू केले. तीन दिवसात त्यामुळें मानेची हालचाल पुष्कळ कमी झाली बराच शुद्धीवर आला, माणसाकडे पाहून ओळखूं लागला डोळे अगदी स्वच्छ झाले, पाणी येईनासे झाले प्रलाप कमी झाला शोथाच्या वेदनानी कण्हत व रडत असे कमी होणाऱ्या वरील चिन्हांबरोबर

तगमग थोडी वाढूं लागली म्हणून वरील ओषध मधून मधून फक्त चालून ठेवून गुळवेल सत्व ४ गुंजा, लक्ष्मीनारायण २ गुंजा व सूतशेखर २ गुंजा ही वातनाशक परतु पित्ताला अविरोधी अशी चिकित्सा सुरु केली. ह्याचा परिणाम ताप १००° ते १०१° पर्यंतच राहूं लागला व इतर चिन्हें कमी झालीं हा ताप पुढे क्रमाने कमी व्हावयास पाहिजे होता, परंतु शोथ नुकताच पिकून त्याचे छेदन केल्यामुळें व पूं अजून कमी न झाल्यामुळें ताप कमी झाला नाहीं म्हणून वरील गुळवेळसत्वादि मिश्रण व पटोल मुस्ता, पाठा, सारिवा, जटामांसी ह्यांचा फाट हे २ योग चालू ठेवले मधून मधून नाडीच्या अशक्ततेला अनुसरून लक्ष्मीविलासगुटीहि सत्वादि मिश्रणाबरोबर देत होतो त्यानतर ज्वर व सर्व चिन्हे कमी झाली नंतर व्रणाकरिता, ज्वर येऊं नये म्हणून व पचनहि चागलें सुधरावे म्हणून योगराजगुग्गुळ २ गुंजा आणि बलपुष्टीकरिता मधुमालिनीवसत १ गुंज तूपसाखर ह्यातून सकाळीं सुरु केले त्याबरोबरच तापानतर त्वचेंत खर दिसत होती म्हणून दारुहरिद्रा व हरिद्रा (दोन दोन गुंजा) हा सुश्रुतातील पिष्टमेहावरील योग मधातून समानकाळीं दिला त्यामुळें खरहि कमी झाली अजून रोग्यास शक्ति म्हणावी तशी आली नाहीं रोगी एकविसाव्या दिवशीं चिकित्सेला आला व आजच चिकित्सेला महिना पूर्ण झाला

---

## (११५) कंपरोग (अपतर्पणजन्य)

रोगी, वय २१ वर्षे काहीं दिवसापासून सदर रोग्यास अंगात कांपरं आल्याप्रमाणें वाटत असे हे कापरे बाह्यत काहींच जाणवत नसे, पण सर्व अग सारखें थरारल्याप्रमाणे वाटे रूक्षता वाटे, थकवा वाटे व हातपाय वगैरे एकदम गळून गेल्याप्रमाणें वाटे सायकाळचे वेळीं हीं लक्षणें जास्त प्रमाणात वाटत असत शौचास साफ होत नसे, कठीण असा मल होत असे व शौचास न झाल्यास वरील प्रकारचे कापरे वाढत असे

सदर लक्षणाच्या कारणपरंपरेचा विचार करता अतिशय श्रम हे कारण आढळून आलें व श्रमाचा अनुपशयहि अनुभवास येत असे पूर्वी बरेच दिवस कुस्तीसारखा व्यायाम घेऊनसुद्धा बृहणात्मक अन्न नसल्यामुळे वातप्रकोप होऊन मल रूक्ष, शुष्क होऊं लागला, व त्यामुळे प्रथम पोटात गुबारा धरूं लागला व नतर कापरें वगैरे लक्षणे जाणवूं लागली

ह्या लक्षणांस निदान अपतर्पणात्मक असल्यामुळें व रोगीहि अपतर्पित असल्यामुळे बृहणकार्य करण्यास योग्य असा मधुमालिनीवसत व त्याबरोबरच अपतर्पणजन्य वातपित्तदोषशामक असें गुळवेलसत्व व प्रवाळभस्म हें दिलें अनुपान दूधसाखर ठेविले व बलाकरिता म्हणून सामान्य रसायनकालीं म्हणजे सकाळीं औषध घेण्यास सांगितलें

तसंच परंपरेनें अंत्रस्थ स्नेहवर्धनाच्या दृष्टीनें व बलवर्धनाच्या दृष्टीनें अश्वगंधारिष्ट दुपारच्या जेवणानंतर घेण्यास दिले व कोष्ठस्थ वायूच्या अनुलोमनाच्या दृष्टीनें रात्री निजताना बालहरीतकी + सौवर्चल गरम पाण्यात घेण्यास दिले

या चिकित्सेने त्यास शौचास साफ होऊं लागून गुबारा कमी वाटूं लागला व कापरेहि कमी वाटूं लागलें. हळूहळू सर्वच लक्षणें कमी वाटू लागली मध्यंतरी काही दिवस औषध बंद ठेविलें होते पुन्हा कारणपरंपरा सुरू झाली त्यामुळे पुन्हा थोडेसे कापरे सुरू झाले होते, पण वरीलच औषधी सुरू केल्यापासून सर्व लक्षणे कमी झाली व त्याबरोबर बृंहण होऊन पहिल्यापेक्षा शक्तिहि चांगलीच वाटूं लागली आतापर्यंत सदर रोग्यास पुन्हां कोणताच त्रास झालेला नाही

---

## ( ११६ ) परमा ( अंतर्बाह्य उपचार )

रोगी स्त्री, वय १५ बाळंतपणानंतर ११ महिन्यानें पुन्हा आर्तवदर्शन पंधरा सोळा दिवसाच्या अंतरानें पुढे दोन वेळ रजोदर्शन झालें नंतर विटाळ बंद झाला व पूं वाहणे सुरू झालें [ कारण पूयप्रमेह ( गनोरिया ) पीडित पतीशी संबंध ] वस्त्रास पिवळे डाग पडूं लागले व ओटीपोटात ( गर्भाशयात ) अतिशय कळा येऊं लागल्या या स्थितीत २ महिने गेले ( या कालात स्त्रीपुरुष वैद्यकीय तज्ज्ञाकडून केलेले उपचार यशस्वी झाले नाहीत ) त्याबरोबर नवीनच झालेली मूळव्याध, ( कोंब नव्हते पण शौचास फार त्रासाने होई व नंतर रक्त पडे व तो गुदाचा भाग दुखे ), लघ्वी कमी व दाहयुक्त होई, ताप ९९॥° ते १००° पर्यंत चढे, सर्व अंगाचा अत्यंत गळाटा होई व दोन्ही हातपाय दुखत चालताना डोळ्यास अंधेरी येई व पू जास्त जात असे जेवण जात नसे व दुपारी सुस्ती चढे पोटात कळा होण्याची तक्रार प्रमुख होती

ही पोटातील कळ व वाहणारा पूं कमी करण्यासाठी फक्त शोधन तेलाचाच योनिमार्गानें अभ्यंतर उपयोग करण्यात आला व त्याला उत्तम यश आलें १ शेरभर पाणी चांगले उकळून घ्यावयाचे व त्यात १ तोळा शोधन तेल टाकून ते रवीने घुसळावयाचे ते मिश्रण कोमट झाले म्हणजे त्याचा योनिमार्गाने उत्तरबस्ति घ्यावयाचा हे धावन झाले म्हणजे काही वेळाने शोधन तेलात भिजवलेला एक स्वच्छ व शुद्ध कापडाचा अगर कापसाचा बोळा ( पिचु ) योनिमार्गात ठेवावयाचा व काही वेळ पडून राहावयाचे असे रोज दोन वेळ सकाळसायंकाळ करावयाचें या कोमट स्नेहयुक्त उत्तरबस्तीनें एक दोन दिवसात कळाचें प्रमाण बरेच कमी झालें

या व्रणशोधन उपायाबरोबर पोटांतूनहि पूयप्रमेहहर औषधे देण्यात आली. व्रणाच्या सर्वावस्थांत उत्तम उपयुक्त अशा गुग्गुळूचा मूत्रल योग–गोक्षुरादि गुग्गुल १ गु. व उन्हाळयाचे औषध १ गु. हे मूत्रल, याबरोबरच चंदनादिवटी १ गु. व सुवर्णराज-वगेश्वर ½ गु ही पूयप्रमेहात उत्कृष्ट कार्य करणारी औषधे यांचे मिश्रण वापरण्यात आले घेण्याची वेळ सकाळी व दोन्ही जेवणाचे प्रारंभी अनुपान तादूळ धुतलेले पांढरे पाणी व खडीसाखर

पधरा दिवसात सर्व लक्षणे थोडी थोडी कमी झाली. पण ती यापेक्षा लवकर व पुष्कळच कमी व्हावयास पाहिजे होती रोगी दिवसा झोपत असल्यामुळे पूं होण्यास मदत झाली व प्रस्तुत विकारात वेदना विशेष असल्यामुळे केवळ दाहशामक अशा तादळाच्या धुवनापेक्षा चदनासवासारखे मद्यपणामुळे वातकफहर, सूक्ष्म व स्रोतसाचे विशोधन करणारे व चंदनादि द्रव्यामुळे दाहावर व परम्याचे विषारावर उपयुक्त असे अनुपान हवे होते दुसऱ्या पधरवड्यात तेवढा फरक करताच व रौप्यभस्म ½ गुज+अभ्रक ½ गुज+त्रिफला १ गुज हे मिश्रण सकाळी व पूर्वीचे औषध ( प्रमाणात थोडा फरक करून ) दोन्ही अपानकाली चदनासव ½ तोळा+पाणी यावरोबर देताच विलक्षण सुधारणा दिसून आली सर्वांग गळून जाणे, पाय दुखणे वगैरे सर्व गेले पूं जाणे, कळा येणे वगैरे सर्व लक्षणें जाऊन भूक वाढून रोग्यास चागली तरतरी आली

विशेष गोष्ट अशी की, या वेळी ५ महिन्याचे मूल अगावर पीत होते, त्यास काही विकार न होता चागले बाळसे आले

रोग्यास व्रणी मनुष्याचे सर्व पथ्यापथ्य सागण्यात आले होते पण अंगावर मूल पीत असल्यामुळें रोज ½ शेर दूध पिणे चालू होते पथ्याहार, उत्तरबस्ति व पोटांतील औषधे हीं क्रमाने व पादपादाने कमी करीत आणून मग बद करण्यात आली.

---

## (११७) ग्रंथि व ज्वर

रोगी, वय वर्षे ६ कृश प्रकृति चिकित्सेकरिता आला त्या वेळी त्यास रोज ताप येत असे व दोनहि कानाच्या खालच्या ग्रंथि पिकून वाहात होत्या.

पूर्वीची हकीकत—प्रथम अदाजे ३ आठवडे मुदतीचा ताप आला, त्यात गाल व कानाच्या आसपासचे भाग सुजले व पुढे कानाच्या खाली व्रण झाले व पूर्वीसारखा अगात राहणारा ताप आता विषमज्वरप्रमाणे दिवसातून एकदा अगातून निघू लागला व पुन. चढू

लागला. व्रणांचीं तोंडें बारीक असल्यामुळें कधी कधीं त्यावर खपली धरे व ताप विशेषच चढे.

या विषमज्वरात मेदोगतज्वराची घाम जास्त येणें, तहान, वडबड, ओकारी, असहिष्णुता, अरुचि ही लक्षणें स्पष्ट होती व्रणांतून येणाऱ्या स्रावावरून मेदोदुष्टि व्यक्त होत होती

चिकित्सेला प्रारंभ—मेदोगत विषमज्वरयोग १-१ मासा ( काडेचिराईत, गुळवेल, पाढरा चदन, सुठ ) २ पुडया सकाळसायंकाळ पाण्याबरोबर, व्रणावर लावण्याकरिता तांबडा मलम ( एरंडेल + शेंदूर ) ४ गुजा व व्रणाच्या आजूबाजूच्या सुजेवर शोथहर लेप या औषधानीं करण्यात आला. एक सप्तकात ताप १०४° वरून १०१° पर्यंत आला व्रणावर खपली धरली, परंतु पुनः आत पूं सांठून पुनः व्रण वाहूं लागले विशेष फरक पडला नाही. रोग्याच्या कळलेल्या हकीकतीवरून सध्याचा व्याधि कदाचित् आन्त्रिक सन्निपाताचा ( typhoid ) उपद्रव असेल असें वाटून व थोडी मज्जाधातुदुष्टिहि असावी अशा कल्पनेने लक्ष्मीनारायण १ गुज व मज्जागतविषमज्वरयोग ( आवळकाठी, गुळवेलसत्व, नागरमोथे ) ९ गुजा यांचे मिश्रण मोरावळयात तापापूर्वी पाच दिवस दिलें तथापि ताप १०१° पर्यंत चढणे कमी होईना व व्रणहि वाहात होतेच

वरील अनुपशयाचा विचार करता, रोग्याला पूर्वी आलेला व आताहि विषमज्वररूपात चालू असलेला ज्वर आन्त्रिक ( typhoid ) प्रकारचा नसावा व मेदोधातुदुष्टिपूर्वक व्रणशोथ हा प्रधान व्याधि व ज्वर हा त्याचें एक लक्षण असावे असें ठरवून त्याप्रमाणे चिकित्सा केली व रोगी एका पंधरवडयात साफ बरा झाला.

पूर्वीचीं सर्व औषधें बंद करून शोधनतेल १½ तोळा स्वप्नकालीं पोटांत घेण्यास दिले व त्याच तेलाचे बोळे अगर जमल्यास वाती करून व्रणात ठेवण्यास सागितले. (शोधनतेल तसें नुसतें पिणे कठीण वाटल्यास capsule मध्यें भरून घेतलें तरी चालतें ) सकाळीं तापापूर्वी घेण्यास महायोगराजगुग्गुळ १ गुज + मेदोगतज्वरयोग २ गुजा + मज्जागतज्वरयोग २ गुजा याची एक पुडी मधात दिली होती. कडुनिंब, त्रिवृन्मूल, हरिद्रा, तिल याचा शोधनतेल हा सिद्धतैलयोग दिल्यामुळें मेदोघटित ग्रंथीतील व्रण लवकर शुद्ध झाले औषध झोपण्याच्या वेळीं दिल्यामुळें त्याचा उपयोग जत्रूर्ध्व भागांत विशेष झाला. वरील औषधियोजनेंत रोगी पूर्ण बरा होईपर्यंत काहीहि फेरबदल करावा लागला नाही.

---

# (११८) तोंडावरील पुळया व उचकी

रोगी, वय ४५ वर्षे. गेल्या आठ महिन्यापासून रोग्याच्या तोंडावर काळया बारीक पुळया साधारण उडदाएवढया येत असत पुळया उत्पन्न होत व त्या थोड्याशा चिघळून त्याचा व्रण होऊन राही व तो बरेच दिवसपर्यंत बरा होत नसे. एक पुळी उत्पन्न झाल्यापासून ती बरी होण्यास जवळजवळ २ ते २॥ महिने लागत उत्पन्न होणाऱ्या पीटिकाच्या वर्णावरून व त्याच्या रूक्षतेवरून त्या रक्त ह्या दूष्याच्या व वातदोषापासून उत्पन्न झालेल्या असाव्यात, असें अनुमान करून रक्तस्थित दोषाच्या शुद्धीकरिता व शमनाकरिता हिरडा + मंजिष्ठा + सारिवा + पिप्पली याचा काढानिकाढा करून दोन्ही वेळा जेवणानतर काढा गाळून थड झाल्यावर मध घालून घेण्यास सागितला व शिवाय रात्रीं झोपताना बाळहिरड्यांचा काढा घेण्यास सागितला यातील हिरडा हें द्रव्य रसाची शुद्धि करणारे असल्याने व मूळ कारण जे बद्धकोष्ठ ते नाहीसें करणारे असल्यानें त्याची योजना केली होती हरीतकीचा रसशुद्धीकरिता म्हणून उत्तम उपयोग झाल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत दुसरे द्रव्य मजिष्ठा हे द्रव्य रक्तस्थित दोषाच्या शुद्धीकरिता कोठल्याहि दोषाची लक्षणे असता उपयोगी पडणारे असें आहे तसेंच सारिवा हेंहि द्रव्य रक्तस्थित दोषाची शुद्धि व शमन करून त्वचेचा वर्ण उत्तम करण्याकरिता उपयोगी पडणारे द्रव्य आहे यात पिंपळी घालण्याचे प्रयोजन असें की, पिपळी ही रक्तातील दोषाचें पचन करणारी व विपाकानें वातशमनाचे कार्य करणारी असल्याने पिंपळीचाहि उपयोग या काढयात करण्यात आला होता ह्या द्रव्याचा काढा ही कल्पना करून दिली असल्यामुळे ह्याचे कार्य वरवर नुसत्या कोष्ठात न होता शाखात झालें व रसरक्तातील दोषाचें शमन करून व पिपळीसारखें द्रव्य बरोबर असल्यानेंहि बरेच दिवसाचे लीन दोष काढून टाकण्यासहि मदत झाली पण साक्षात् कोष्ठातील दोष बाहेर काढून टाकण्यास रात्री निजताना बाळहिरड्याचा काढा घेण्यास दिला. बाह्य व स्थानिन उपयोगाकरिता त्रिफळा जाळून त्याची काळी पूड तेलात खलून लावण्यास दिली त्रिफळ्याच्या राखेचा उपयोग अशा प्रकारच्या जुनाट अगर नवट व्रणातहि चागल्या तऱ्हेने होतो

वरीलप्रमाणें चिकित्सा जवळजवळ ११ महिनापर्यंत केली या मुदतीत नवीन पीटिका ५-७ च आल्या व जुन्या पीटिका नाहीशा होऊन सवर्णताहि प्राप्त झाली सदर रोग्यास कांहीं दिवसानीं थोडेसें अपथ्य घडलें व त्याचा परिणाम म्हणून हिध्मा (उचकी) उत्पन्न झाली त्यावर केवळ पिंपळीचूर्णाचा उपयोग केला १-१ गुंज पिपळीच्या ६ पुड्या दर तासानें मधात चाटण्यास दिल्या व त्यानें हिध्माहि तावडतोब बंद झाली. पिपळीचा उपयोग हिध्मेमध्यें चागल्याच तऱ्हेचा होतो विशेषत. वातकफात्मक दोष असता हिचा उपयोग चागलाच होतो मात्र चूर्ण देऊन ते वारंवार चाटण्यास सागावे

याच्या योगानें आमाशयाचा क्षोभ नाहीसा होऊन व वातकफभूयिष्ठ दोषांचें गमन होऊन हिध्मा तावडतोब थांबते.

या रोग्यास अजूनपर्यंत पुन्हा एकहि पीटिका उत्पन्न झालेली नाही.

---

## (११९) पच्यमान विद्रधि

रोगी, वय २७ वर्षे. खेडेंगावी खाण्यापिण्यास मिळण्याची पंचाईत म्हणून गाव सोडून शहरात आला आल्यानंतर कांही दिवस खाणेंपिणें अव्यवस्थित होऊं लागलें कधी हॉटेलमधील तळलेले पदार्थ, कधीं फुटाणे अशावर गुजराण चाललेली व त्याच वेळी मजुरीची कामेंहि करावयाची याचा परिणाम एका विद्रधीत झाला. विद्रधीचे स्वरूपहि बरेंच तीव्र होतें प्रथम त्यास डावा पाय उचलता येईनासा झाला व गुडघ्याच्या जवळच वरच्या बाजूस विद्रधी झाल्याकारणाने त्यास गुडघाहि हालविता येईना सूज बऱ्याच प्रमाणात होती ठणक्याला अजून फारशी सुरुवात झाली नव्हती कारण ती आमावस्था होती म्हणून त्यास प्रथम दिवसातून ५-६ वेळा नो विद्रधी चोळण्यास सांगितला व एरंडेलसारखे स्निग्ध विरेचन दिले पण त्याचा विशेष परिणाम झाला नाही फक्त सूज मात्र वाढली नाहीं, पण ठणका थोड्या प्रमाणात सुरु झाला व अर्थात् विद्रधीच्या पच्यमानावस्थेस सुरुवात झाली तेव्हा पच्यमानावस्थापन्न शाखास्थित दोषांच्या शोधनास कोष्ठांतील शोधनापेक्षाहि स्थानिक दोषांच्या शोधनास अस्रविस्रुति योग्य वाटून त्याप्रमाणे स्थानिक शोधन म्हणून जलौका लावून रक्त काढून घेतले जलौका पाच लाविल्या होत्या इतर अस्रविस्रावाचें साधन शक्य न झाल्यामुळें व विद्रधीच्या पच्यमानावस्थेस सुरुवात झाली असल्यामुळें जलौका हेंच साधन उपयुक्त ठरलें त्याचा योग्य असाच उपयोग झाला व शूल, तडणी व जडपणाहि तात्काल कमी झाला विद्रधीचे तीव्र स्वरूप कमी झालें व दाह किंवा शूलास कारण जें विदग्ध रक्त तें नाहीसें झाल्यामुळें शूलहि तावडतोब कमी झाला "रक्तं हि व्यम्लतां याति तच्च नास्ति न चास्ति रुक्" हे गुल्मोक्त चिकित्सासूत्र या अवस्थेंतहि उपयुक्त झालें. जलौकावचारणानंतर प्रसादनाकरिता स्वेद दिला व रक्तवाहिन्या विस्फारित करून शोथ कमी करणारा असा शोथहरलेप लेपाकरिता दिला. यानें उत्तम प्रसादन होऊन शेष शोथहि कमी झाला ४ दिवसात रोग्याची सूज जवळ जवळ नाहीशी झाली अशा रीतीनें विद्रधीच्या अगर शोथाच्या पच्यमान अवस्थेच्या अगदी सुरुवातीसच जलौकेने अस्रशुद्धि केल्यास पुढील पाकाची आपत्ति टळते.

---

## (१२०) विषमज्वरजन्य क्षय

रोगी पुरुष, वय २१ वर्षे. मुंबईस राहून हिंवताप लागलेला व नंतर क्षयापर्यंत पूर्वीहि एक दोन वेळ गेलेला असा विकार विकार औषधोपचारानें बरा होत असे व मुंबईस गेल्यावर पुन वाढे यावेळीं एकदम अधिक खाण्यात आल्यामुळें म्हणा अगर अन्य कांहीं लक्षात न आलेल्या कारणामुळें म्हणा विकारानें उलट खाल्ली रोगी पाहिला त्यावेळीं ताप १०३°, खोकला साधारण कोरडाच, शौचास जुलाब ७-८, पोट दुखत होतें, जीभ अगदीं पांढरी, शरीर अगदीं अस्थिपंजर, घरातल्या घरात चाललें तरी दम लागतो अशी स्थिति. एकंदर स्थिति पाहता अशक्तता फार असताहि १-२ दिवस तरी नुसत्या ताकावर राहण्याचा सल्ला द्यावा लागला.

क्षयात अतिसार हा बलवान् उपद्रव म्हणून चिकित्साहि त्या उपद्रवाला प्राधान्येंकरून केली औषधें पुढीलप्रमाणें २ दिवसाची दिलीं

चतुर्मुख ½—½ गुंजेच्या २ पुड्या मधात व कुटजारिष्ट १-१ तोळा + शुद्धोदक २ तोळे २ भाग करून सकाळीं, सायंकाळी, प्रथम पुडी मधात घेऊन त्यानंतर बाटलींतील १ भाग घेणें

या योजनेनें अतिसार कमी झाला. त्याजबरोबर जीभ पुष्कळ स्वच्छ झाली; तापहि कमी झाला परंतु खोकला मात्र वाढला तिसऱ्या दिवशीं अग्निमांद्य कमी व्हावें व शक्ति वाढावी म्हणून सुवर्णपर्पटी ½ गु चालू केली आणि आहाराकरितां मांसरस व भात सुरू केला खोकल्याकरिता द्राक्षारिष्ट जेवणानंतर दिलें ३ गुंज सुवर्णपर्पटी याप्रमाणें पोटात गेल्यावर रोगी स्वत· औषधाला दवाखान्यात येऊं लागला. कास होता म्हणून व शक्ति लवकर यावी म्हणून पुढे एलादिगुटिका आणि भृंगराजासव सुरू केलें त्यानें कास होता तोहि कमी झाला रोगी फिरावयास जाऊं लागल्यापासून त्याला सकाळीं "पूर्ण श्वसन" (deep breathing) हा विहार सांगण्यात आला होता मांसरस आहार शेवटपर्यंत चालूच होता

---

## (१२१) वातज योनिरोग

रोगी स्त्री, वय २१ वर्षें आर्तवदर्शन अगदीं अनियमित, अगदीं थोडें, पण रंग काळा नव्हता. ओटी पोट व कंबर दुखणे, ओटीपोटाला स्पर्शहि केला असतां तें दुखणें. झोंप मुळीच नाहीं शौचास पातळ ३-४ वेळा अग्निमांद्य ऋतुस्नात व्हावयास तीन

वर्षापूर्वीपासूनच सुरवात; म्हणजे फारच उशिरां व तेव्हापासूनच थोड्या प्रमाणात वरील तक्रारी स्त्रियाच्या दवाखान्यात बाईंना तपासले होतें. Curretting चा एकच उपाय सुचविला होता. परंतु रोग्याची तितकी तयारी नव्हती अंगात रक्तिमाहि कमी होता. एकंदर लक्षणे पाहता सर्व तक्रारी आर्तवदर्शन व्यवस्थितपणे झाल्यास कमी होतील असें वाटले. म्हणून बाईची उत्तरबस्ति घेण्याला तयारी आहे का म्हणून विचारले, बाईंना उठवतहि नव्हते व सारखे रवराच्या पिशवीनें शेकूनहि शूल कमी होत नव्हता म्हणून उत्तरबस्तीची परवानगी मिळाली उत्तरबस्ति अपत्यमार्गात बाह्य (vaginal) त्याचप्रमाणे गर्भाशयात अभ्यंतर (intra uterine) दोन्ही प्रकारचा द्यावयाचा होता

उत्तरबस्तीकरिता वातज योनिरोगावरील " नतवार्ताकिनीकुष्ठसैंधवामलरदारुभि. । तैलम् " ( वा. उ अ. ३४ ) हे निवडण्यात आले अपत्यपथांतील ( बाह्य ) उत्तरबस्ति देण्याकरिता मात्राबस्तीकरिता जी पिचकारी उपयोगात आणिली जाते ( glycerine syringe ) तीच घेण्यात आली. उत्तानाया शयनाया सम्यक् सकोच्य सक्थिनी ॥ या उत्तरबस्तीच्या विधानाने साधारण दोन तोळे तेल एका वेळेला दिले परंतु तेल लागलीच परत येऊं लागले म्हणून कापसाचा बोळा देऊन तेल बाहेर येणे बंद केले आणि पायाच्या पोटऱ्यापासून कंबर, पोट, इ सर्व भागाचे मालीश केलें अर्ध्या तासाने पुन्हा एक बस्ति देऊन मालीश केले व त्या दिवशीची चिकित्सा संपविली शरीरात रक्तिमा कमी असलेला त्याच वेळी विशेष नजरेला आला

रक्तस्थापन. आर्तवस्थापन आणि गर्भाशयाला बल्य म्हणून " गुडनागरमडूर-तिलांशान्मानत समान् । पिप्पलीद्विगुणान्दद्यात् " हा योग मधातून औषध म्हणून सुरू केला,'तसेच आर्तवस्थापन आणि गर्भाशयाला बल्य म्हणून " तैलमाषोत्तराहारा स्त्री " या सुप्रजाजनन शास्त्रातील सूत्राच्या अनुरोधानें उडदाचा वडा रोज सकाळी एक अग्निबलाप्रमाणे खावयास सांगितला पहिल्याच दिवसाच्या उत्तरबस्तीचा परिणाम असा झाला की, तीन दिवस जी झोंप नव्हती ती इतकी आली की, सध्याकाळपासून सबंध रात्रभर तर झोप व्यवस्थित लागलीच, पण दुसऱ्या दिवशीहि दिवसा मधून मधून झोप येत होती योनिशूलहि कमी झाला होता तीन दिवसाच्या उत्तरबस्तीने बाई माडीवर चढणेउतरणेहि नेहमीप्रमाणे करूं लागल्या अपत्यमार्गाचा अतर्भाग जो अति फिक्कट दिसत होता तो लाल दिसूं लागला आणि चवथ्या दिवशी बाई विटाळशी बसल्या म्हणून चार दिवस बस्तिविधान बद ठेवण्यात आले

ऋतुकाली उत्तरबस्तीचा चांगला उपयोग होतो म्हणून पाचव्या दिवशी पुन्हा बस्ति-विधानाला सुरवात केली दर वेळेला चार तोळे याप्रमाणे ८ तोळे तैल रोज उपयोगात आणीत असूं. तसेंच उत्तरबस्ति देण्याच्या विधीतहि फरक केला कारण तैलबस्ति देता देताच परत येई बस्ति दिल्यानंतर कुल्ल्यावर मारणे हा विधी करून पाहिला, तरी विशेष

उपयोग दिसला नाही अंथरुण तीनदा पायाकडून उचलणे हे, ज्या स्थितीत बस्ति दिला जात असे त्या स्थितीत, शक्य नव्हते तेव्हा ज्यायोगें स्नेह जास्त काळ अंतर्भागी राहील ( स्नेहोऽतिष्ठन्न कार्यकृत् ) असें विधान शोधून काढणें जरूर वाटत होते व ते शेवटी आम्हास सापडलें ते म्हणजे ज्याला Sim's position असे म्हणतात त्या स्थितीत बस्ति देणें हे होय ही स्थिति म्हणजे एक हात पाठीमागे ठेवून त्या कुशीवर निजणे व पाय किंचित् दुमडते करून घेणें ही होय या स्थितीत गर्भाशय पुढच्या बाजूला जातो आणि अपत्यमार्ग स्वत च उघडला जाऊन नलिकाकार स्थितीत उघडा राहू शकेल अशा परिस्थितीत येतो त्यायोगानें अपत्यमार्गात वातवृद्धि आपोआप होऊ शकते उत्तरबस्ति दिल्यानंतर ढोटानी कुल्ल्याला व अंगाला ताडन करणे ही विधाने वातवृद्धि करून स्नेह आत ठेवण्याकरिता दिलेली आहेत "न्युब्जाया वातो बलवान् स योनि पीडयति ।" (च शा अ ८ श्लो ६) या सूत्राप्रमाणे वर वर्णन केलेल्या स्थितीत बस्ति दिला असता स्नेह लवकर परत येणार नाही असे वाटलें आणि त्याप्रमाणे करून पाहता अर्धा अर्धा तासपर्यंत स्नेह परत येत नाही असेच आढळून आले. उताणे झाले की, स्नेह थोडा परत यावयास लागतो म्हणून बस्तिविधानातील आसन यापुढे आम्ही बदलले

आतापर्यंत अपत्यपथातच बस्ति दिले, परंतु गर्भाशयात बस्ति देणे जरूर वाटू लागले कारण शूल पूर्णपणें थांबला नव्हता परंतु तो थांबवायाचा म्हणजे चांगल्या यंत्राची जरूरी वाटत होती बाईला मूलबाळ झालेलें नव्हते तेव्हा त्रास न होता बस्तिविधान पार पडणे जरूर होते मनाजोगती जरी यंत्रें मिळाली नाहींत, तरी कामचलाऊ म्हणून पुढील यंत्रें विधानाकरिता घेतली कारण इतकीच उपकरणे तेव्हा मिळूं शकली (१) मात्राबस्तीची पिचकारी (२) १० नंबरचा रबर कथेटर (३) Sim's vaginal speculum ही सर्व चांगली उकळून घेतलीं हात स्वच्छ धुतले ( ही पूर्वतयारी प्रत्येक उत्तरबस्तीच्या वेळी करण्यात येत होतीच ) योनिवीक्षणयंत्र योनि-भागात प्रविष्ट केले परंतु रोगी जमिनीसरसा असल्याकारणाने अंतर्भाग दिसून पुढील क्रिया करणे शक्यच होईना ही शंका प्रथमच आली होती परंतु वेळी एखादी युक्ति सुचून काही कार्यभाग झाल्यास पाहावयाचा होता गरिबाच्या घरीदेखील हे विधान कॉट अगर बाजेवाचून करता आल्यास बरे होईल हा हेतु परंतु ते काही जवळ असलेल्या यंत्रानी शक्य झाले नाही तेव्हा त्या दिवशी बाह्य उत्तरबस्तिच देऊन दुसऱ्या दिवशी कॉट आणवून ( गर्भाशयात ) अंतर्बस्ति दिला अंतर्बस्तीला "उत्तानाया शयनाया" हेच आसन घेणे सोईचे झालें पार्श्वन्यूब्ज स्थितीत गर्भाशयद्वार (opening of cervix) पाठीच्या बाजूस फार असते त्यायोगें कथेटर घालणें कठीण पडते उताणें निजवून योनिवीक्षणयंत्र प्रविष्ट केलें असता गर्भाशयमुख अगदी समोर दिसते अर्थात् या आसनात योनिवीक्षणयंत्र पोटाकडील बाजूने (anterior wall of the vagina) अपत्यपथात घालावे लागते गर्भाशयमुखात कथेटर

घालून बस्ति द्यावा. कॅथेटर मात्राबस्तीच्या पिचकारीच्या नेत्रावर चढवावयास पाहिजे, आणि तो उच्छ्त्रसित करून निर्वात आणि तैलपूरित करावयास पाहिजे हें सांगणे नकोच.

येणेंप्रमाणें बाह्य उत्तरबस्ति आणि अंतरुत्तर बस्ति ही दोन्ही विधानें प्रथमच म्हणून बरीं साधलीं म्हणावयास हरकत नाहीं. रोग्यालाहि पुष्कळ आराम मिळाला.

---

## (१२२) स्नायुगत वात

रोगी स्त्री, वय १४ वर्षें, प्रकृति मध्यम पुष्ट (कृश नव्हे). रोगाचें स्वरूप—जागे-पणीं सतत हात व पाय चाळविल्याशिवाय रोग्यास राहवत नसे. रोगी दवाखान्यात आपल्या पायांनींच शेजारच्या खेड्याहून आला, पण दवाखान्यात त्याचे सारखे पदर सांवरणे, खांद्यास, तोंडास हात लावणें व डोक्यावर हात नेणें चालू होतें. उजव्या पायाच्या आंगठ्यानें रोगी जमिनीवर सारख्या रेघोट्या काढीत होता. जीभहि तोंडात सारखी चाळविली जात असे. हीं लक्षणे दिवसापेक्षां रात्रीं (शीतकाली) जास्त वाढत व सकाळी उठल्यावर रोग्याचे हातपाय थरथर कापत, सारखे झोक जात, त्याला आपला तोल संभाळता येत नसे.

ह्या रोग्याच्या कारणांविषयीं चौकशी करता रोग्याने पुढील माहिती सांगितली. वयाच्या सातव्या वर्षीं एक दिवस यात्रेत केळ्याचे शिकरण खूप खाल्ले. त्यानंतर हा रोग प्रथम उद्भवला. त्यावेळी रोगाचा जोर एवढा तीव्र असे कीं, सर्व हात, पाय, बोटें आखडून जात व बेशुद्धि येई. त्यावेळचे ते दुखणे सकेश्वराच्या पाल्याचा बाष्प-स्वेद १५ दिवस घेतल्याने गेलें. पुढें वयाच्या ११ व्या वर्षीं आंबरस खाल्यानतर पुन तोच विकार सुरू झाला. तो याच औषधालयातील उपचारानें बरा झाला. पुनः या वर्षीं उन्हाळ्याच्या अखेरीस आंबरस खाण्यात आला व पुन· पावसाळ्यात हातपाय थरथरू लागले व क्रमानें आजची स्थिति प्राप्त झाली

वरील हकीकतीवरून पुढील गोष्टी दिसून येतात. रोग्याच्या उपचयावरून त्याचा मास व मेदोधातु सारवान् दिसतो, पण तो तसा नाही. याचा मासमेदोगत अग्नि अबल असल्यामुळें त्वचेच्या ठिकाणी रोज स्वाभाविक घाम उत्पन्न होत नाही व कालाचे शैत्य यास बाधक होतें. ग्रीष्म ऋतु हा वाताच्या संचयाचा काल; त्यात केळ्याचे शिकरण व आंबरस या वानस्पतिक मासमेदप्रधान गुरु आहाराचे धातुस्थ पचन नीट न झाल्यामुळें होणाऱ्या वातप्रकोपाची भर पडून वर्षाकालीं त्याचा स्वाभाविक जोर वाढत असला पाहिजे.

गेल्या खेपेस या रोग्यास एकांगवीर १ गुंज + रास्ना २ गुंजा स्यानकाळीं मधात व महायोगराजगुग्गुळ २ गुंजा रात्रीं आल्याचा रस व मध यात सामुद्ग कालीं देण्यांत आला होता

या दोनहि औषधांत नाग, वंग, लोह, अभ्रक हीं भस्में असून त्यांचें मुख्य कार्य शरीरस्थ धातूंना बल देण्याचें आहे. एकांगवीरास असलेल्या त्रिकटु, निर्गुंडी, आले, शेवगा, कुष्ठ, कुचला इत्यादिंच्या भावना धातुगतपचन सुधारूनच वातनाशन करतात महायोगराजगुग्गुळाचें कार्य अग्निवृद्धि व आमपचन करून कोष्ठस्थित व धातुस्थित वात-कफ नाश करणें हें आहे यात वत्सकादिगणातील २४ औषधांपैकीं २० औषधें असून तीं वातकफ व मेदोदोषघ्न अशीं आहेत त्यात त्रिफला व गुग्गुल हीं औषधें मोठ्या प्रमाणात असून त्यांचेंहि कार्य अग्निवर्धक, सर्वधातुस्थितदोषनाशक व विशेषत: मेदो-दोषघ्न असें आहे

हीं औषधें याहि वेळीं सुरुवातीस देण्यात आलीं त्याचे कार्य लवकरच दृष्टोत्पत्तीस आलें. तथापि वातव्याधीच्या स्वभावानुसार त्याचा अवशेष शिल्लक राहूं लागला व त्याकरिता पुढील विचारानुसार स्वेदन औषधाची जोड दिली

वायु मेदसः स्नेहमादाय शिरास्नायुत्वमाप्नुयात् ।

या सुश्रुतवचनानुसार स्नायूंची उत्पत्ति मेदोधातूपासून असल्यामुळें गुरु आहार, अबल अग्नि व वातप्रकोपक काल या कारणत्रयीपासून मासमेदस्थित वातविकृति होऊन स्नायूंच्या ठिकाणीं स्तंभनकार्य (स्वेदनविपरीत कार्य) होणें स्वाभाविक आहे

कंप, संकोच, स्तंभ हे अतिस्तंभनापासून होणारे विकार आहेत (वाग्भट सूत्र अ १७-२०) व त्यावर स्वेदन हाच मुख्य उपचार आहे स्वेदनानें या विकारास उपशय होतो हें वर आलेंच आहे या दृष्टीनें एकांगवीरापेक्षा महावातविध्वंसाचे या विकारात विशेष चांगलें कार्य होणें शक्य आहे महावातविध्वंसात एकांगवीरातील बहुतेक द्रव्यें व भावना असून त्यात शुद्ध बचनाग या स्वेदल औषधाचें प्रमाण मोठें (जवळ जवळ $\frac{1}{6}$) आहे

याच उद्देशानें या रोग्यास पुढें महावातविध्वंसरस २ गुं देण्यात आला व त्यानें आपला गुण त्वरित दाखविला झोक जाणें, थरथर, अंग जड पडणें, चमक निघणें इत्यादि अवशिष्ट लक्षणे ४-५ दिवसात दूर झालीं व रोगी पूर्ण बरा झाला.

कंप विकारात सहचरतैल, महायोगराजगुग्गुळ व महावातविध्वंस याच्या अवस्था भिन्न आहेत केवळ वातविकृति असून त्यानीं स्नायूंच्या ठिकाणी शोष, स्तंभ, आक्षेप उत्पन्न केले असतील व त्यात आम व कफ याचा विशेष ससर्ग नसेल व स्नेहनाची आव-श्यकता असेल त्या ठिकाणीं सहचर तैलच देणे योग्य आहे. अग्निमांद्य व धातुस्थित

आम असेल तर महायोगराजगुग्गुळ व स्पष्ट कफसंसर्ग असून स्वेदनाची आवश्यकता असेल तेथें महावातविध्वंसच देणे योग्य होईल

रोग्याचे दारिद्र्य व थंडीपासून होणारी बाधा लक्षात घेऊन या वातरोगाचा बीमोड होण्यास येत्या हेमंतात त्यास भल्लातक रसायन अगर लशुन रसायन घेण्यास सांगितलें आहे

---

# (१२३) जुनाट गजकर्ण

रोगी पुरुष, पद्मसाळी, वय ३० वर्षे ६ वर्षांपूर्वी जांघाड्यात खाजण्यास प्रारंभ झाला आतापर्यंत सर्व मांड्या, पोट, छाती व मानेपर्यंत पाठ गजकर्णानें व्यापली मुख्य लक्षण---भयंकर खाज त्वचेचा मूळचा रंग काळाच असल्यामुळे विवर्णता लक्षात येण्यासारखी नव्हती पण खाजवून त्वचा ओरखडली जाई व तेथें कोरड्या खपल्या धरत रक्त बहुधा येत नसेच. त्वचेस रूक्षपणा आलेला होता त्वचेचे एकंदर स्वरूप त्वगा(रसा)श्रित वातकफात्मक दुष्टिबोधक असें होते

विकाराची व्याप्ति व जुनाटपणा ही लक्षांत घेऊन रसावर कार्य करणारी उत्कट गुणाची द्रव्यें वापरणे आवश्यक होतें. सबब कोष्ठस्थ अग्नि व रसस्थ अग्नि यांचे दीपन करून रस--मल जो कफ तो शुद्ध करण्याकरिता बिबा व हिरडा देण्यात आला व त्याच-बरोबर कुष्ठ विकारातील कृमींचा व कफाचा नाश व्हावा म्हणून वावडिंग व बावची यांची त्यास जोड देण्यात आली

तिल व गूळ ही वास्तविक कुष्ठास अपथ्य अशी द्रव्यें आहेत त्याच्या शीलनानें अभिष्यंद वाढून रसरक्ताची दुष्टि होते, तथापि त्यांचे सूक्ष्मस्रोतोगामित्व व रसगामित्व हे गुण रसधातूवर औषधाचे झटकन कार्य होण्यास फार उपयोगी पडतात शिवाय बिब्यासारख्या तीव्र औषधाचे दोषहि तीळ, गूळ वा तूप याच्या संयोगाने नष्ट होऊन त्याचे उत्कृष्ट रसायनकार्य घडतें. (वाग्भट उत्तरस्थान अ. ३९ ८०)

याप्रमाणे बिबा*+हिरडा+वावडिंग+बावची + तीळ+गूळ यांचे दीड मासा मिश्रण दर भोजनाचे वेळी समानकालीं व व्यानकाली तुपांत देण्यास सुरवात केली

---

*बिबा, हिरडे, तीळ व गूळ यांचें मिश्रण तिलादि मोदक या नावानें प्रसिद्ध आहे

पथ्यातिलगुडैः पिंडी कुष्ठं सारुष्करैर्जयेत ।
गुडारुष्करजंतुघ्नसोमराजी कृताऽथवा ॥ —वा. चि १९।४७.

कुष्ठविकारांत केवळ त्वचेस औषधें लावून भागत नाहीं इतकेंच नव्हे, तर पोटातून कुष्ठदोषशामक औषधे न घेता फक्त कुष्ठनाशक कडक लेपच लावले तर त्यानी दोषाचा उत्क्लेश होऊन कुष्ठ उलट वाढतच जाते जुनाट कुष्ठात मलरूप दोष धातूंत इतके लीन व बद्धमूल झालेले असतात की, त्याना तेथून युक्तीने अलग करण्याचे कार्य केवळ पोटात दिलेल्या औषधाने होत नाही त्याकरिता कोष्ठस्थ दोष जिंकले गेल्यावर (अगर त्वक्स्थ दोष जास्त त्रासदायक असतील तर ते जिंकले जात असता) त्वचेवर स्थानिक चिकित्सा करावी लागते.

ही स्थानिक उपचारपद्धति अशी —रोज प्रथम विकृत रूक्ष त्वचेस तेल लावावयाचे (पोटात चिवा घेत असता तिलतैलाच्या अभ्यंगाचा निषेध असल्यामुळे प्रस्तुत रोग्यास खोबरेल तेल लावण्यास सागितले होते) व थोडया वेळाने ते तेल चागले मुरून त्वचा नरम झाली की त्यावर कुष्ठनाशक चूर्ण ताकात वाटून लावावयाची अम्लरसाने खाज लवकर कमी होते व तक्र हे वातकफनाशक असून रसधातूंतील पचन सुधारण्यास मदत करणाऱ्यापैकी प्रमुख आहे. ताकाच्या कषायरसाने तेलकटपणा निघून जात असल्यामुळे नंतर स्नानाचे वेळी साबण वगैरे लावण्याची गरज राहात नाही

विकार जुनाट म्हणून लेपाकरिता विडग, वांवची व कपिला या १–१ मासा कुष्ठनाशक वनस्पतीबरोबर शुद्ध मनशीळ २ गुजा ताकात लावण्याकरिता देण्यात आला होता

वरील त्वगत रसशुद्धीच्या कार्यास मदत व्हावी व चिकित्साकाल शरद् ऋतु आहे अशा वेळी चालू असलेल्या चिव्याच्या सेवनाने रक्तप्रकोप न व्हावा म्हणून रसरक्तगतज्वर* योगमिश्रण २ मासे गेल्या दहा दिवसापासून रोज सकाळी पाण्याबरोबर पोटात घेण्यास दिले आहे

या उपचाराने दीड महिन्यात निम्मा अधिक विकार नष्ट झाला असून रोग्यास आपण रोगमुक्त होणार अशी खात्री वाटत आहे

---

## (१२४) स्तनरोग

रोगी स्त्री, वय १८, जात महार अत्यत दरिद्री, त्यामुळे अस्वच्छ राहणी अगावर १ वर्षाचे पिते मूल, दूध भरपूर असल्यामुळे मुलाची प्रकृति सुदृढ

प्रथम दोन्ही स्तनावर बारीक, कागदासारख्या पातळ पापुद्र्याच्या पाढऱ्या व पिवळया रगाच्या पुळया उठल्या व नतर त्या चिघळून त्याचे व्रण झाले व त्यांतून सारखी लस

* इद्रजव, पटोल, कुटकी, सारिवा, मुस्ता, पाठा याचे चूर्ण

वाहूं लागली. अशा स्थितीत एक महिना लोटला व प्रत्येक स्तनावर -।।।- इंच खोल अशा २-२ जखमा निर्माण झाल्या.

रोगी चिकित्सेसाठी आला त्या वेळी वरील स्थितीशिवाय दोनहि स्तनात ठणका हें लक्षण विशेष त्रासदायक होते

स्तन्य (दूध) हे रसधातूचा उपधातु, तो रसधातु आम असेल व त्यामुळें स्तन्य दुष्ट होऊन पीटिका, व्रण उत्पन्न झाले असतील तर त्या आमाचें पचन व्हावें व वेदना-रूपानें लक्षित होणाऱ्या वाताचेंहि शमन व्हावे या उद्देशानें **योगराजगुग्गुळ** २–२ गुंजा सकाळ–सायंकाळ मधांतून देण्यात आला गुग्गुळ व मध हे रस, रक्त, मास या धातूं-तील व्रणानुकूल दुष्टि कमी करतील अशी अपेक्षा होती

वरील सर्व योजनेचा परिणाम त्वरित घडून आला, पण तो अगदी उलटा—व्याधि वाढविणारा असा झाला. चारपांच दिवसांत स्तनावर भराभर आणखी पीटिका उठूं लागल्या व त्यामुळें साहजिकच ठणकाहि वाढला.

या अनुपशयामुळें या पीटिका व तज्जन्य वेदना यात रसस्थित आमदोष हा कारण नसून रसरक्ताश्रित पित्तदुष्टि हीच कारण आहे, व पाचन उपचारामुळें त्या पित्ताची वृद्धि होऊन पीटिका–वेदना–व्रण वाढले हे लक्षात आलें.

तावडतोब **योगराजगुग्गुळ बंद करून रक्तधातुगतज्वरयोग** (कडू पडवळीचें पंचाग, अनंतमूळ, नागरमोथा, पहाडमूळ, कुटकी) + **मंजिष्ठा** हें २-२ मासे चूर्ण पाण्याबरोबर देण्यात आलें या योगात रसरक्ताश्रित पित्तनाशक अशा कडु पडवळ, कुटकी या औषधाबरोबरच अनंतमूळ, नागरमोथें, पहाडमूळ यासारखी रक्ताश्रित पित्तावर शामक व व्रणरोपक अशी औषधें असल्यामुळे क्रमानें अपेक्षित कार्य घडून आलें; उत्पन्न झालेल्या पीटिकांचा पाक न होतांच त्या दबल्या, त्यामुळें ठणका अजिबात कमी झाला व व्रणहि लवकर भरून आले.

या व्रणास प्रथमपासून शोधनतैलच लावण्यात आलें. व्रणावर कापूस व कापडाची पट्टी बाधल्यास व्रण जास्त चिघळत व आग होई म्हणून व्रण शोधनतैल लावून न बाधता ते मोकळेंच ठेवण्यात आले होते रोग्यास व्रणी मनुष्याचे पथ्य सागण्यांत आले होते.

स्तनस्थ मास व मेद या धातूंच्या आश्रयाने दोषांचा प्रकोप होऊनहि असे स्तनविकार निर्माण होतात. तेथें त्या दृष्याचा विचार करून केलेली चिकित्सा अशीच शीघ्र व निश्चित फलदायी होते

---

# (१२५) विपादिका कुष्ठ

रोगी स्त्री, वय वर्षे १९, ब्राह्मण सात महिन्यापासून दोन्ही तळहाताना व तळपायाना चिरण्या पडून त्यातून रक्त वाहात असे व खाज सुटून काही भागात पू होई सर्व तळवे सुजलेले, त्या ठिकाणीं स्पर्श सहन न होणें व ठणका ही लक्षणें अत्यंत त्रासदायक

वलवान् उपद्रवाची प्रथम चिकित्सा व पाकोन्मुख स्थानसश्रित दोषाचें पाचन करून व्रणमार्गानें शोधन करण्याच्या उद्देशानें प्रथम तळहात व तळपाय याना कणकेची पोटिसे बाधण्यात आली त्यात वेदना लवकर कमी व्हावी म्हणून पारसिक यवानी ४ गुजा घातला होता शिवाय त्याच कार्यास मदत व्हावी म्हणून योगराजगुग्गुळ २ गुजा पोटातून दिला होता या योजनेनें ५–६ दिवसात व्रणाचे शोधन होऊन तळहातापायाची सूज ओसरली, ठणका बराच कमी झाला व पुढे लवकरच चालता येऊं लागलें

कण्डूर्विपूयकश्चैव कुष्ठे शोणितसश्रिते ।

तथापि तळहातापायास चिरण्या पडणे व त्यातून रक्त वाहणें व थोडा पू होणें हे चालूच होते त्याकरिता रक्तधात्वाश्रित कुष्ठाचे दोषनाशक औषध पोटात द्यावयास हवे होते म्हणून रक्तगतज्वरयोग (पटोलं सारिवा मुस्ता पाठा कटुकरोहिणी) १ मासा + इद्रयव ४ गुजा + (सधानकार्य वाढावे व रक्त वाहणे थांबावे म्हणून) लाख २ गुजा + राळ २ गुजा हे मिश्रण पोटातून सामुद्गकाली मधात देण्यांत आले. सामुद्गकालीं (अर्धे औषध जेवणापूर्वी व अर्धे जेवणानंतर) औषध देण्यात औषधाचे कार्य धातूवर व्हावे हा होता कोष्ठस्थ दोषाचें पचन करून अनुलोमन व्हावें व धातुबलहि वाढावे याकरिता आरोग्यवर्धिनीरस* २ गुजा अपानकाली ऊन पाण्याबरोबर देण्यात आला होता

या औषधयोजनेचा परिणाम झाला पण साधारणच. तसें होण्याचे कारण दोष विशेषतः कोष्ठस्थित नसून रक्तस्थित होते व बलवान् होते, केवळ शामक उपायानी शमन पावण्यासारखे नव्हते. सबब तळहातापायास जळवा लावून रक्तस्रुति करण्यांत आली. दोषपूर्ण असें बरेंच रक्त निघून गेल्यावर वरील रक्तगतज्वरयोगमिश्रण व आरोग्यवर्धिनी या योजनेचा उत्कृष्ट उपयोग झाला

स्थानिक शामक उपाय म्हणून तळहातापायास विपादिका मलम (जीवन्त्यादि मलम, अष्टागहृदय कुष्ठचिकित्सा श्लोक ७७।७८) लावण्यात येत होते इंद्रजवानें सिद्ध केलेल्या तेलाचा खाज कमी होण्यास विशेष उपयोग झाला

---

*आरोग्यवर्धिनी रसः—कुटकी ८ भाग, चित्रक ४, गुग्गुळ ४, शिलाजतु ३, त्रिफला २, पारा १, गधक १, लोहभस्म १ अभ्रकभस्म १, ताम्रभस्म १ कडुनिबाच्या पाल्याच्या रसाच्या भावना

# (१२६) जुनाट पोटशूळ

रोगी स्त्री, वय अजमासे ३२ वर्षें. गेल्या ५-६ वर्षांपासून पोटात दुखण्याची तक्रार व हळूहळू उत्पन्न होणारे कार्श्य डाळ, पुरण इत्यादि वातुळ पदार्थ खाल्ल्यावर हा पोटशूल वाढत असे व पोटास फुगवटी येत असे काही शेकणे वगैरेनी शूल तात्पुरता कमी होत असे. अग्निमांद्यहि बरेच दिवसापासून वाटत असे आध्मान वगैरे उत्पन्न झालेलें असल्यास कृशार्तत्व, घबराट, आंत्र व कोष्ठाची स्तब्धता इत्यादि लक्षणानी रोगी पीडित होता.

या सर्व लक्षणाचे मूळ कारण उपशयानुपशयानें अपानदुष्टि हे ठरवून, बरेच दिवसाच्या या विकृतीमुळें उत्पन्न झालेली स्तब्धता नाहीशी करण्यास **वातगजांकुश + शंखवटी + सौवर्चल** या औषधीचा एकत्र संयोग करून दोन वेळ अपानकाली गरम पाण्यात घेण्यास दिला. सदर योग बारा-पंधरा दिवस देऊनहि त्याचा विशेष म्हणण्यासारखा परिणाम दिसेना तात्पुरती वेदना कमी व्हावयाची, पण स्तब्धता व आध्मान ही काही कमी वाटेनात. म्हणून त्यातच **वज्रवटी** सवंध दिवसास ½ गुंज प्रमाणानें वरील अनुपानात दिली त्यानें मात्र पोटाचा गुवारा थोडा कमी वाटू लागला पण मधून मधून आहाराचे अपथ्य होई व थोडयाशा कारणानीसुद्धा पुन्हा आध्मान वाटू लागे या आध्मानाबरोबर थोडासा शूलहि होई. या अवस्थेत कृमीची शंका आली व म्हणून **वज्रवटी + सौवर्चल** एवढेंच औषध चालू ठेवून शिवाय **कपिलाचूर्ण** रात्री गरम पाण्यात घेण्यास दिले. हे पाचसहा दिवस दिले, पण कृमि वगैरे पडले नाहीत पण यापुढें थोडासा निराळा विचार करून त्याच्या आंत्र वगैरेची रूक्षता विचारात घेऊन व त्याचप्रमाणे त्याच्या व्याधीच्या दीर्घ काळाचाहि विचार करून रोगी स्नेहनार्ह ठरविला व वरील औषधीयोजना बंद करून केवळ **शंखवटी** दोन वेळ अपानकाली तुपात घेण्यास दिली व शिवाय जेवणा-अगोदर १५ मिनिटें ( सकाळ-सायंकाळ ) २ तोळे तूप पातळ करून पिण्यास सांगितले याप्रमाणे ५-६ दिवसात शूल, आध्मान ही लक्षणे नाहीशी होऊन शौचासहि साफ होऊं लागले व आपोआप भुकेची प्रवृत्ति होऊं लागली वरील डाळ वगैरेचें अपथ्य वर्ज्यच ठेविले होते ही योजना आणखी १५ दिवस ठेविली त्याच वेळी मासिकरजोदर्शनाच्या पाळीची वेळ आल्यानें ही योजना थांबवून **प्रतापलंकेश्वर** १-१ गुंज २ पुड्या अपानकाली तुपात दिल्या या वेळची पाळी व्यवस्थित झाला कंबर किंवा पोट दुखले नाही. पाळी पूर्ण झाल्यावर पाचव्या दिवसापासून पूर्ववत् औषधियोजना ठेवून पुढें **शंखवटी** बंद करून केवळ **घृतपानच** चालू ठेवले व तेंहि आणखी ७ दिवसानी बंद केले याप्रमाणे दीर्घकालपर्यंत टिकलेला लक्षणसमुच्चय नाहीसा झाला अर्थात् त्याला उपायहि बरेच करावे लागले, सुरुवातीपासून शूलघ्न व आध्माननाशक चिकित्सा झाली खरी, पण तीच चिकित्सा स्नेहसंयुक्त असती तर सर्व लक्षणे यापूर्वीच कमी झाली

असतां स्नेहनाची कल्पना उशिरा का होईना पण विचारात आल्यावरोबर उपयोगात आणिली व त्याचा इष्ट असाच परिणाम झाला.

या सर्व लक्षणाचे मूळ कारण अपानप्रकोप व आन्त्राची रूक्षता हे होय. ही रूक्षता नाहींशी होण्यास, त्याचप्रमाणें अग्निमांद्य नाहीसें होण्यास, बद्धविट्कत्व उत्पन्न करणाऱ्या तैलापेक्षा घृत हेंच जास्त उपयुक्त ठरलें. तेलाचा पोटावरुन स्नेहनाकरिता उपयोग चागला झाला असता

रोग्याचीं लक्षणे नाहींशी होऊन २ महिने झाले त्यात दुसऱ्यादाहि मासिकस्राव त्रासाशिवाय झाला सध्या आध्मान नाही, घबराट नाही, शूल नाही, काही नाही. एवढेंच काय पण वरील प्रकारची लक्षणे असता त्या रोग्याच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली डोळ्याची रुक्षता व आग ही सुद्धा नाहीशी झाली अर्थात हें रौक्ष्यनाशनाचें कार्य आन्त्रस्नेहनाचा परिणाम म्हणून असावें सध्या रोग्यास पथ्य नसूनसुद्धा कोणतेच लक्षण उत्पन्न झालेलें नाहीं व बलहि चागलेंच वाढत आहे

याप्रमाणें जुनाट वातभूयिष्ठविकृतीत केवळ वातघ्न किंवा शूलघ्न अशा रूक्ष वगैरे चूर्णापेक्षा स्नेह हा चिकित्सेत उपयोजिला तर तो उत्तम कार्यकारी होईल

याप्रमाणे ज्वरगुल्मादि जीर्णविकारात स्नेहनाचा उपयोग सागितला, त्यात तरी मुख्य हेतु हाच की, जेवढे जेवढे जीर्ण व्याधि तेवढे तेवढे अपतर्पणयुक्त, व अपतर्पण म्हटलें म्हणजे तेज, वायु व आकाश या महाभूताची वाढ तेजवायुआकाशवृद्धि=वातपित्तवृद्धि अशा वातपित्ताच्या वृद्धीत दोहींनाहि सामान्य शामक असें जें घृत ते उपयोगात आणावें मात्र अग्निबलाचा विचार करावा

---

## (१२७) कफभूयिष्ठ चर्मकील

चर्मकील ( चामखीळ ) या शब्दाचा अर्थ, चर्म म्हणजे कातडी, तिच्यावर होणारा कील म्हणजे खिळा त्याच्या आकाराची वाढ होय ह्या व्याधीला अगर लक्षणाला सर्व ग्रंथकर्त्यांनीं अर्शप्रकरणात घातलें आहे. यास कारण अर्श व चर्मकील यांत कीलत्वसादृश्य आहे अर्श शब्दाची " अरिवत् प्राणान् हिनस्तीति अर्श " ही निरुक्ति गुदवलयाधिष्ठानभूत अर्शाची आहे चर्मकील हा प्राणघातक होत नसून विकृत्युत्पादक होतो विकृति त्वचेच्या ठिकाणी असल्याने प्राकृतवर्णाभाव होऊन विकृतवर्ण येतो व कील दिसतात त्यामुळे विरूपता येते

वाग्भटाचार्यांनीं चर्मकीलाची संप्राप्ति पुढीलप्रमाणे दिली आहे. " व्यानो गृहीत्वा श्लेष्माणं करोत्यर्शः त्वचो बहिः । कीलोपमं स्थिरखरं चर्मकीलं तु तद्विदुः ।। ( वा. अर्शोनिदान. ) माधवनिदानकारांनींहि वरीलप्रमाणे अर्शोनिदानातच चर्मकीलाचा अंतर्भाव केला आहे. सुश्रुताचार्यांनीहि चर्मकीलनिदान अर्शोनिदानात सांगितले आहे त्यांतहि संप्राप्तीचा भावार्थ वरीलप्रमाणेच आहे. " व्यानस्तु प्रकुपितः श्लेष्माण परिगृह्य बहिः स्थिराणि कीलवदर्शासि निर्वर्तयति तानि चर्मकीलान्यर्शासीत्याचक्षते ।" (सुश्रुत. नि. अ २ )

या निरनिराळ्या ग्रंथातून चर्मकीलाची संप्राप्ति जरी सांगितलेली असली, तरी त्याचे कारण व चिकित्सा ही विशेष कोठेंहि सांगितली नाही याला कारणहि तसेंच आहे. ते म्हणजे गुदज अर्श, नासार्श, कर्णार्श किंवा त्वगर्श ( चर्मकील ) या सर्वांची कारणे व चिकित्सा काही प्रमाणात एकाच स्वरूपाची असते. स्थानें थोडीं निराळी गुदज अर्शात अपानदुष्टि, नासार्शात प्राणदुष्टि तर त्वगर्शात(चर्मकीलात)व्यानदुष्टि हे कारण सांगितले आहे. हे व अशाच स्वरूपाचे आणखी थोडेसे फरक लक्षात घेऊन चिकित्सा कठीण जात नाही. अपानदुष्टिजन्य गुदार्शावर अपानकाली क्षार इत्यादि औषधें द्यावी लागतील, नासार्शावर स्वप्नकाली क्षार वगैरे द्यावे लागतील व चर्मकीलावर व्यानकालीं वरील प्रकारची औषधें देता येतील. याप्रमाणेच बाकीच्या अर्शांचाहि विचार करावयाचा असे साधर्म्य असूनसुद्धा वरील प्रकारच्या निरनिराळ्या अर्शात साध्यासाध्यत्वाच्या दृष्टीनें फरक कां पडावा ? त्यास कारण असे की, गुद हें मर्म असल्यामुळें क्षार वगैरे औषधाचा उपयोग त्या ठिकाणी सहजासहजी करता येत नाही. नासार्शात ते गुदजार्शा-पेक्षा जास्त शक्य व चर्मकीलात तर ते क्षारकर्म जास्त शक्य आहे. गुदजार्शात अपानवायू-बरोबरच सर्व वायूंची दुष्टि होते. नासार्शात प्राणाची दुष्टी असते, पण चर्मकीलात व्यानाची दुष्टी असते. वायूच्या योगाने चर्मकीलात गुदजार्शाप्रमाणेच तोद, पारुष्य हीं लक्षणें आहेत. पित्तभूयिष्ठ चर्मकीलात काळसर तांबुसपणा हे लक्षण आहे व कफभूयिष्ठ चर्मकीलात स्थिरता, खरता व सवर्णता ही लक्षणे सांगितली आहेत

व्यानवायूच्या योगानें रसस्थित दोषांना ग्रथितत्व येते व ते ग्रथितत्व कीलरूपानें त्वचेवर जाणवूं लागतें त्यास चर्मकील म्हणतात. ह्याच संप्राप्तीचा उपयोग आपणास चर्मकील चिकित्सा करताना करावयाचा असतो

चर्मकीलाच्या चिकित्सेत दोन भाग पडतात अंतर व बाह्य. अंतर उपाय व्यानकाली म्हणजे दुपारच्या जेवणानंतर करावयास पाहिजेत, तर ते जास्त कार्यकारी होतील. बाह्य क्षारादि प्रतिसारण करावयास अमुकच काल पाहिजे असें जरी नाहीत, तरी तें क्षारप्रतिसारण चर्मकील शिथिलीकरणाकरिता स्वेदपूर्वक व्हावे

रोगी स्त्री, वय २३ वर्षे या रोग्याच्या उजव्या हातावर १५-२० चामखीळ जवळ जवळ १।। वर्षापासून होते. चामखीळ स्पर्शाला व दिसावयासहि गुळगुळीत व कठीण होते तसेच त्यांत सवर्णताहि होती हा कफभूयिष्ठ चर्मकीलाचा रोगी होता

चिकित्सा.---कफभूयिष्ठ त्वग्दोषावर उपयोगी पडणारा व त्यांतहि थोडासा क्षरण धर्माचा असा वंगकल्प सुवर्णराजवंगेश्वर ¼ गुंज + त्रिफळाचूर्ण ( रसमासशुद्धी-करिता) २ गुंजा + यवक्षार (त्वक्स्थित कफभूयिष्ठ स्कन्न दोषाचें विलयन करण्याकरता) २ गुंजा प्रमाणात घेऊन एकत्र खलून त्याच्या २ पुड्या करून त्या २ वेळ (दुपारी जेवणानंतर व्यानकालीं व रात्री जेवणानंतर कफभूयिष्ठ दोषावर कार्य होण्यास उदान-काली) मधातून घेण्यासाठी या रोग्यास दिल्या. तसेंच सकाळी (कफकालीं) गोमूत्र पोटात घेण्यास सांगितले तसेच बाहेरुन पिलूचा पाला वाटून तो लावण्यास सांगितला याप्रमाणे सात दिवस करावयास सांगितलें त्याच्यायोगाने थोडेसे मार्दव उत्पन्न झाले. परंतु रोगी बाहेर गावचा असल्याने गोमूत्र व पिलूशिवाय बाकीची औषधें तो सतत घेऊं शकला नाही १ महिन्यानी पूर्वीच्याच औषधाचा उपशय पाहून वरील योगच पुन्हा दिला याचा परिणाम फारच लवकर होऊन आणखी १५ दिवसातच ते चर्मकील जवळ जवळ नाहीसे झाले व पुढे वंगेश्वरादि औषधे बंद करून नुसते गोमूत्र व पिलूचा लेप एवढाच उपक्रम चालू होता आणखी एक महिन्यात चर्मकील अजिबात नाहीसें झाले.

चर्मकीलावर काही ठिकाणी घोड्याच्या केसाला एखादा क्षार लावून तो बांधतात व त्याने तो झरुन जातो एखादाच चामखीळ असला तर त्यावर हा उपाय करिता येईल आरोग्यवर्धिनीचा सुद्धा यात उपयोग झाला असता. वंगाचे कल्प हे सामा-न्यत: कफभूयिष्ठ दोषावर उपयोगी पडतात कफभूयिष्ठ कुष्ठ, कृमि, विद्रधि, गुल्म इ. विकारात वंगाचा उपयोग चांगलाच होतो विशेषत नवट विकारापेक्षा जुनाट विकृतीत वंगाचा चांगलाच उपयोग होतो.

---

# [ १२८ ] शराविका व्रणचिकित्सा

आयुर्वेदीय पद्धतीने व्रणचिकित्सा करण्याची व्यवस्था आयुर्वेद विद्यालय संस्थेने या औषधालयात ठेविली असल्यामुळें विविध प्रकारचे व्रणी या औषधालयात उपचारा-करिता नेहमी येतात त्यावर वनस्पतीच्या काढ्यानीं जखमा धुणे, त्यावर शोधन रोपण तेले व मलमें लावणे, व्रणातील दोषानुसार त्यावर गाढ, शिथिल वा सम बंध बांधणे इत्यादि शास्त्रोक्त उपचार करण्यात येतात तसेंच जखम होण्यापूर्वी येणारी पिकूं लागलेली सूज लेपानी व पोटात योगराजगुग्गुळ देऊन पिकवून तिचे पाटन करण्यात येते व्रणशोथाचा पाक टाळणे शक्य असेल तर जळवा लावून त्या ठिकाणचे रक्त काढण्यात येते व पोटात चंद्रकला देऊन रक्तस्थपित्ताचा विदाह थांबविण्यात येतो जखमा खोल नळीसारख्या असल्यास त्यात औषधांत भिजविलेल्या वाती घालून त्या स्वच्छ राखण्यात येतात व त्यामुळे त्या लवकर व व्यवस्थित आत घाण न राहता भरून येतात

या व्रणापैकीं कांही व्रण फार लवकर भरतात. इतकेच नव्हे, तर क्वचित् त्यांतील मांसवृद्धि त्वचेच्या सपाटीपेक्षाहि वर उचलून येते. अशा व्रणावर क्षार, क्षारतेल, कासीस किंवा व्रणांतील ही अस्वाभाविक मासवृद्धि नष्ट करण्याकरिता मुद्दाम तयार केलेलें अवसादनघृत लावण्यात येते. काही व्रण चांगले स्वच्छ राहून सुद्धां लवकर भरून येत नाहीत असें आढळून येतें. अशा ठिकाणीं व्रणमासाचे पोषण करून मांसवृद्धि करील असें व्रणोत्सादनघृत लावले की, ते व्रण भराभर वर येत असलेले दिसूं लागतात

निजव्रणाचे दोष केवळ त्या स्थानापुरतेच असत नाहीत. म्हणून बाह्योपचारावरोबरोबरच लंघन, कोष्ठशुद्धि, पथ्याहार व व्रणाच्या अवस्थेनुसार पोटांत औषधें दिलीं जातात.

येथें येणाऱ्या काही रोग्याच्या व्रणाचें एक विविक्षित स्वरूप आढळते. व्रणाच्या कडा उच असून मधला भाग परळासारखा बराच खोलगट असतो एकाजवळ दुसरा असे सुमारे ८-१० व्रण एकत्र असतात क्वचित् स्वतंत्र असा एखादा दुसरा व्रणहि आढळतो सर्वाचे स्थान बहुधा मासल व मेदोघटित असा व शरीराचा लोंबलेला किंवा जमिनीजवळचा अवयव हें असतें मनगटावरचा हाताचा भाग अगर तळहात, तसेंच घोट्याच्या वरचा पायाचा भाग अगर पाऊल या ठिकाणी ही विकृति विशेषतः सापडते. इतरत्र नसते असें नाही. एका बाईच्या पायावर असे व्रण असून गालावरहि असाच एक व्रण होता. लहान दोन वर्षाच्या मुलापासून ६० वर्षाच्या वृद्धापर्यंत सर्व वयाचे दरिद्री वा सुखवस्तु स्त्रीपुरुषाना असे व्रण झालेले दिसून आले हे व्रण ओलसर असून व्रणाचें सर्व मास नरम झालेले असे दिसते प्रत्येक व्रणाचा व्यास सुमारे ½ ते ¾ इंच असावा.

वैद्यकीय ग्रंथात वर्णिलेल्या प्रमेहानंतर होणाऱ्या पीटिका व व्रणांपैकी शराविका पीटिका व व्रणाशी हे वर्णन बरेचसे जमते त्याच ठिकाणी विना प्रमेहमप्येते जायन्ते दुष्टमेदस. । प्रमेहविकार नसतानाहि शरीरांतील मेदधातु दुष्ट झाला म्हणजे अशा प्रकारच्या पीटिका व व्रण होतात असे सागितले आहे प्रमेहात कफप्रधान व मासमेदोदूषक अशा आहारविहारानी मेदघटित वृक्क ( कफमेदःप्रसादात् वृक्कौ ) बिघडतात व मलरूप बनलेले कफ व रसमासमेद धातु हे मूत्ररूपानें बाहेर पडतात. या मलाची निर्मिति दिवसेंदिवस वाढत जाऊन जे मलमूत्रमार्गाने सपूर्णतः बाहेर जाऊं शकत नाहीत, ते त्या त्या धातूंतच संचित होऊन राहतात व पीटिकाव्रणरूपाने व्यक्त होतात.

वरील प्रमेहविरहित विकारातहि धातुदुष्टि अशाच प्रकारची असते त्यात अशा प्रकारची वृक्कदुष्टि नसते, एवढाच काय तो फरक! रस, मास, मेद या धातूंतील अग्नि अवल झाल्यामुळे धातुगत पचन बिघडते व त्यांतील सारवान् धातु व मलरूप भाग चांगले अलग केले जात नाहीत. त्या सचित मलामुळे धातु शिथिल बनून सडूं लागतात व व्रणरूप धारण करतात ते मल स्वभावतः गुरु असल्यामुळे बहुधा शरीराच्या अधोभागांत संचित होतात.

अशा व्रणसमुच्चयावर देखील शोधन तेलाचे कार्य होत असलेले दिसून येते. तथापि ते त्याचे पूर्ण औषध होऊं शकत नाही या विकारात धातुगत अग्निबल वाढवून तेथे संचित झालेल्या मलांना धातूपासून अलग करून मलमार्गानें बाहेर काढून टाकणारें व कूज थांबविणारें असें औषध पोटात घेणे आवश्यक असते त्रिफलाचूर्ण येथे उपयोगी पडेल पण त्याचे कार्य फार सावकाश होणार व शिवाय अशा विकृतीकरिता बरेच रोज इतकी पूड तोंड वाकडे करून खाणें रोग्यास पसत नसते आरोग्यवर्धिनीचे कार्य या विकारात बरें होते. पण त्यातील सर्व घटकाची येथे आवश्यकता नसते, त्यामुळे तिचा उपयोग करीत राहणे महाग पडते

या विकारात आवश्यक असलेली सर्व सुधारणा शुद्ध तुत्थ (मोरचूद) व बाळहरीतकी याच्या योगाने फार चागल्या रीतीने घडून येते शिवाय याचे घेण्याचे प्रमाणहि अल्प (२ गुंजा) असते, त्यामुळे रोगी औषध घेण्यास कटाळत नाही तुत्थ हा ताम्राचा गधकयुक्त क्षार असून कषायरसात्मक असल्यामुळे त्याचे लेखनकार्य शरीरस्थ घटकास बिलकूल धक्का न देता होते. त्याने यकृत्कार्य सुधरून कोष्ठस्थ व धातुस्थ पचनातील शिथिलता नष्ट होते व सारवान् मांस व मेदोधातूची निर्मिति होण्यास साहाय्य होते

तुत्थकं कटुकं क्षारं कषायं विशदं लघु ।
लेखनं भेदि चक्षुष्यं कण्डूक्रिमिविषापहम् ।
कफास्रपित्तकुष्ठघ्नं मेहमेदोविनाशनम् ॥

हरीतकी कषाय, रुक्ष, लघु, पाककाळी मधुर असून कोष्ठस्थ व धातुस्थित मलांना दूर करणारी अशीच आहे कोष्ठस्थ व धातुस्थ अग्नि थोडा सबल व्हावा याच उद्देशानें या तुत्थहरीतकीसंयोगास निंबुरसाच्या भावना दिलेल्या असतात* रक्तदुष्टि न करता कफ व पित्ताचे शमन करण्याच्या कामी हा योग फार उपयुक्त आहे

दुष्ट व्रणास लावण्याकरिताहि तुत्थहरीतकीचे जल ( lotion ) चूर्ण, मलम वा तेल तयार करता येते व तेहि उत्कृष्ट गुण देते

उपदंशज व्रणावर लावण्यास हा योग पारदकल्पा(कज्जली)बरोबर वापरल्यास ते व्रण फार जलद बरे होतात या वेळी पोटातून दिलेल्या तुत्थहरीतकीचे कार्य त्यास उपकारक असें होते.

---

* पाठ--शुद्ध मोरचूद १ तोळा व बाळहिरडे १६ तोळे आंबट लिंबाच्या रसात ७ दिवस खल गोळ्या सावलीत वाळविणे अनुपान थंड पाणी
--उपदंशचिकित्सा, योगरत्नाकर

# (१२९) सर्वांगशोथ व यकृदुदर

रोगी पुरुष, वय ६८ वर्षें. जात मराठा, राखणदारीची कामें करून पोट भरणारा सर्वांग सुजून हालचाल करण्याची ताकत नसल्यामुळें रोग्यास उपचारार्थ चिकित्सामंदिरात ठेवण्यांत आलें होते.

रोगाची हकीकत—गेली ५-६ वर्षें कफ व खोकल्याचा विकार जडल्यामुळें रोग्याच्या हातून पूर्वीप्रमाणे मेहनतीची कामें होत नसत एक दिवस दुपारी भाकर खाण्यास न मिळाल्यामुळें ५ वाजता खजूर खाऊन वर एक लोटाभर पाणी तो प्याला. त्याच रात्री त्यास हिवताप भरला हिवाच्या ३-४ पाळया आल्या. तीन दिवस कडुजिऱ्याचा काढा पिताच हिवताप थावून ज्या कुशीवर निजावें ते थोबाड सुजूं लागलें. आठ दिवसात ती सूज सर्व अंगभर पसरली

रोगाचे स्वरूप—रोग्याचे सर्वच अवयव सुजलेले होते शिस्नहि सुजून खूप मोठे झाले असल्यामुळें त्यास लघवी करण्यासहि फार कष्ट पडत व एका दिवसात ३-४ औस लघवी होत असे पोट सर्व ताणलेलें असून पोटात यकृतानें बेंबीपर्यंतचा भाग व्यापला होता. खोकला व कफ पडणे चालू होतेंच सूज रात्रीं फार वाढे व दिवसा थोडी कमी पडे. मलप्रवृत्ति नसल्यामुळे सुजेचे प्रमाण वाढतच होते. पोटास तडस लागली असल्यामुळें थोडेंहि अन्नपाणी घेणें कठीण होते. शोथांत वेदना, दाह, वगैरे लक्षणें नव्हती.

औषधोपचार—अग्निमांद्यामुळें स्रोतोदुष्टि होऊन यकृदुदर व रस(त्वक्)रक्तादि धातुदौर्बल्य निर्माण झालें व अकाली असात्म्य आहाराचे कारण घडून समान व व्यान वायूंची दुष्टि होऊन क्रमानें सर्वांगशोथात त्याचे रूपांतर झाले असें ठरवून कोष्ठस्थ अग्निदीपन व आमपचन व्हावे या उद्देशानें प्रथम ५-६ दिवस राजवल्लभ १ गुंज + शुद्ध गुग्गुल २ गुंजा + चंद्रप्रभा २ गुंजा याच्या तीन पुडया सकाळीं (अनन्नकाली) व प्रत्येक समानकाली घेण्याकरिता दिल्या

शरीरातील घेतलेले अन्न व पाणी पचविणे म्हणजेच त्याचे सार व मल भाग अलग करणें हे कोष्ठस्थ अग्नि व समान वायु यांचें कार्य आहे. मूत्र व स्वेद इत्यादि द्रव मल भरपूर निर्माण व्हावेत म्हणून पुनर्नवा ४ मासे व गोक्षुर ४ मासे याचा काढा वरील औषधास अनुपान म्हणून देण्यात आला होता.

या औषधानें तोंडावरील सूज थोडी कमी झाली. परंतु रोग्याचा कफविकार बलवान् असल्यामुळें व यकृदुदर व शोथ हे विकारहि कफभूयिष्ठ असल्यामुळें यापेक्षांहि तीव्र अग्निदीपक औषधाची आवश्यकता होती म्हणून दुसऱ्या अनन्नकाली (सायंकाळी ५ वाजता) नवायस चूर्ण* २ मासे कोमट पाण्यात दिलें. त्यातील सुंठ, मिरें, पिंपळी.

* पाठ—सुंठ, मिरें, पिंपळी, चित्रक, वावडिंग, त्रिफळा, नागरमोथे सर्व समभाग व सर्वांच्या बरोबरीनें लोहरज (मंडूर) अनुपाने—ताक, मध, तूप, कोमट पाणी

—वाग्भट. पाण्डुरोग चिकित्सा

चित्रक इत्यादि अग्निवर्धक औषधानी कोष्ठस्थ पचन सुधरून स्वाभाविक मलशुद्धि होऊं लागली (शोथविकारात नवायसचूर्ण घेण्याचा स्वाभाविककाल व्यानकाल हा आहे.) नवायसात निम्या प्रमाणात असलेल्या लोहरजाचा मलावरोधक असा अपाय न होता यकृत्, हृदय, आत्र, मूत्रपिंड व त्वचा यावर हितकारक असा परिणाम होत असल्याचें आढळून आलें

समानकाली घ्यावयाची औषधें आसवारिष्टजातीय असल्यास हे कफामुळे उत्पन्न झालेलें अग्निमाद्य अधिक लवकर दूर होईल व वातदोष प्रकृतिस्थ होण्यास मदत होईल या कल्पनेने पूर्वीच्या ओषधाऐवजी **पुनर्नवासव + अभयारिष्ट+रोहितकारिष्ट** याचे १ तोळा मिश्रण **भास्करलवण** १ मासा+**पिंपळीचूर्ण** २ गुजा यावरोबर प्रत्येक ममानकाली दिलें वाढलेले यकृत् कमी करणारी औषधेहि यात समाविष्ट झालेलीं आहेतच

या अन्नकाली व समानकाली दिलेल्या औषधानी पुढील आठ दिवसात सूज पार नाहीशी झाली व रोगी पायीच घरी गेला

आहार —मुगाच्या अगर तुरीच्या डाळीच्या कालवणाबरोबर बाजरीची भाकर हा सात्म्य आहारच रोगी घेत असे समानकालीन आसवामुळे (**पाने मद्यानि औषधवंति च**। वाग्भट चि १७।१९) पचनकार्य उत्कृष्ट प्रकारे होई

यकृदुदर नाहीसे होण्याकरिता वरील औषधे पुढे १ महिनाभर देण्यात आली शिवाय मधून मधून कोष्ठशुद्धि, धातुशुद्धि व्हावी याकरिता कुटकी, त्रिफळा, त्रिवृत्, पुनर्नवा व गोक्षुर प्रत्येकी ३ मासे याचा काढा करून सकाळी घेण्याकरिता दिला होता. हें कार्य मूत्रहरीतकीनेहि झाले असते

दोषज साम सर्वांगशोथविकारात समानकाली व निराम अवस्थेत व्यानकाली औषध द्यावें उदरव्याधीस समानकाली व वरील दोन्हि विकारात कोष्ठशुद्धीकरिता अन्नकाली औषध देणें हे औषधाचे योग्य काल आहेत

---

## (१३०) बालकाचा खोकला

रोगी मूल, वय ८ महिने जात मराठा, कुटुंब सुखवस्तु जन्मापासून खोकला व नगात घरघर ही तक्रार मूल शरीराने शिथिल, फोफसें होते त्याची त्वचा पाण्डुर-वर्णाची होती या मुलाच्या आईची पहिली तीन मुले अशाच विकारानी एक वर्षाचीं होण्यापूर्वीच वारली व या मुलास (व आईस) तर जन्मल्यापासून स्त्रिया व मुलाच्या

खास दवाखान्यांतून आतापर्यंत औषध चालू असून खोकला जात नाही म्हणून आयुर्वेदीय औषधालयांत आणले आहे असे मुलाच्या आजीने सांगितले

मुलाचा विकार तीव्र स्वरूपाचा नव्हता. तथापि त्वचेचा पांढुरका रंग, थोडेसे शिथिल असे शरीर व वरील तक्रार ही लक्षात घेऊन मुलाला मिळणारे दूध कफदूषित असले पाहिजे व दूध कफदुष्ट करणारा असा मिथ्या आहारविहार नेहमी घडणारा असला पाहिजे व तो आजपर्यंत लक्षात न आल्यामुळें त्यात सुधारणा न करता केलेला केवळ औषधोपचार व्यर्थ गेला असला पाहिजे असे अनुमान करून आजीस पुढील दोन संभवनीय कारणे विचारली (१) मुलाची आई बाळतपणी तापविलेले पाणी नेहमी पीत नसावी व (२) दुपारी जेवणानंतर रोज बरीच झोप घेत असावी

वरील दोनहि कारणे बरोबर ठरल्यामुळे मुलास औषध देण्याची आवश्यकताच नव्हती. मध्याचा खोकला जाण्याकरिता मुलास ४ दिवस सितोपलादि चूर्ण १ गुंज व जेष्ठमध चूर्ण २ गुंज मधात देण्यात आले आईने दिवसाची झोप व थंड पाणी वर्ज करताच पंधरा दिवसात खोकला नाहीसा झाला

---

# (१३१) पैत्तिक शूल

रोगी विद्यार्थी, वय १२ वर्षे प्रकृति साधारण कृश. गेली ५-६ वर्षं दुपारी जेवणापूर्वी पोट दुखते व जेवण झाले की थाबते ही तक्रार इतर काही त्रास नव्हता. पोट तपासून पाहता यकृत्पित्त आंतड्यात स्रवते त्या आंत्र भागात दाबले असता दुखत असल्याचें आढळून आले विचारता हा शूल शरत्काली विशेष त्रासदायक होतो असे उत्तर मिळाले वरील लक्षणावरून या शूलस्वरूप वातविकृतीस पित्तदोष कारण ठरवून शूलघ्न असे काहीहि न देता ताज्या आवळ्यांच्या रसात प्रवाळभस्म (चं पु.) १ गु + गुळवेल सत्व २ गु हे केवळ कषायरसाचे व शीतगुणाचे पित्तशामक औषध सकाळीं ९॥ वाजता घेण्यासाठी दिले ते औषध घेतले त्या दिवशीच पोट दुखण्याचे थांबले

या उपशयामुळे हा शूल तत्कालीन वृद्ध पित्तामुळे होतो हे सिद्ध झालं या पित्ताचे शोधन व्हावे, तथापि त्या शोधनामुळे कोष्ठात वातवृद्धि होऊं नये, शिवाय आजवर दुपारी जेवणापूर्वी रोज काही कालपर्यंत झालेल्या पित्ताच्या परिणामामुळें आतड्याच्या कांही भागात व्रण झाले असल्यास अगर तो भाग अबल झाला असल्यास ते भरून येऊन आतड्यात पूर्ववत् बल प्राप्त व्हावे या उद्देशानें त्या रोग्यास रात्री अपानकाली त्रिफलाघृत घेण्याकरिता दिले. यानें क्रमाने कोष्ठस्थ मलग्रंथींचे नि.सरण होऊन वायूचे अनुलोमन झाले.

मध्यंतरी अनुलोमनकार्यास उपकारक म्हणून या घृताबरोबर सौवर्चल ४ गुंजा देण्यात आले होतें, पण त्याने पुन शूल प्रगट होऊं लागल्यामुळें ते वद करण्यात आलें लवण हें वातानुलोमन व पाचक म्हणून कोष्ठस्थ शूलघ्न असलें तरी उष्ण, तीक्ष्ण व लेखन असल्यामुळें अशा प्रकारच्या पैत्तिक शूलात अपायकारकच ठरते, अम्लरसाची पाचक व शूलघ्न द्रव्यें हीं येथें याच कारणास्तव उपयोगी पडणार नाहीत

विकार दीर्घकालीन असल्यामुळे उपचार सौम्य व धातुगामी असे असले पाहिजेत याच उद्देशाने एक महिनाभर वरील दोनहि औषधें चालू होती

इत पर पुन शरद् ऋतूंत पित्ताची वृद्धि होऊन शूल रोगाचा पुनरुद्भव होऊं नये याकरिता ऋतुचर्येचा एक भाग म्हणून दरसाल शरद् ऋतूचे प्रारभी एक सौम्य पित्त-विरेचन घेऊन काही दिवस रोज सकाळी १-२ ताजे आवळे खाण्यास त्यास सागितलें आहे

---

# (१३२) अग्निदग्धव्रण

रोगी विद्यार्थी, वय ९ वर्षे. तुळशीचे लग्नात दारू उडवीत असता त्या दारूचा भुसनळा होऊन ज्योत पायावर येऊन गुडघ्यापासून खालचा सर्व पाय भाजला व फोड आले घरगुती उपायानी बरे न होता सर्व पायभर व्रण झाले व त्यात पाणी शिरून ते ठणकू लागले सर्व त्वचा विदीर्ण झाली असल्यामुळे त्यास कशाचाहि स्पर्श सहन होत नसे

अग्नि व्रणाच्या ठिकाणी केवळ शोधनरोपणाची आवश्यकता नसते मुख्यत त्या ठिकाणी उत्पन्न झालेल्या उष्ण व धातुगत पित्ताचें शमन करणारे असें प्रभावी औषध हवें असते त्या औषधाने तो दाह दूर झाला की, निसर्गत सर्व विकार नष्ट होऊन नवीन त्वचा येते हा धातुगत दाह दूर करणारे सर्वश्रेष्ठ घरगुती औषध तूप आहे. तुपाचें दाहशमन, वेदनाहरण व व्रणरोपण हे गुण वृद्धिगत व्हावेत या उद्देशाने चदनचूर्ण, प्लक्षत्वक्चूर्ण, गुळवेलचूर्ण, वशलोचन व गेरू याचे समभाग मिश्रण त्यात घातले की, उत्कृष्ट प्रभावी असें मलम तयार होते (वाग्भट सूत्रस्थान ३०।५१) हे मलम लावले म्हणजे मग व्रण पाण्याने धुण्याचे कारण पडत नाही (व्रण धुणे असल्यास वडाच्या सालीचा काढा धावनार्थ वापरावा) व दाह लवकर शमतो

प्रस्तुत रोग्याचे व्रण या अग्निदग्ध व्रणावरील मलमाने आठ दिवसात बरे झाले

या मलमावर कापूस लावून पट्टा बाधू नये त्यामुळे आत उष्णता वाढून त्रास होतो लावलेलें तुपाचे मलम गरम झाल्यास ते पुसून काढून वारवार दुसरे लावावे असे न

केल्यास त्या तापलेल्या तुपानें दाह व व्रण अधिक वृद्धि पावतात. (अत्यर्थशीता· तनव· तनुवस्त्रान्तरास्थिताः । योज्या क्षणे क्षणेऽन्येऽन्येऽमन्दवीर्यास्त एव च ॥ )

भाजण्याचा परिणाम तीव्र स्वरूपाचा असल्यास त्यावर वरील मलम लावून शिवाय पित्तनाशक अशा अनतमूळ, जेष्ठमध, शतावरी, आवळे, हिरडे, मनुका, दूध, इत्यादिनी सिद्ध केलेले तूप पोटात द्यावे महातिक्तकघृताचा अंतर्बाह्य उपयोग या विकारात अत्यंत हितावह असा होतो

---

# (१३३) रडवा (भित्रा) स्वभाव

रोगी मुलगी, वय ५ वर्षे बापाचा धंदा सुतारीचा. पूर्वी धंदा चागला चाले त्यामुळें आर्थिक स्थिति बरी, पण सध्या दारिद्रय सहा महिन्यापूर्वी मुलीस रात्री ताप येतो व दिवसाहि अंगात बारीक ताप असतो म्हणून बापाने औषधाकरिता चिकित्सामंदिरात आणली होती.

मुलगी स्वतःच्या रोगाची लक्षणे काहीच सागूं शकत नव्हती तथापि तिच्याकडे दृष्टी जाताच तिची त्वचा, वर्ण, केस, चेहेरा व कृश शरीर हे सर्व तिचे पोषण होत नाही असे स्पष्ट दाखवीत होते वाळकट त्वचा, काळसर वर्ण, भुरकट केस व निस्तेज चेहेरा व अग्नि मंद यावरच जीर्णज्वराचे अनुमान सहज होत होते.

रोग्यास कृमि होण्याची व त्यामुळें पोट दुखण्याची ( व नाक खाजवण्याची ) संवय आहे असें समजल्यावरून, कृमि हेहि कदाचित् या सर्व विकृतींचें कारण असतील, तर ते नाहीसे करावेत या उद्देशाने कृमियोग ८ दिवस दिला, पण कृमि पडले नाहीत. तथापि याने कोष्ठशुद्धि झाली व तापाकरिता ८ दिवस दिलेल्या मांसधातुगत ज्वरयोगाने (कडु पडवळ, कडुनिंब, त्रिफळा, मुस्ता, कुडा, मनुका) रात्री वाढणारा तापहि सर्वसाधारण कमी झाला.

सुमारें दोन महिन्यानंतर तीव्र तापाची तक्रार घेऊन तो रोगी पुन· आला. रोग्याचे पूर्वीचे बाह्य स्वरुप कायम होते तेल लावून न्हाऊं घातले तरी त्वचा व केस असेच राहतात असे तिच्या आईने सागितले

या वेळी ज्वरातील दोषाचे पचन व्हावे म्हणून त्रिभुवनकीर्ति ½ गु +त्रिफळा १ गुज, मधांतून सकाळी सायंकाळी घेण्यासाठी दिली पाच दिवस झाले तरी तापाच्या स्वरूपांत फरक पडेना तेव्हा एकंदर स्वरूपावरून ज्वराचे दोष हे जीर्ण व धातुलीन झालेले आहेत असें ठरवून ज्वराच्या रूक्ष तेजामुळे धातूंमध्ये वृद्धि पावलेले सूक्ष्म वातपित्त दोष यांचे शमन करून बल देणारी अशीच चिकित्सा करण्याचे ठरविले

या ठिकाणी ज्वरचिकित्सेतील पिप्पल्यादिघृत हे किंवा यासारखे सिद्धघृत उपयोगी पडलें असतें तथापि बापाच्या आर्थिक विषमतेमुळे पोषक अन्नाचा अभाव हेहि धातु-दौबल्याला आणखी कारण होत असेल, तर तेहि दूर व्हावे या उद्देशाने घृताऐवजी मधुमालिनीवसतच देण्याचे निश्चित केले

मधुमालिनीवसंतातील मुख्य औषध कोंबड्याच्या अंड्यातील वलक हे आहे व तो घृतापेक्षा अधिक बल्य आहे शिवाय डाळिंबरसाच्या भावना दिलेल्या हिंगुळाशी त्याचा संयोग, त्यावर भरपूर अग्निसंस्कार, त्यात अग्निदीपक मिरे व दाहशामक व वृष्य कचोरा व गव्हला यांचे मिश्रण व यास पाचक अशा आवट लिंबाच्या ७ भावना इत्यादि-मुळें कोष्ठस्थ व धातुस्थ अग्नीचें दीपन करून त्या त्या धातूंना पोषक असे अंश पुर-विण्याचे कार्य मधुमालिनीवसताने उत्तम प्रकारे होते

या रोग्यास दोन महिने वरील वसंत देण्यात आला त्याने त्या मुलीच्या अंगातील ज्वर गेला व मुलगी बरीच चलाख झाली या औषधाचा परिणाम म्हणून पुढील विशेष चमत्कारिक फरक रोग्याच्या आईबापाच्या लक्षात आला तो त्यांच्याच भाषेत सांगाव-याचा म्हणजे " मुलगी सव्वा रुपाया झाली "

या वाक्याचा अर्थ बापाने सांगितला तो असा —पूर्वी खेळताना ही मुलगी कोणाची खोडी करीत नसे कोणीहि, तिच्यापेक्षा लहान मुलाने जरी खोडी केली तरी त्याचा प्रतिकार न करिता मुलगी रडत घरी आईकडे यावयाची तिच्या लहान दहा महिन्याच्या बहिणीने तिचे केस धरले तरी तिची तीच स्थिति व्हावयाची पण आता ती मुलगी इतकी धीट झाली आहे की, पूर्वीप्रमाणे तक्रार घेऊन ती घरी येत नाहीच, उलट त्या खोडी करणाऱ्या मुलाला ठोकते, इतकेच नव्हे तर ती आता दुसऱ्याच्या खोड्याहि करते

मधुमालिनीवसंतामुळे शरीरात वाढलेल्या ओजाचा हा परिणाम आहे.

भित्रेपणा हे ओजक्षयाचे प्रमुख लक्षण आहे. ( बिभेति दुर्मनाऽभीक्ष्ण ध्यायति वाग्भट )

सूचना--अग्नि विशेष मंद असता मधुमालिनीवसंत देऊ नये.

---

## (१३४) दृष्टिमांद्य ( तिमिर ) व निमेष

रोगी ब्राह्मण, विद्यार्थी, वय वर्षे १२ " डोळ्यातून पाणी गळते " ही मुख्य तक्रार दर्शनपरीक्षा करता रोग्याची दोनहि दृष्टिमंडळे बरीच विस्तृत झाली असून पाप-ण्याची उघडझाप (निमेषोन्मेष) फारच जलद जलद होत असल्याचे आढळून आले

नेत्राच्या पांढऱ्या व काळया बुब्बुळावर, तसेंच दृष्टिमंडळाच्या ठिकाणी, कोणताहि अस्वाभाविक काळा, पांढरा डाग अगर रक्तसिराजाल नव्हते.

डोळयात आग, ठणका वगैरे काहीच लक्षणे नसल्यामुळे डोळयास स्पर्श करून पाहण्याची आवश्यकता नव्हती डोळयातून गळणारे पाणीहि उष्ण नव्हते

रोग्याच्या इतिहासाविषयी प्रश्न विचारता पुढील हकीकत कळली—गेल्या मे महिन्यात साखर कारखान्याच्या गावी असता एक दिवसाआड मलेरियाचा ताप येई दुपारी थंडी वाजून ताप भरे व रात्रभर अंगात राहून सकाळी घाम येऊन ताप उतरे. अंगात ताप असताना पाठीत चमका होत, श्वास लागे व अंथरुणावर पडून असताहि गरगर फिरल्यासारखे वाटे (मेदोमज्जागतज्वर).

यावर पाश्चात्य औषध घेतले त्यानंतर ताप थांबला जूनमध्ये शाळेंत जाऊं लागल्यानंतर २ महिन्यांनी वर्गात फळयावर लिहिलेले हळूहळू दिसेनासे झाले व थोडथोडे पाणी येऊं लागलं डिसेंबरात गलग्रंथि ( tonsils ) वाढून खोकला झाला तोहि पुढें औषधानें थांबला, तथापि डोळयाची लक्षणे चालू होतीं व हळूहळू वाढतच होती

रोग्याचे शरीर बरेच कृश झालेले होते गेले ६ महिने त्याचा अग्नि मंद होत चालला होता मधून मधून पोट दुखे व क्वचित् उलटीहि होत असे

या विकारातील दोष, सौम्य, सूक्ष्म, अल्प व ऊर्ध्वप्रवृत्त होते. विकाराचा मांस, मेद व मज्जा यावरील परिणाम लक्षित होत होता. वर्त्मस्थित वातविकृतिहि अन्यदोषनिमित्तज होती

विकाराचें शमन साध्या औषधांनी झालें पोटातून स्वप्नकाली २ मासे त्रिफळा + ३ मासे मध + १॥ मासा तूप व प्रत्येक समानकाली २ गुंजा पाचकगुटी (पाचक आमलकीकल्प) देण्यात आली रोज नेत्रधावनाकरिता तुपात तव्यावर परतलेले लोध्रचूर्ण १ मासा व त्रिफला १ मासा पावशेर पाण्यात उकळून गाळून ते जल वापरण्यास सांगितले होते

या उपचाराने १० दिवसात डोळयाचे पाणी गळणे थांबले व एक महिन्यात निमेष रोग नाहीसा होऊन वर्गात फळयावर लिहिलेले वाचता येऊं लागले दृष्टिमंडळेंहि बरीच संकुचित व स्वाभाविक झाली अग्निमांद्य दूर होऊन आहार वाढला

पाणी गळण्याचे थांबताच तूपमधाचें प्रमाण उलटें (३ मासे तूप + १॥ मासा मध) करण्यात आले व स्वप्नकालीन त्रिफलेचें प्रमाण १ मासा ठेवलं मेदोऽस्थिमज्जादि धातुगत सूक्ष्म कफपित्ताचें शमन करण्याकरिता तिक्त द्रव्यांनी सिद्ध केलेले तिक्तकघृत १ मासा + मध व्यानकाली देण्यास सुरुवात केली पाचकगुटी चालू होतीच त्याचा अग्नीवर चांगला परिणाम दिसून आला

"डोळे मिचकविण्याची खोड चांडेट" अशा वारंवार वडील माणसांनी केलेल्या उपदेशाने गेल्या चार महिन्यात जें झाले नाही ते ओषधाने एक महिन्यात झालेले पाहून मुलाच्या आजीस फारच आनंद झाला मुलास तर जाऊं लागलेली दृष्टीच परत मिळाली!

स्वप्नकालीन त्रिफलेचा हा प्रभाव!

इय रसायनवरा त्रिफलाऽक्ष्यामयापहा।

---

# (१३५) पांढरें कोड

रोगी स्त्री, वय वर्ष ३२, अगकाठी उंच शरीर साधारण कृश, वर्ण सावळा.

**रोगाची हकीकत**—सहा वर्षापूर्वी रोग्यास छातीच्या मध्यावर एक लहान लालसर पुळी झाली ती खाजविली गेल्यामुळें बरी न होता त्या ठिकाणी एक आडवी, लावट, त्वचेच्या वर्णाची मासवृद्धि झाली त्यास मासवृद्धि म्हणण्यापेक्षा त्वग्वृद्धि म्हणणे अधिक योग्य होईल सरकारी रुग्णालयातील स्त्री डाक्टरानी त्याचे छेदन करण्याविषयी सुचविले होते पण ते घडले नाही खाज चालू होतीच खाजविता खाजविता त्याची पहिली त्वचा निघून गेली व त्या ठिकाणी पांढरी त्वचा आली पुढे कपाळावर व केसांत खाजूं लागलें तेथेहि पाढरे डाग पडले नतर डाव्या हाताच्या कोपरापुढील भागावर पाठीस कमरेपासून मानेपर्यंत, गुडघ्याखाली पायावर व पावलावर असेच खाजवून खाजवून पाढरे डाग पडले होते व ते वाढत होते सर्वांगास खाज होतीच, तथापि जेथे जास्त खाजे तेथे पाढरे डाग पडत ही डाग पडलेली त्वचा हळूहळू वरीच जाड होत असे

**औषधिविचार**—विरुद्धाहारादि कुष्ठाची कारणे हीच श्वित्राची कारणे असून वातपित्तकफामुळेच रक्तादि धातु दुष्ट होऊन त्याच्यापासून अशी विकृत त्वचा निर्माण होते व त्यावर शोधनपूर्वक दोषधातुविकृति दूर करण्याचे उपाय दीर्घकाल करावे लागतात त्या कामी निवडुंग, चित्रक, बावची, हरताळ इत्यादि द्रव्ये प्रामुख्याने उपयोगी पडतात.

**औषधियोजना**—या रोग्यास श्वित्रारि हे ओषध देण्यात आले (या औषधाचा पाठ रसचंडांशूत कुष्ठचिकित्सेत आहे) औषधाचे कार्य त्वचेवर (मासधातूवर) व्हावे म्हणून पिकलेल्या केळावरोबर ते दिले रात्री एक झोप झाल्यानंतर सुमारे १२ ते २ वाजण्याच्या दरम्यान औषध घेण्याचा काल ठरविला होता औषधाचे प्रमाण २ गुंजा

श्वित्रारिरसात हिराकस, पारा, गंधक याची कज्जली तुळशीच्या रसात केलेली असून त्यास आंबट चुक्याच्या कल्कांत ठेवून गजपुट दिले असतां तो तयार होतो गंधकमारित हिराकसाचे श्वित्रघ्न असें कार्य होते व योगवाही पारा हा त्याच्या कार्यास मदत करून त्याचे कार्य प्रभावी करतो.

श्वित्रारिरसाच्या श्वित्रघ्न कार्यास पुष्टि मिळावी म्हणून दुसऱ्या एका श्वित्रघ्न औषधाची त्यानकाली योजना करण्यात आली बावंची चूर्ण १ मासा हें मास व रस धातूवर कार्य व्हावे या उद्देशाने त्रिफला व दूध याबरोबर दुपारी जेवण झाल्यावर लगेच घेण्यास दिले.

त्वग्विकारावरील औषधयोजना वरून लावावयास औषध दिल्यावाचून पूर्ण होत नाही अशी समजूत आहे म्हणून बावंची चूर्ण तिक्तकघृतातून बाहेरून लावण्यास देण्यात आलें

रोगी परगावचा असल्यामुळें ५ दिवसाचें औषधबरोबर घेऊन तो गावी गेला तेथून तो दुसऱ्या गावी गेला. त्यामुळे पुढें एक महिना त्याने औषध नेलेंच नाही. तथापि ५ दिवस घेतलेल्या औषधाचा त्वचेवर उत्तम परिणाम होत असल्याचे त्यास दिसून आले सर्व ठिकाणच्या पांढऱ्या डागावर मधून मधून त्वचेच्या वर्णाचे काळे ठिपके भराभर उठूं लागले होते

अशा रीतीनें औषधाचा व्यावहारिक परिणाम झालेला पाहून रोग्याचा विश्वास वाढला व तो पुन्हां तेंच औषध घेण्याकरिता आला त्यास तीच औषधें पुनरपि चालू केली व त्याचा परिणामहि होत गेला पण खाज मात्र कमी झाली नाही. उलट वाढली पूर्वी खाजवून खाजवून जाड झालेली सर्व ठिकाणची कातडी हळूहळू पातळ झाली व त्यावर काळी कातडी आली

या औषधाच्या परिणामावरून असें दिसले की, याचे श्वित्रव्याधिप्रत्यनीक असें कार्य होत असले तरी कंडूत्पादक कफदोषप्रत्यनीक कार्य घडून आलें नाही उलट औषधामुळें चाळविला गेलेला कफ अधिकच खाज हे लक्षण उत्पन्न करीत होता

कुष्ठ, श्वित्र या व्याधींची चिकित्सा शोधनपूर्ण व शोधनसहित हवी तशी शोधनचिकित्सा प्रस्तुत रोग्याचे बाबतीत न केल्यामुळे खाज हा उपद्रव विशेष त्रासदायक झाला त्यावर वमन, विरेचन, रक्तस्रुति व शिलाजतु, विडंग, भल्लातक या शोधन व शमन औषधांचा उपयोग सध्या चालू असून त्यापासून विकार व तदारंभक दोष हे दोनहि झपाट्याने कमी होत आहेत

या रोग्यास सर्वविकारसामान्य असा पथ्यकर आहार घ्यावयास सांगितला होता विशेष पथ्यापथ्य सांगितलें नव्हते वास्तविक कफ व रक्त दुष्टिकारक असा आहार संपूर्णत वर्ज्य करावयास सूचना होता

[ या औषधालयात आजवर बरेच श्वेतकुष्ठाचे रोगी चिकित्सिले गेले त्यापैकीं काहीं उत्तम रीतीनें बरे झाले व काही बरे होत आहेत त्या सर्वांचा साकल्यानें विचार करता एक गोष्ट प्रामुख्यानें लक्षात आली, ती अशी की, "पांढरे कोड" हा व्याधि दोषदूष्यभेदानें अनेक प्रकारचा आहे व त्यावर करावयाचे उपचारहि तसेच भिन्न असावे लागतात सर्वांस सामान्य असा एकच उपचार लागू पडत नाहीं ]

---

## (१३६) जीर्णज्वर व गंडमाला

रोगी स्त्री, वय वर्षे १४. मानेवर व गळ्याभोवती गाठी वाढलेल्या असून वारंवार मधून मधून ताप येतो, हे रोग्याचे मुख्य लक्षण होते.

रोग्याची दर्शनपरीक्षा करिता शरीर विशेष कृश नसले, तरी वयाच्या मानानें शरीराची योग्य वाढ झालेली दिसत नव्हती त्वचा रुक्ष व काळसर असून त्यावर वाळलेल्या त्वचेचा पांढुरका कोंडा निघत असल्याचे दिसत होते एकहि गाठ अद्याप फुटली नव्हती गाठीस स्पर्श करून पाहता त्यापैकी काही सुपारीएवढ्या तर काहीं भिजून फुगलेल्या वाटाण्याएवढ्या होत्या एकूण सुमारे नऊदहा गाठी हातास लागत.

प्रश्न विचारता गाठीचा व तापाचा संबंध असल्याचें दिसून आले ताप आला की, त्या सर्व गाठी मोठ्या होतात व ठणकू लागतात, व ताप कमी झाला की, त्या वेदना कमी होतात, असें सांगण्यात आलें तथापि या रोग्याचे बाबतीत निदानाला विशेष मदत झाली ती अनुपशयाची रोग्याने व रोग्याच्या आईनें सांगितले की, **ही तापाची, गाठी दुखण्याचीं लक्षणे ऊंस, उसाचा रस, गूळ व रताळीं वगैरे खाण्यात आलीं की हटकून उद्‌भवतात**

रसग्रंथि ( lymphatic glands ) या रस, मांस व मेद या धातूंपासूनच प्रामुख्यानें बनलेल्या असतात व प्रस्तुत रोग्याचे रस व मेद या धातूंचे अग्नि मंद असल्यामुळे रसप्रधान व ग्रंथिप्रधान आहारापासून सामदोष उत्पन्न होऊन तो ज्वरोत्पादक होत असला पाहिजे हे स्पष्ट आहे

हाच विचार डोळ्यासमोर ठेवून, **रसधातुगतज्वरयोग** ( इंद्रजव, कडु पडवळीची पानें, कुटकी ) व **मेदोधातुगतज्वरयोग** ( काडेचिराईत, गुळवेल, चंदन, सुंठ ) प्रत्येकी २ मासे याचा पावशेर पाण्यात अष्टमांश काढा करून सकाळी एक वेळ घेण्यास दिला रसमेदोधातुगत जीर्णज्वरदोषावरहि कार्य व्हावे एतदर्थ त्या काढ्यात १ मासाभर तूप टाकून व पुन्हा एक कढ देऊन ते पिण्यास सांगितलें होते.

आठदहा दिवसाच्या अवधीत या औषधाने रोग्याच्या प्रकृतीत विलक्षण फरक घडवून आणला त्वचेवरील पांढरा कोंडा पार नाहीसा होऊन त्याची स्वाभाविक अशी

त्वचा प्रकट झाली आणि कित्येक वर्षांपासून रोज रात्री अंग गरम होत असे ते बंद झालें. सर्व गाठीचा आकारहि कमी होऊं लागला व रोग्याचा उत्साह वाढू लागला ( रसशुद्धीचे लक्षण ).

दोषांचें पचन झाल्यानंतर रोगी बलवान् असल्यास त्याचें योग्य प्रमाणात शोधन होणे आवश्यक असतें. म्हणजे वारंवार त्याचा उद्भव होत नाही. याच कारणास्तव त्रिवृत् + त्रिफला चूर्णाची एक पुडी पुढें पुढें विरेचनार्थ या रोग्यास देण्यात येत असे

जीर्णज्वर जाण्यास वरील ओषध पुरेसे असले तरी तेरा वर्षांचा जुनाट गंडमालेचा विकार तेवढ्याने जाणार नाही असे वाटून तो विकार जाण्याकरिता वरील औषधाबरोबरच पुढील दोन औषधे देण्यात आली होती ½ गुंज लोकनाथ दुपारी व रात्री जेवणानंतर मधात घ्यावयाचा व सकाळीं व सायंकाळी निर्गुंड्यादि तेल दोनदोन थेंब नाकांत सोडावयाचे (नस्य). लोकनाथातील शंख, कपर्दिक, टाकणखार हे धातुगत अग्नि वाढवून गाठी कमी करणारे आहेत.

शरीरावर विष, गर किंवा विरुद्ध अन्न यांचे परिणाम होऊन जे रोग होतात, त्यांपैकीच गंडमाला हा एक व्याधि असून तो परिणाम घालविण्यास उपयोगी पडणाऱ्यांपैकी निर्गुंडी व हरिद्रा या वनस्पति प्रमुख आहेत या विषदोषनाशक गुणाकरिता या रोग्यास निर्गुंडीरस व हरिद्राकल्पाने सिद्ध केलेले हे तेल नस्यार्थ दिले होते.

वरील सर्व औषधांचा चागला परिणाम होत असल्याचे दिसून आले असून या उपायानी गंडमाला हा विकारहि समूळ बरा होईल अशी खात्री वाटत आहे

---

## (१३७) कृमिरोग व कंप

रोगी पुरुष, वय १६ वर्षे शिंपीकाम म्हणजेच बैठे काम करणारा बऱ्याच दिवसापासून कोणत्याहि स्थितीत भोंड येणे, अंग थरथर कापणे, अंधारी येणें, दिवसानुदिवस क्षीणता वाढत चालली व उत्साह नाही अशी तक्रार घेऊन आला. व्याधिताच्या वरील कंप, भ्रम व उत्साहहानी इ लक्षणावरून अपतर्पणजन्य वातप्रकोपात्मक दुष्टीचें अनुमान करून सुरुवातीस त्यास दुसरे कांहीच औषध न देता, संतर्पणाकरिता म्हणून त्याच्या खाण्यात दूध वाढविण्यास सागितले व भोंड, थरकाप, अंधारी वगैरे लक्षणे कमी होण्याच्या दृष्टीनें मज्जातर्पण व मज्जास्थित वातशमन होण्याकरिता रात्री झोपताना पाच-सहा बदाम दूधसाखरेंत घेण्यास सांगितले याप्रमाणे ७ दिवस घेण्यास सांगितले वस्तुत. वरील निदान जर बरोबर असतें तर व्याधितास या संतर्पणाचा उपशयच झाला असता. पण वरीलप्रमाणे ७ दिवसाच्या संतर्पणानंतर सर्व लक्षणे तर वाढलीच व उत्क्लेश होऊं लागल्याचीहि तक्रार त्यानें केली तेव्हा साहजिकच वरील लक्षणे संतर्पणसाध्य

नव्हती, असें अनुमान करून वरील लक्षणसमुच्चय ज्यात संभवनीय आहे अशा कृमीबद्दल विचारता त्यास सुतासारखे कृमि या पाच-सहा दिवसात पडूं लागल्याचे त्याने सांगितलें

वरील प्रकारच्या संतर्पणात्मक आहारामुळे कृम्युत्पादक परिस्थिति वाढल्यामुळें कफाचा व कृमीचा उत्क्लेश होऊन कृमि आपोआप पडूं लागले कृमिचिकित्सेंत कृमिपातनयोग देण्याच्या पूर्वी गुडक्षीरमत्स्यादिकानी कफ व कृमीचा उत्क्लेश करावयास सांगितला आहे तो अनायासेंच वरच्या प्रकारच्या योजनेने झाला वरील संतर्पणाचे दोन उपयोग झाले संतर्पणाने ज्या अर्थी लक्षणवृद्धि अर्थात् व्याधिवृद्धि होत आहे त्या अर्थी संतर्पणाचा अनुपशय या ठिकाणी होत आहे तेव्हा अपतर्पणसाध्यत्व ह्या व्याधीच्या ठिकाणी असूं शकेल हे एक चिकित्सोपयोगी अनुमान व दुसरे म्हणजे कृमीच्या पातनचिकित्सेपूर्वी त्यात करावा लागणारा इष्ट असा उत्क्लेश, तोहि ह्यात झाला

अनुपशयाचा चिकित्सेमध्यें जो उपयोग होतो तो अशाच तऱ्हेने होय वरील अनुपशय केवळ आहारात्मक कारणाचाच झाला अशाच तऱ्हेने औषध व विहार याच्याहिबद्दल विचार करावा लागतो

सदर रोग्यास सात दिवसाचे तर्पण हे जरी अनुपशयात्मक झाले, तरी चिकित्सेला ते उपयुक्तच झाले नंतर त्याला कृमीपातनाकरिता **कपिला + स्वादिष्ट विरेचन** देऊन अपतर्पण (लघनात्मक) करावयास सांगितल्यावर पाच-सात दिवसात वरील सर्व लक्षणें कमी झाली वरील सुरुवातीस सांगितलेली लक्षणे वातभूयिष्ठ खरी, पण ती वातवृद्धि धातुक्षयजन्य नसून रोधजन्य होती, म्हणून त्या ठिकाणी अपतर्पण व शोधनचिकित्साच उपयुक्त ठरली

कोणत्याहि कृमीच्या रोग्यात प्रथम तर्पण देऊन त्याचा अनुपशय दिसतो करिता सुरुवातीसच एकदम रसायन औषधि सुरू करण्यापेक्षा प्रथम कृम्युत्क्लेश व कृमिशोधन करून नतर पौष्टिक औषधाचा उपयोग करावा

वरील रोग्यास ७ दिवसानंतर १५ दिवसापर्यंत कृमीची उत्पत्ति कारणीभूत परिस्थिति नाहीशी करण्यास विडंगारिष्ट दिले व विडंगारिष्टाचाच त्याला रसायनाप्रमाणे उपयोग झाला

कृमिचिकित्सेंतील तीन भागापैकी-(१) उत्क्लेश होण्याचे कार्य संतर्पणाने, (२) साक्षात् कृमि पाडून शोधन करण्याचे कार्य कपिला व स्वादिष्ट विरेचनाने केले व (३) ते पुन्हा उत्पन्न होऊं नयेत म्हणून ती परिस्थिति नाहीशी करण्याचे कार्य विडंगारिष्टाने केलें

व्यवहारात अशा अनुपशयाचा आपणास पुष्कळ वेळा अनुभव येतो, पण त्याचाहि चिकित्सेच्या दृष्टीने उपयोग करून घेणें आपल्याच हाती असते

---

## ( १३८ ) गृध्रसी व ज्वर

रोगी पुरुष, वय ३५ मारवाडी ब्राह्मण, धंदा व्यापार. रुग्णास गृध्रसीचा विलक्षण झटका येत असे प्रथमतः आरंभी ज्वरोष्मा १०४°–१०५° पर्यंत जात असे ज्वर चढला की, वाति होणे, घवराट, डोकें भयंकर दुखणे, सर्वांगात, विशेषत छातीत, खूप कळा निघत. कंबरेच्या डोळयापासून ( खुब्यापासून ) कळा निघून पायाच्या मागच्या बाजूने कळाचा विलक्षण जोर वाढत असे रोगी अगदी वेभान होत असे. कळाचा जोर शेकले असता, विशेषतः चागला जोरदार शेक दिला असता, कमी होत असे ह्या स्थितीत अर्थातच पुष्कळशी शामक सूचिकाभरणे दिली गेली असल्यास नवल नाही. या रोग्यास **महावातविध्वसनरस** $\frac{१}{४}$ गु. + **मोरावळयाचा पाक** ३ मासे + **माक्याचा रस** १ तोळा एकत्र करून त्याचें चाटण वारंवार घेण्यास दिले हे चाटण ज्या दिवशी दिलं त्याच दिवसापासून वेदनाचा उपशम होण्यास सुरुवात झाली सरासरी एका सप्ताहात वेदना नाहीशी झाली वर लावण्याकरिता **वातनाशक तेल** १ तोळा + **वेदनाहर तैल** $\frac{१}{२}$ तोळा + **कापूर** $\frac{१}{४}$ तोळा + **शुद्ध तिलतैल** २ तोळे एकत्र करून लावण्यास देऊन वर स्वेदहि देण्यास सागितलं होतें.

---

## ( १३९ ) कोरडा खोकला व घबराट

रोगी स्त्री, वय २५, मारवाडी. बरेच दिवसापासून कोरडा त्रासदायक खोकला प्रथम येऊन नतर कफ पडावयाचा. खोकताना सर्वांगास घाम सुटावयाचा, घबराट फार व्हावयाची. तहान, कोरड, इत्यादि फार आणि अशाप्रकारे विकार वर्षातून दोन चार वेळा तरी येऊन जावयाचा ह्या रुग्णास—**अभ्रकभस्म** १ गु. + **मगशृग** १ गु + **प्रवाळ-भस्म** $\frac{१}{२}$ गु. + **गुळवेलसत्व** २ गु + **वंशलोचन** $\frac{१}{२}$ गु + **वेलचीचूर्ण** $\frac{१}{२}$ गु सारख्या प्रमाणाने चार पुड्या करून त्या दिवसातून चार वेळा मोरावळयाच्या पाकातून दिल्यावरोबर आराम वाटूं लागे.

---

# (१४०) जुनाट खोकला व जाड्य

रोगी पुरुष, वय ३५, मराठा, धंदा शेतकामाचा. जुनाट खोकल्यानें अगदी जर्जर होऊन कफ पडावयाचा तोंडास, हातापायास थोडी सूज, जडपणा फार तोंडास पाणी सुटावयाचें कित्येक वेळा फेसाळ फेसाळ वांति व्हावयाची. भूक अगदी मंद बोलतांना-सुद्धा दम लागावयाचा. सर्व रात्रभर बसून काढावी लागावयाची सर्वांगास फिकेपणा आणि थोडी थोडी सूज लघवीला पुष्कळ होत राहावयाची थंडीच्या दिवसांत किंवा पावसाळा सुरू होण्याच्या बेतानें खोकल्यास प्रारंभ होऊन सर्व लक्षणें वाढावयाची. उन्हाळ्यात सरासरीनें बरें वाटावयाचें ह्या रुग्णास—रससिंदूर १ गु + मृगशृंग २ गु ह्याची १ पुडी करून तुळशीचा रस व मध यांत चाटण केल्यानें फार उत्तम बरें वाटत असे हाच चिकित्साक्रम कमी अधिक प्रमाणानें बरेच दिवस सुरू ठेवल्यानें रुग्णास उत्तम प्रकारें स्वास्थ्य लाभलें

---

# (१४१) ऊर्ध्ववृक्कग्रंथिविकृति

पाश्चात्यांनी अंत स्रावाचें संशोधन केल्यापासून चिकित्साशास्त्रात बराच प्रकाश मिळाला आहे विविध अंत स्रावक ग्रंथींपैकी ऊर्ध्ववृक्कग्रंथि विकृत झाली असतांना खालील प्रमुख लक्षणें होतात —

(१) प्रथमपासूनच दौर्बल्य व शक्तिपात त्यातच कधी पांडुरोगाची किंवा मांसक्षीणतेची लक्षणें दिसतात (२) उपद्रवरहित रुग्णात हीन देहोष्माहि दिसतो (३) ववर्ण्य (pigmentation). प्रथम त्वचेवर पिवळी छटा येते व ती पुढें गडद होत जाऊन 'ब्रॉन्झ" सारखा वर्ण येतो (bronze mahogany colour) हें वैवर्ण्य विशेषत शरीराचे अनावृत भागावरच जास्त दिसतें (मुख, हस्त व पाद). घसा, जीभ व मुखाची अंतस्त्वचा ह्यांचेमध्येंहि असेंच वैवर्ण्य खंडश (patches) दिसतें (४) कधी पचनविकृतीची सुद्धा चिन्हें दिसतात बद्धकोष्ठहि असते किंवा अतिसार होऊन रोगी दगावतो (५) धडधड, कष्टश्वास, जृम्भा इत्यादि रक्तवह-व्यवस्थेचेंहि आविष्कार दिसतात. (६) शीर्षशूल, जृम्भा इत्यादि धमनीव्यवस्था-विकृतिदर्शक पीडा होतात

रुग्ण —पुरुष, वय ३२ वर्षें, जात ब्राह्मण, धंदा नोकरी. लक्षणें—(१) दौर्बल्य व शक्तिपात त्यातच पांडुत्व हें लक्षण फार पूर्वीपासूनच होतें. (२) त्वक्वैवर्ण्य

(bronze mahogany colour), विशेषत तोंड, पाय, हात ह्यांचेवरच जास्त. (३) बद्धकोष्ठ दर आठ दिवसानी रेचक घ्यावेंच लागतें; कितीहि कमी खाल्ले तरी हें लक्षण आहेच असें रोगी सागत असे. (४) पायांवरच बरीच सूज दिसत होती.

**भेदकनिदान** ---रुग्णातील वैवर्ण्य अधोलिखित रोगात शक्य असते, परंतु त्या दृष्टीनें पूर्वरूप किंवा रूपावस्थेत सभव दिसत नव्हता (१) कामला (२) मलेरिया (शीतपूर्वक विषमज्वर) (३) सोमल विषजन्य विकार (४) वृक्करोग.

अशा स्वरूपात व्याधींचे व्यवच्छेदन झाल्यावर वरील लक्षणावरून " ऊर्ध्ववृक्कग्रंथि-विकृति " असें निदान झाले (disease of the supraienals).

**चिकित्सा** ---प्रथमत· रुग्णानें अष्टमूर्ति घेतला होता पण त्याचा उपशय दिसला नाही दवाखान्यात रोगी आल्यावर शोथ हें प्रमुख लक्षण घेऊन पुनर्नवा ६ गुंजा + रसायन हरीतकी† ६ गुंजा + उन्हाळ्याचे औषध ४ गुंजा, पुड्या चार, चार वेळा मोरावळ्यात ही औषधियोजना केली पण १०-१२ दिवसामध्ये काहीच गुण दिसेना तेव्हा वरीलप्रमाणे निदान केलें व चिकित्सा खालीलप्रमाणे केली हा व्याधि कष्टसाध्य असल्यामुळें औषध बरेच दिवस घ्यावें लागलें.

**चिकित्सा** —१ आरोग्यवर्धिनी ४ गुंजा (चार पुड्या) दर तीन तासानी मोरावळ्याचे पाकात २ सूक्ष्म ताम्रभस्म १ गुंज (एक पुडी) सकाळी मधात

पथ्य आहार —दुग्ध विशेष, पालेभाज्या अपथ्य· —दिवास्वप्न, व्यायाम.

---

## (१४२) तीव्र शीर्षशूल

रोगी स्त्री, वय वर्षे ३०, जात मराठा एक महिन्यापूर्वी डोकें दुखणे, अन्नपचन होत नाही व तोंडाचा (स्वत स) वास येतो ही लक्षणे रोग्याच्या कारणांची चौकशी करिता रोग्यास रोगकारक असें कोणतेच कारण सागता आलें नाही.

रोग्याचा डोकें दुखणें हा वास्तविक प्रधान व बरेच दिवसाचा विकार बाकीची लक्षणें तदनुषगानें निर्माण झालेली; पण त्यानें तसें प्रथम सांगितलें नाही त्यामुळें लक्षणावरून कोष्ठस्थ पचनविकार प्रधान समजून सामदोषामुळे उत्पन्न झालेलें शीर्षशूल हें गौण लक्षण असावें व तोंडाचा वास येतो (पित्तं विस्रं) यावरून या पचनव्यापाराच्या अव्यवस्थेंत पित्तदोष प्राधान्यानें दुष्ट असावा असा विचार करून साम पित्तदोषास निराम करून पचनव्यापार ठीक करणारी पाचकगुटी हा आमलकीकल्प तीन दिवस अपानकाली व समानकाली घेण्यास दिला

---

†गोमूत्रसस्कार केलेल्या हिरड्याचें चूर्ण

या औषधानें तोंडाचा (स्वत स) वास येणें नाहींसें झालें व अन्नपचन क्रिया सुधरून पोट फुगणें थांबलें व शौचासहि साफ होऊं लागलें. डोकें दुखणें मात्र पूर्वीप्रमाणेंच चालू राहिलें त्यावर स्वप्नकालीं दुधखडीसारखेत लघुसूतशेखर दोन प्रहरीं दोन वेळा मोरावळयात प्रवाळमाक्षिकमिश्रण व सकाळीं शोधनार्थ स्वादिष्टविरेचनचूर्ण हीं पित्ताचीं शमन व शोधनद्रव्यें तीन दिवस दिलीं. तथापि शिर शूल बिल्कूल कमी झाला नाही

अशा रीतीनें केवळ दोषानुरोधानें पोटात दिलेल्या औषधींचा अनुपयोग पाहून वरील सर्व औषधें बंद केलीं व दोषदूष्यविचारपूर्वक स्थानिक चिकित्सा करण्याचें ठरविलें.

विशेष चौकशी करिता असें समजलें कीं, प्रस्तुत रोग्याचें डोकें गेले दोन महिन्यापासून दुखत आहे. दुखण्यास प्रारंभ दोन्ही भुवयापासून झाला त्यावर विडा घातला पण उपयोग झाला नाही प्रथम ८ दिवस फक्त दिवसा डोकें दुखे, पुढें रात्रींहि दुखू लागलें त्यामुळे झोप बिलकुल येईना (अनिद्रता) जागरणाचा परिणाम अन्नपचनावर झाला व स्वभावहि चिडचिडा बनला (दुखन्यास कळून येणारें तापासारखें काहीच लक्षण नसल्यामुळे) घरातील माणसें व शेजारी "या वाडेस वेड लागलें" असें समजू लागले इतका स्वभावात फरक पडला होता रोग्याचें सर्व डोकें, मानेचे स्नायु हेंहि दुखत रोगी मानेपासून मुंडकें तोडून टाका असें म्हणे रोग्याचें तोंडहि कोरडें पडत असे (आस्यशोष, अ हृ सूत्र २०।४)

वरील सर्व लक्षणें शिरस्थ तीव्र वातप्रकोपाची असून त्यास पित्ताचा ईषत् अनुबंध आहे सर्व शिरोरोगात रक्तधातु हा दोषाचें आश्रयस्थान असतोच (शिरसि अस्र च दुष्यति । चरक सूत्र १७।११)

हा दोषदूष्यसंबंध लक्षात घेऊन जवळचा परिणामकारक उपचार या दृष्टीनें त्यावर नस्य देणें इष्ट समजून बृंहण नस्य देण्याचें ठरविलें (अ. हृ सूत्र २०।४) रक्ताला बृंहण रक्तच, शुद्ध रक्ताचें नस्य या ठिकाणी उपयुक्त झालें असतें (अ हृ सूत्र २०।६). पण तें सहज उपलब्ध होणारें नसल्यामुळे रक्ताच्या समान गुणाचें केशर १ गुंज खलून कोमट तुपाबरोबर नस्यार्थ दिलें अनुबंधी पित्ताचें शमन व्हावें म्हणून त्यात थोडी साखर मिसळली होती (शर्कराकुंकुमशृतं घृत पित्तासृगन्वये । अ हृ उत्तर २४।७)

दोन दिवस सकाळी मध्याकाळी (अ हृ सू २०।१५) हें शर्कराकुंकुमघृत नस्यविधीनें नाकात सोडताच या मधुर, स्निग्ध व वीर्योष्ण चिकित्सेनें शिरोगत वातदोषाचें शमन झालें शीर्षशूल अजिबात नष्ट झाला. अर्थात् त्यामुळे उत्पन्न झालेलें स्वभाववैगुण्य हेंहि नाहीसें झालें

[ हें कुंकुमनस्य तीव्र शीर्षशूलाच्या विविध प्रकारात वापरलें असून तें गुणकारी ठरलें आहे. सतत जागरणामुळे अगर अतिअभ्यासामुळे उत्पन्न झालेला तीव्र शिर शूलहि यानें

नष्ट केला आहे सुवर्णसूतशेखर, महावातविध्वस, महायोगराजगुग्गुळ, caffeine citrate, aspirin ही औषधे घेऊन जे भयंकर डोके दुखणे थाबले नाही, ते या नस्याने लीलेने घालविलें आहे शमननस्य म्हणूनहि याचा उपयोग मुखदूषिका, नीलिका, व्यग या व्याधीवर करून पाहण्यासारखा आहे. (अ हृ. उत्तर ३२।३२)

औषध मिळण्याला व घेण्याघेण्यालाहि सोपें आहे. केशर व साखर एकत्र खलून ठेवावी व ऐनवेळी चमच्यात ४-६ थेंब ऊन तूप घेऊन त्यात १ गुज पूड मिसळून त्याचे नस्य करावे अर्धावभेदक (अर्धशिशी) व सूर्यावर्त या विकारावरहि याचा चागला उपयोग झालेला आहे अर्धशिशीत जी बाजू दुखत असेल त्याच्या उलटबाजूच्या नाकपुडीत हे थेंब सोडावेत केव्हाहि दोन्ही नाकपुडीत थेंब सोडणे उत्तम ]

---

## (१४३) चक्षुर्वैशेषिक–पित्तदुष्टि

रोगी पुरुष, वय ५७, ब्राह्मण, वकील, रा खानदेश (उष्ण हवा). रुग्ण चागले सुशिक्षित पदवीधर व उच्च कुळातील असून त्याची तक्रार डोळ्यासबधी होती. काही दिशाकडे पाहिले असता त्याना एका पदार्थाचे दोन पदार्थ दिसत असत. विशेषत. खाली, बरेच वर, तिरक्या बाजूला पाहिले असता एकाचे दोन दिसणे ही क्रिया अधिक होत असे डोळ्यात इतर वैगुण्य कोणतेहि नव्हते. आम्ही निदान करताना **चक्षुरिंद्रियातील आलोचक पित्तापैकी चक्षुर्वैशेषिक पित्त क्षीण झाले** असून त्यामुळें दृष्टीने एखादा विशिष्ट पदार्थ ज्ञात होण्याकरिता जे दृष्टीचे केंद्रीकरण व्हावे लागतें ते होऊं शकत नाही असे निदान केले आणि **दिवसातून फक्त एकच वेळ तीहि प्रात काळी** घेण्याच्या औषधाची योजना केली. औषधयोजना—**सुवर्णमाक्षिक भस्म** १ गु + **त्रिफळाचूर्ण** ४ गु , पुडी एक, तूप व मध (विषम प्रमाणात) यातून सकाळी

हे औषध सुरू केल्यापासून सुमार एक आठवड्यातच रोग्याच्या दिसण्यात फरक दिसून येऊ लागला आणि एक महिन्याच्या अवधीत रोग्याची ही तक्रार साफ मिटली आयुर्वेदीयाना नेत्ररोगाची चिकित्सा त्रिदोष पद्धतीने दोषप्रत्यनीक अशी चागली सुकरत्वाने करता येते, हेंच वरील रुग्णचिकित्सेवरून सिद्ध होण्यासारखे आहे

---

# ( १४४ ) डोळ्यांत पडलेलीं फुलें (शुद्ध, शुक्र)

## (Opacity of the Cornea)

रोगी मुलगा, शीख, वय वर्षे १३. शरीरप्रकृति मुदृढ, गृहस्थिति बरी. डोळ्यात पड-लेल्या फुलामुळें मुलाची दृष्टि जात चालली व त्यावरील आंग्ल औषधि उपाय थकले, आता आयुर्वेदीय उपाय होईल तर पाहावे म्हणून मुलाचे वडील व चुलते मुलास घेऊन आले

रोगीपरीक्षा—मुलाच्या डोळ्याची दर्शनपरीक्षा करिता असे आढळून आले की, मच्या दोन्ही डोळ्याच्या पापण्यात अगर पांढऱ्या बुब्बुळात (शुक्लमडलात) काही दोष नाही उजव्या डोळ्याचे काळें बुब्बुळ ( कृष्णमडळ ) ह सर्व शखासारखे पांढरें बनले असून त्यामुळे त्याच्या मध्यभागीं नेहमी दिसणारी बाहुली (दृष्टि) दिसेनाशी झाली आहे. डाव्या डोळ्यातील काळ्या बुब्बुळावरील काही भाग असाच पाढरा झालेला असून यातील बाहुलीसमोर आलेले पटल उजव्या डोळ्याशी तुलना करता थोडें दिसत असे आहे

विकारस्थानी औष्ण्य, शैत्य वा मृदुता, स्वरता वगैरे काही नसल्यामुळें स्पर्शन करून पाहण्याची आवश्यकता नव्हती

प्रश्न विचारता मुलाने व मुलाच्या बापाने पुढील हकीकत सागितली गेल्या उन्हा-ळ्यात पिकलेले आंबे खाऊन मुलगा उन्हातून बराच भटकला (हेतु) यामुळें डोळे आले ( कफज नेत्राभिष्यद ) त्यावर हॉस्पिटलमध्ये परिचित डॉक्टरकडून १॥ महिना डोळे धुऊन औषधे घातली, पण डोळ्यातील लाली मोडली नाही व साधारण उजेडातसुद्धा डोळे चागले उघडता येईनात त्याच वेळी दोन्ही डोळ्यातील काळ्या बुब्बुळात पाढरे डाग (फूल) दिसूं लागल्यामुळे ते औषधोपचार बंद केले

पुढे हळूहळू डोळ्यातील लाली कमी होत गेली, पण उजव्या डोळ्यात कमी दिसू लागले त्या डोळ्यातील तो पाढरा डाग सारखा पसरत चालला, म्हणून गावातील दुसऱ्या एका नेत्ररोगतज्ज्ञ डॉक्टरास डोळे दाखविले व त्याच्या दवाखान्यात त्याचेकडून दोन महिने डोळ्यावर उपचार करून घेतले तथापि त्याचा काही उपयोग न होता त्या पाढऱ्या डागाने तो सपूर्ण काळा भाग व्यापला गेले ६ महिने या डोळ्याने काही दिसत नाही, इतकेंच नव्हे तर आसपास उजेड आहे का अधार आहे हेहि कळत नाही

गेल्या चार महिन्यात डाव्या डोळ्यातील पाढरा डाग (फूल) वाढतच चालला असून यानेहि दृष्टिमंडल व्यापले आहे रोगाचे गतीवरून लवकरच याहि डोळ्याने दिसणार नाही असे वाटत आहे

गेले दोन महिने दुसऱ्या एका हॉस्पिटलमध्ये या दोन्ही डोळ्यावर उपचार चालू होते पण ते व्यर्थ ठरल्यामुळें ऑपरेशन (iridectomy) हा एकच उपाय आता शिल्लक आहे, ते करून घ्या असे तेथील अनुभविक तज्ज्ञ डॉक्टरानी सागितले (या ऑपरेश-नने कृष्ण मडलास आलेली अपारदर्शकता नष्ट होऊं शकत नाही फक्त Iris वर

बाजूला एक नवे छिद्र पाडून तेथून आत retina वर प्रकाश जावा व दिसावे असा या शस्त्रकर्माचा उद्देश आहे.)

ऑपरेशन करून समाधानकारक दृष्टि प्राप्त होईल असा विश्वास न वाटल्यामुळे रोग्याचे वडील व चुलते आयुर्वेदीय चिकित्सेकडे वळले

**इतर सार्वदेहिक विकृति**—गेल्या वर्षात या मुलास दुसरा कोणताहि विशेष आजार झाला नव्हता. तथापि गेले ७-८ महिने मुलास सकाळी उठल्याबरोबर व दिवसा फार तहान लागत असे

**रोगाचे स्वरूप**—या विकारातील दोष कफप्रधान पित्तानुसारी ऊर्ध्वप्रवृत्त व कृष्णमंडल (cornea) स्थित आहेत डोळयात झालेला हा **संचय कफदोषाचा** आहे व कृष्णमडळ हा अवयव **अस्थिधातुघटित** आहे डोळयात वेदना, दाह, लाली, अश्रू वगैरे इतर कोणतेंहि लक्षण नाही आयुर्वेदीय परिभाषेप्रमाणे हे **अव्रणशुक्र** आहे यासच **शुद्ध शुक्र** म्हणतात

**उपचार**--(१) तृष्णा या लक्षणाने अनुमित होणारी वातपित्तदुष्टि दूर व्हावी व डोळयाकडे जाणारे दोष नाहीसे व्हावेत म्हणून **जेष्ठमध चूर्ण** २ गुंजा + **गोखरू चूर्ण** २ गुंजा + त्रिफला १ मासा अशा मिश्रणाच्या दोन पुडया करून त्या तूपमधात **सकाळी अनन्नकाली व रात्री स्वप्नकाली** घेण्यास दिल्या १० दिवसात या औषधाने तृष्णा हे लक्षण पूर्णपणे नाहीसे झाले

(२) डोळयात संचित झालेला कफदोष जाण्यास डोळा या इंद्रियास व इंद्रियाधिष्ठानास अपाय न करता होणारा कफदोषप्रत्यनीक उपाय हवा मिरे, पिपळी, मनशील, कुष्ठ व वेखंड ही तीव्र कफनाशक द्रव्ये डोळयात अशा युक्तीने वापरण्याकरिताच बनविलेला "**चंद्रोदयावर्ति**" हा शार्ङ्गधर संहितेतील नेत्रयोग प्रस्तुत शुद्ध शुक्र रोगावर चांगला उपयोगी पडेल हें जाणून त्याचें मधात उगाळून **सकाळी** (अ हृ सू २३। १६-१९) व **सायंकाळी अंजन** करण्यास सांगितले

चंद्रोदयावर्तीत वरील औषधाखेरीज **शंखनाभि**, सुरवारी हिरडा व **बेहडयाची मज्जा** ही नेत्रस्थ अस्थि, मास व मज्जा या धातूंना हितकर अशी द्रव्ये आहेत या सर्व औषधिचूर्णाचा खल शेळीच्या दुधात केलेला आहे **शेळीचे** दूध मानुषदुग्धाच्या खालोखाल गुणकारी असून ते कफदोष दूर करूं शकते हा त्याचा विशेष आहे **चक्षुष्य** हा प्रधान गुण असलेल्या मधात मिश्र करून या वर्तीचे केलेले अंजन नेत्रस्थ मांसवृद्धि वा कफवृद्धि उत्तम प्रकारे घालविते हें *अंजन लेखन* आहे

या चंद्रोदयावर्तीच्या अंजनाने पहिल्या आठ दिवसातच आपला प्रभावी गुण दाखविण्यास सुरुवात केली व २० दिवसात दोन्ही डोळयातील अर्धे अधिक शुक्ल नाहीसे झाले उजव्या डोळयानेंहि मुलास आता पदार्थ दिसूं लागले. औषधाचा परिणाम त्या मुलाच्या भाषेंत सांगावयाचें झाले तर-"**और पंधरह दिनोंमे आखे अच्छी हो जाती है।**"

---

# (१४५) वातरक्त

रोगी पुरुष, वय वर्षे २० धंदा बांधकामावर देखरेख करण्याचा पाच-सहा महिन्यापूर्वी उजव्या पावलास बाहेरच्या बाजूने करंगळीच्या जरा अलीकडच्या भागात आपोआप भेग पडली व त्यात पावसाचे पाणी शिरून १ महिन्यापूर्वी ती एके दिवशी मोठी झाली पाय (पाऊल) विस्तवाजवळ शेकला त्यामुळे भयंकर सुजला व वरची कातडी निघाली, पण विस्तवाचा चटका समजला नाही

वरील लक्षणावरून हा केवळ स्थानिक विकार नसून "वातरक्त' व्याधि असावा असा अंदाज करून रोग्याचा पूर्व इतिहास विचारला तेव्हा पुढील माहिती मिळाली.

नोकरी लागण्यापूर्वी सुमारें एक वर्षापासून रोगी अति जागरण करी दिवसरात्र मिळून ७-८ कप चहा घेई व १२-१५ सिगारेटस ओढी त्यामुळें डोळे लाल होत व जळजळ करीत सकाळी शिळी भाकर व तेलचटणी खाण्यात येई दिवसातून ३ वेळ जेवत असे शाळेत शिक्षकानी "मीठ खाल्ल्याने रक्त शुद्ध राहते" असे शिकविले असल्यामुळे मुद्दाम मीठ जास्त खात असे

१९३६ च्या जून महिन्यात पूल बांधण्याच्या कामावर असलेल्या मजुरावर देखरेख करण्याची नोकरी मिळाली तेथें दोन तीन महिने दिवसभर पाण्यात उभें राहावें लागत असे खाण्याचे हाल होत कधी कधी शेंगदाणे खाऊन भूक भागवावी लागे पुढे रस्ता-बांधणीवर देखरेख करण्याची कामगिरी आली त्यामुळे विशेष चालण्याची कधींच सवय नसता रोज १५ ते २० मैल सक्तीनें चालावेंच लागे त्यामुळे नोकरीवर लागल्यापासून ५ महिन्यानी सकाळी ९ पासून सायकाळी ७ पर्यंत दोन्ही पाय घोट्यापासून खाली बधिरलेले असत व त्याखेरीज इतर वेळी जमीन सुयाप्रमाणे पायास टोचे असा प्रकार ३ महिने चालला या काळात लेखी कामाकरिता मधून मधून रात्री चहा पिऊन जागरण करावे लागे

नतर एके दिवशी आपोआप करंगळीनजीक भेग पडली व आसपासचा भाग बधिर झाला पुढें करंगळी सुजली व रात्रीचे, भेगेंतून रक्त वाहू लागले हे रक्त घट्ट व काळसर वर्णाचे असे पाय जड पडून चालताना त्रास होई म्हणून ८ महिन्यानी नोकरी सोडली

भेग बरी होण्याकरिता पायास पाणी लागू देण्याचे बद केले व शेळीच्या तुपात तयार केलेलें एक मलम लावले त्याने भेग भरून आली, पण बधिरपणा पूर्वीप्रमाणेच कायम राहिला २॥-३ महिन्यानी भेग बरी होत आहे असें पाहून रोगी पायास पाणी लागू देऊ लागला पुन्हा भेग पडली व त्यातून चिकट पाणी वाहूं लागलें एक दिवस तर रानात गाराच्या पावसात रोगी सापडला त्यामुळे भेगेत चिखलपाणी शिरून भेग फारच मोठी झाली भेगेच्या वरच्या बाजूला एक मोठी गाठ आली व पिंढरीपर्यंत पायहि सुजला पुढे १५ दिवस थंडीताप येऊन गेला

डाव्या पायास टाचेजवळ भेगा पडल्या असून त्या पायाचा तळवा बधिर होता व आगठ्याजवळच्या पावलाच्या आंतील बाजूस मधून मधून अतिशय आग चाले.

अलीकडे तळहाताची व बोटांचीहि पातळ साल जाऊं लागली होती.

अति लवण, कटु रसाचें सेवन व अजीर्ण भोजन इत्यादि रक्तवृद्धिकर कारणें. लंघन, जागरण, असात्म्य आहारसेवन, अकाली भोजन, थंड पाण्यात उभें राहणे इत्यादि वातवृद्धिकर कारणे व चालण्याची संवय नसताना ( अचंक्रमणशीलानाम् ) दिवसभर उभे राहणे अगर १५-२० मैल चालणे ही तीन प्रकारची कारणें एकत्र होऊन हे **वातरक्त** निर्माण झाले ( चरकचिकित्सा २९-५।१० )

वातरक्त या विकाराचा रक्तधातु हा आश्रय असल्यामुळे **शेकणे** हा बहुधा **अनुपचारच** होतो. जेथे वातकफाचा अनुबंध या वातरक्त विकारात असेल तेथेंच कोमट लेप हे उपयोगी पडतात. ( अष्टांगहृदय चिकित्सा, २२-४० ) प्रस्तुत रुग्णाच्या वातरक्तात शेकण्यामुळे त्या ठिकाणी पोळल्याप्रमाणे फोड आले व सर्व पाय घोट्याच्या वरपर्यंत सुजला

**औषधोपचार** ( बाह्य ) —प्रथम पाऊल कडुनिंबाच्या कोमट काढयानें धुऊन काढून जखम स्वच्छ केली व त्यावर शोधन तेलाचा पिचू ठेवून पट्टा बांधला. दोन तीन दिवसात पोळलेलें सर्व कातडे निघून गेले. नतर करंगळीजवळ वरच्या बाजूने आलेली गाठ समूळ कापून काढली

या विकारातील मुख्य दोष म्हणजे पावलात झालेला रक्तसंचय हा होय. त्यावर वातप्रकोप न होईल अशा युक्तीनें म्हणजे वारंवार थोडेथोडें व अनेक ठिकाणाहून रक्त काढणे हीच योग्य चिकित्सा आहे प्रथम **सहचरतैलाने पादाभ्यंग** करून (**स्वेदन न करतां** ) दर ४-६ दिवसानी ४ **जळवा लावून** रक्त काढीत गेल्यामुळेच अल्पावकाशात ती जखम केवळ शोधन तेलाच्या पिचुबंधनानें भरून आली व सूज, जडपणा कमी होऊन स्पर्शज्ञान वाढण्यास त्याची मदत झाली

व्रणव्यतिरिक्त आग होत असलेल्या भागास व तळहातास लावण्यास महातिक्तक **घृताचा** उपयोग केला

**अभ्यंतर चिकित्सा** —वातरक्त विकारात वाताविरोधी रक्ताची व रक्ताविरोधी वाताची अशी चिकित्सा करावयाची असते ते कार्य **तूप** या स्नेहन द्रव्याने व **रिंगणी, डोरली, सालवण, पिठवण, गोखरू** या स्वादुपाकरसात्मक लघुपंचमूळानें उत्तम साधू शकते तेल वापरावयाचें असल्यास मधुर द्रव्यानी सिद्ध करून व साखरदुधाबरोबर चांगले मिश्र करून द्यावे लवण व अम्लरस वर्ज करावेत या विकारात मुख्यत मधुर व वातशामक तिक्त द्रव्ये गुणकारी होतात

वरील रोग्य.स थोड्याफार फेरबदलानें पुढील वनस्पतीचा काढा करून गाळून त्यात एक चमचाभर तूप टाकून पुन्हा एक कढ देऊन तो सघृतकषाय सकाळी सायंकाळी देण्यात येत असे

पटोल, सारिवा, मुस्ता, निंब, त्रिफला, काडेचिराईत, आवळकांठी, गुळवेल, शतावरी, आस्कद, दारुहळद प्रत्येकी ४ गुंजा व मनुका ५

या वनस्पतिसिद्ध तुपामुळे रुग्णीची जळजळ, रात्री १-२ वाजेपर्यंत झोप न येणे, इत्यादि पित्तज लक्षणे कमी झाली व अभ्यंतर स्नेहन चांगले होऊन वेळचेवेळी स्वाभाविक शौचशुद्धि होऊं लागली पचनहि सुधरलें इतकेंच नव्हे, तर गुडघ्यापर्यंत असलेली सूज व बधिरत्व क्रमाने कमी होत जाऊन स्पर्शज्ञान होऊ लागले. तळहातांची साले जाणे बंद झाले.

---

# (१४६) अति घाम येणें ( भृशं स्वेदः )

## ( पित्तावृत समान वायु )

रोगी, वय वर्षे १८ प्रकृति साधारण ( स्थूल नाही ). सर्वांगास पण विशेषतः तळहातापायास, सारखा घाम येतो ( सरदी ), गळून जातो अग्नि मंद ( अर्धी भाकरीसुद्धा खाल्ली जात नाही ) व शौचास साफ होत नाही रात्री ताप येतोसें वाटते गेली २-३ वर्षे डोळे व सर्व अंग अगदी लाल असते पण आग होत नाही दर उन्हाळयात तळहाताची साले जातात अशी लक्षणे होती

" घाम " हा मेदधातूचा " मल " आहे व उष्म्याचा ( पित्ताचा ) मेदावर परिणाम घडून तो निर्माण होतो हे मलविवेचनाचें कार्य समानवायूकडून होतें, ( चरक चिकित्सा २८।८ ) **स्वस्थ समानवायु वृद्धपित्तदोषाने आवृत झाला असता** अति घाम येतो, अंग थंड राहते व अग्नि मंद होतो ( अष्टांगहृदय निदान, १६।४४ ) तसेंच ज्वराचे दोष मेदोधातुगत असताहि " अति घाम " हे अवश्य आढळून येणारें लक्षण आहे ( अति घाम या लक्षणानें युक्त असलेल्या विषमज्वर व राजयक्ष्मा या विकारांचे दोष मेदोधातुगत असतात )

वरील रोग्यास आपल्या रोगाची कारणे सांगता आली नाहीत व तो परगांवचा असल्यामुळे ती शोधून काढण्यास सवड झाली नाही, तथापि लक्षणावरून पित्तामुळे वायु आवृत झाला आहे व ते दोष रक्त व मेद या धातूंत अधिष्ठित आहेत, असें अनुमान करून **रक्तधातुगतज्वरयोग** ( कडुपडवळ, उपळसरी, नागरमोथा, पहाडमूळ, कुटकी ) व **मेदोधातुगतज्वरयोग** ( काडेचिराईत, गुळवेल, पांढरा चंदन, सुंठ ) प्रत्येकी २ मासे काढा करून गाळून नंतर त्यात तूप टाकून पुन्हा एक कढ देऊन अनुक्रमें सकाळीं व सायंकाळी अन्नकाली घेण्यास दिलें. वरील औषधात कुटकी, गुळवेल व चंदन यांचे प्रमाण ४-४ गुंजा अधिक ठेवलें होतें

हे औषध १ महिना देण्यात आले पहिल्या आठ दिवसातच फरक पडत गेला व या उपचारानें आवरण दूर झाल्यामुळें स्वस्थ समानवायु आपली स्वाभाविक कामें करूं लागला त्याचा आहार १॥ भाकरीपर्यंत वाढला. शौचास साफ होऊं लागलें. ज्वर नाहीसा झाला झोप चांगली येऊं लागली. सुस्ती गेली घाम व अंगाची व डोळयाची लाली कमी झाली व तळहाताची साले जाणे थांबलें

औषधाचा परिणाम दीर्घकाल टिकाऊ स्वरूपाचा झाला नाही

---

## (१४७) श्वेत प्रदर (मेदोज)

रोगी स्त्री, वय वर्षे ३० गेल्या सहा महिन्यापासून हळूहळू वाढत गेलेला विकार प्रथम घाम, निरुत्साह, अन्न न जाणे, छातीत धडधड, मस्तक दुखणे गेल्या दोन अडीच महिन्यापासून पाढरा दाट प्रदर (विटाळाचे ४ दिवस सोडून) सतत चालू योनीमुखांत बारीक पाढरा पुरळ व भयंकर खाज ही लक्षणे

या श्वेत प्रदरात कटूकारक अशा (कफ) द्रव्याचा स्राव अपान-दुष्टीमुळे होत असला व प्राणदुष्टीमुळे छातीत धडधड, मस्तक दुखणे ही लक्षणे होत असली, तरी या प्राणापान-दुष्टीस मूळ कारण **पित्तावृत समानवायु** हा आहे त्या आवृत समानवायूचा मेदधातु व अपानवायु याजवर परिणाम होऊन द्रवमेदाचा स्राव योनीमार्गानें होत असला पाहिजे (योनीमार्गानें होणाऱ्या सर्व प्रकारच्या पाढऱ्या रगाच्या स्रावास व्यवहारात श्वेत प्रदर ही एकच सामान्य सज्ञा लावण्यात येत असली, तरी रस, मास, अबु, मेद, स्नायु, मज्जा, शुक्र, कफ यापैकी एखाद्या प्रकारचा तो स्राव असतो व त्यास द्रव्यभेदानें भिन्नभिन्न अशी औषधें लागू पडतात ) असें अनुमान करून या रोग्यास २ मासे **मेदोगतज्वर-योगाचा** काढा तूप घालून सकाळी सायकाळी अनन्नकाळी घेण्यास दिला. विकारात कफाचा अनुबध आहे म्हणून कफपित्तशामक असे **इद्रजवचूर्ण** ४ गुंजा त्या मेदोयोगा-बरोबर काढ्यात घालण्यास दिले होतें

"खाज" या त्रासदायक लक्षणाचा बाह्य उपचारानें तात्कालिक उपशम करावा या उद्देशानें २ मासे **इद्रजवचूर्ण** ऊन पाण्यात मिश्र करून त्याचे मधून मधून धावन कर-ण्यास सागितले होतें पुरळावर लावण्यास **पारिभद्रादि** मलमाचा उपयोग करण्यांत आला

या योजनेचा परिणाम ५ दिवसातच दिसून आला व १० दिवसाच्या उपचारानें घाम, डोकें दुखणें, छातीतील दु:ख ही लक्षणें अजिबात नष्ट झाली. अग्नि सुधरला. श्वेत (मेद) प्रदर नाहींसा झाला खाज अल्प प्रमाणात शिल्लक राहिली पुढील १५ दिवसात रोग्यास स्वास्थ्यलाभ झाला

---

# (१४८) बालरोग

रोगी मूल, वय ६ महिने आध्मान, कास, ताप, छातीत कफ दाटलेला, कण्हणें ही लक्षणें रुग्णाचें वय अगदीच अल्प असल्यानें त्याच्याकडून आणखी काही तक्रार कळणें कठीण होतें तपासता ज्वरोष्मा ९९° होता व आध्मान फार प्रमाणात असून उर स्थानहि कफपूर्ण असावेसें दिसत होतें कासाचा स्वभाव डाग्याखोकल्याप्रमाणे होता कासाच्या त्रासामुळे रुग्णाचा चेहराहि अस्वस्थ वाटला अंगावर गोल कडेला काळसर व मध्ये पांढरट असे डाग दिसले नाडी जरा क्षीण वाटली

मुलाच्या आईकडे तपास करिता मुलास १८ दिवसांपूर्वी काजिण्या येऊन गेल्या असल्याचें कळलें. अंगावरील डाग त्याचेच होते दुसरी एक गोष्ट अशी की सदर रुग्णास ८-८ दिवस शौचास होत नसे

या अवस्थेंत (१) कफोपलिप्त कोष्ठाचें अनुमान करून कफस्रावी व कफविरेचक असें, (२) कास कमी करणारें, (३) उर स्थानस्थित कफाची स्थिरता कमी करणारें, (४) काजिण्याचे शेष दोष निघून जाण्याकरिता उपयुक्त व (५) आध्माननाशक असें पुढील मिश्रण दिलें प्लीहोदरारि २ गुंजा + गोरोचनमिश्रण २ गुंजा + सौवर्चल १ गुंज ही औषधे एकत्र करून त्याच्या ३ पुड्या करून त्या तीन वेळ मधात देण्यास सांगितलें याप्रमाणे २ दिवस हे औषध दिलें

या मिश्रणाचा तिसऱ्या दिवशीचा परिणाम —चिकट असें शौचास झालें ज्वर कमी झाला आध्मानहि कमी झाला पण कास तिळमात्रहि कमी झाला नाही मात्र पिच्छिल अशा कफाच्या शोधनानें कफाची घरघर कमी झाली होती उबळ मात्र सारखी येत होती

या अवस्थेत पूर्वीची योजना बंद करून वातक्षोभजन्य कासाच्या अवस्थेंत कासक्षोभ कमी करणाऱ्या द्रव्याची अपेक्षा असल्यानें अशा विशिष्ट कासात क्षोभ कमी करणारें असें डाग्याखोकलामिश्रण १-१ गुंजेच्या ६ पुड्या करून दर २ तासांनी अंगावरच्या दुधातून दिलें व कोष्ठशोधनार्थ रात्री प्लीहोदरारिचूर्ण १ गुंज अंगावरच्या दुधात स्वतन्त्रपणे दिलं

याचा अगदी आश्चर्यकारक परिणाम झाला रोग्याच्या उर स्थानाचा क्षोभ नाहीसा होऊन कासहि नाहीसा झाला शौचास साफ होऊं लागलें रोग्याची त्रासिक मुद्रा जाऊन तो हसूंहि लागला ज्वर कमी झाला व त्याचे स्वास्थ्यसातत्य राहिलेसें स्पष्टपणे दिसू लागलें हाच उपक्रम आणखी ४ दिवस ठेविला रोगी वरील लक्षणातून पूर्ण बरा झाल्यानंतर बलाकरिता व पचनसंस्थाबलाकरिता अरविंदासव देण्यात आलें डाग्या-खोकलामिश्रणातील वेलदोड्यानें कासवेग कमी होतो वंशलोचनानें कफगौरव कमी होतो उर स्थानाला बल मिळतें प्रवाळ व गुळवेलसत्वानें ज्वर कमी होतो

यापुढे सदर रोग्यास बल्यचिकित्सेची जास्त आवश्यकता होती. कारण सातवा महिना दंतोत्पत्तीच्या दृष्टीनें महत्त्वाचा असल्याने त्यांत मुलाचें बल टिकवावें लागते व अस्थिवर्धनार्थहि द्रव्य द्यावे लागतें त्याचप्रमाणे पचनसंस्था व धातुपरिपोषण ही व्यवस्थित होण्याकरितां अरविंदासव हें उत्तम उपयोगी पडतें

---

## (१४९) कफरोधजन्य वातविकार

रोगी स्त्री, वय ३२ वर्षें, परगावची राहणारी तिला गाडीत घालून आणलें तेव्हां ती बेशुद्धच होती. नंतर उचलून घरात ठेवलें रोगी पाहिला तेव्हा सायंकाळ होती.

रोग्याची स्थिति उठून बसण्यासारखी नव्हती. प्रत्येक श्वासोच्छ्वासाबरोबर कण्हणें एकसारखें सुरू होतें. श्वास दर मिनिटास ६५ ते ७०, शरीराची उष्णता ९८$\frac{1}{5}$°, stethoscope नें छाती तपासली तो सर्वत्र दोन्ही फुफ्फुसात rhonchi स्पष्टपणें ऐकूं येत होतें. त्याची स्पष्टता डाव्या फुफ्फुसात अधिकच दिसून आली

रोग्याची हकीकत विचारता छातीत चमका निघतात व त्याहि डाव्या भागात असें सांगण्यात आलें त्यामुळें प्रथम हृद्रोगाचा ( mitral regurgitation ) संशय आला होता तो दूर झाला हया चमका, खोकला आला की निघत असत खोकला कोरडाच येई रोग्याला जेवण मुळीच जात नसे दोन जणानी बसवून धरून ठेवल्या-वर एकाने दूध वगैरे पातळ पदार्थ तोंडात ओतावे लागत होते बसविलें की फार त्रास होई नुसतें शौचास उठून बसणेंसुद्धा फारच त्रासाचें होई व त्यामुळें श्वसनवेग वाढत असे.

या ठिकाणी शूल हें लक्षण वातजन्य ( शूल तु विगुणोऽनिल ) असून तें उरःस्थानात ( कफस्थानात ) होतें अर्थात् दोन्ही दोषाचें शमन व विशेषेकरून कफाचें संशोषण होण्यासाठी औषध देणें जरूर होतें कारण येथे वात हा आगंतु दोष कफाच्या रोधा-मुळे प्रकुपित झाला होता म्हणून प्राणोदान वायूच्या मार्गातील कफाचा अडथळा दूर करण्यास कफसंशोषक अशा **समीरपन्नगाची** पुढीलप्रमाणे योजना केली

**सूक्ष्म समीरपन्नग** २ गुंजा + **यष्टिमधुरसक्रिया** २ गुंजा, १ पुडी आल्याचा रस व मध यातून चाटण प्राणकाली ( रात्री ).

या योजनेचा परिणाम रात्रीतूनच झाला व दुसरें दिवशी श्वसन थोडें कमी झालें व कासहि पूर्वीइतका त्रासदायक राहिला नाही. परंतु आस्कल्टेशननें rhonchi ऐकूं येतच होते म्हणून पूर्वीचाच योग दुपारी व रात्री प्राणकालींच दिला. यानंतर तिसरें

दिवशी मात्र श्रमन बरेच कमी झाले, चमका अजिबात थांबल्या व खोकल्याहि आला नाही रोगी शुद्धीवर आल्यामुळें "मला येथे केव्हा आणलें ?" अशी पृच्छा करू लागला आता तापहि उतरला होता व श्वसनहि मर्यादित होते फक्त अरुचि होती म्हणून तालिसादि चूर्ण २-२ गुंजा ३ पुड्या रसायन, व्यान व उदान या काळी घेण्यास दिल्या या औषधानें रोगी पूर्ण बरा झाला औषध सुरू असेपर्यंत केवळ दुग्धाहारच त्यास सांगितला होता

---

## (१५०) सान्निपातिक ज्वरांतील एकदम उतार

सान्निपातिक ज्वर कित्येक वेळा एकदम नाडी क्षीण होऊन, घाम सुटून उतरतो तर कित्येक वेळा हळूहळू ज्वर कमी कमी होत जातो नाडी एकदम क्षीण होऊन व घाम सुटून ज्वर कमी होऊ लागला तर ते चिन्ह पुष्कळ वेळा प्राणघातक होते परंतु आयुर्वेदीय चिकित्सेने याहि बाबतीत रुग्णाचे प्राण वाचविल्याची उदाहरणे आहेत ज्वर एकाएकी उतरूं लागणे, सर्वांगास घाम सुटणे, तो अगदी गार असणे, तीव्र घाबरणे, गुदमरल्यासारखे होणे, नाडीचा वेग मंद असणे, नाडीचे ठोके दर मिनिटास साठाच्या खाली असणे, परंतु इतके असूनहि बेशुद्धि किंवा बडबड वगैरे नसणे अशा प्रकारची लक्षणे असतां लक्ष्मीविलास गुटी १ गुंज+मृगशृंग भस्म १ गुंज+सुवर्णमाक्षिक भस्म १ गुंज+मोरावळ्याचा पाक ½ तोळा यांचे चाटण वरचेवर द्यावे व त्यानंतर अर्जुन कल्प १ तोळा+शुद्धोदक ८ तोळे चार भाग करून प्रत्येक वेळी चाटणानंतर १ १ भाग द्यावा या योजनेने फारच उत्तम तऱ्हेने व लवकर रोगी सुधारतो

---

## (१५१) पक्षवध व हस्तकंप

एका गृहस्थाना ४-५ वर्षांपूर्वी अस्राभिनोदनवृद्धीचा विकार झाला त्याचाच परिणाम होऊन एक पक्षाघात झाला परंतु ही स्थिति सुसह्य होती आम्ही त्याना पाहिले त्या दिवशी पक्षवध पूर्ण होता तोंडातून लाळ गळत होती बोलण्याचा प्रयत्न करूनहि एक अक्षर उमटत नव्हते गिळण्याचा प्रयत्न केला असतां गिळणें शक्य नव्हते

मनस्वी खोकला. अंगग्लानि फार शौचास साफ झालेले नव्हते डोळे लालसर सुजून आल्यासारखे. डोके भयंकर दुखत होते. जिव्हा बाहेर काढण्याची बिलकुल ताकद नसल्याने तोंडहि उघडण्याची पंचाईत सर्व चेहरा उमसून आल्यासारखा गळयाचा भाग बाहेरून सुजल्यासारखा फुप्फुसे नेहमीप्रमाणे हातास सारखे कापरे भरल्यासारखे असून हात कापत होता नाडी मात्र जोरदार, भरदार, टचटचीत व अगदी पूर्ण अशी. अन्नाभिनोदन वाढलेले. या प्रकारचा रुग्ण केव्हा एकदम खालावेल याचा नियम नसतो. या रोग्यास सुधारण्याकरिता (प्रत्याख्येय सागून) चिकित्सा लिहून दिली ती.—

**सारिवा मूळ** ६ मासे+**जेष्ठमध** १ तोळा, यात अर्धा शेर पाणी घालून अष्टमांश काढा करून देणे त्याचे अगोदर **शुद्धशिलाजतु** १ गुंज+**मृगशृंग** १ गुंज याचे सारखे दोन भाग करुन एक भाग मोरावळयाच्या पाकात देणे रात्रीच्या वेळी "**स्वादिष्ट विरेचन चूर्ण**" सहा मासे, पाण्यात देणे

याप्रमाणे केलेल्या चिकित्सेने एका आठवडयात पुष्कळ फरक पडला एका महि-न्यात रुग्ण व्यवहार करूं लागला सर्व लक्षणे कमी झाली पक्षवध व हस्तकंप मात्र अद्याप आहे. रोगी हल्ली बरा असला तरी **प्रत्याख्येयच**

---

## (१५२) दृष्टिमांद्य व अर्दित (Facial Paralysis) (शोकज)

रोगी स्त्री, ब्राह्मण, सुस्थवस्तु, वय ४५ वर्षे गेली ५ वर्षे डोक्याचा उजवा अर्धा भाग मधून मधून दुखे. गेले ६ महिने हे डोकेदुखीचे प्रमाण वाढले या चैत्रापासून उजव्या डोळयाने समोर सारा, जाळे आल्याप्रमाणे अस्पष्ट दिसूं लागले उजवा डोळा झाकता येईना त्यातून पाणी येण्याचे थांबले एक महिन्यापासून जीभ, ओठ व खालचा जबडा डावीकडे वळला असून, फुंकणे, चूळ थुंकणे, बोलणे वगैरे कर्मे करण्यास कष्ट पडत आहेत . शरीराचा सर्व उजवा भाग ओढ लागल्यासारखा व जड गोळा झाल्यासारखा झाला आहे. ही मुख्य लक्षणे होती

**रोगाची हकीगत**—गेल्या ८ वर्षात बाईची मोठी झालेली अशी ६ मुले वारली व पतिराजास व्यापारात बरेच नुकसान आले. त्या शोकाचा परिणाम हळूहळू वातदोषा-वर होऊन उजवे अर्धे डोके दुखण्यास प्रारंभ झाला त्याच भागात मधून मधून वारंवार चुणचुण, आग होत असल्याचा भास होई यावर "चंद्रकला' या औषधाचा उपयोग केल्याने काही दिवस तात्पुरते डोके दुखणे कमी वाटे

पुढें उजव्या डोळयास ओढ लागूं लागली व दिसेना म्हणून आधुनिक पद्धतीनें नेत्र-वैद्याकडून opthalmoscope ने डोळा तपासून घेतला व डोळयात औषधेंहि घातली नेत्रपटलात स्थानिक विकृति काहींच नसून हा मानसिक (hysterical amaurosis) विकार आहे असें डॉक्टराचें मत पडलें व त्यावर त्यानी पोटात घेण्याकरिता neuro-phosphates इत्यादिची योजना केली. या कल्पनाचा उपाय न होता पापणीची स्वाभाविक हालचाल थांबली व तो डोळा निस्तेज भासूं लागला

अर्दित.---तोंड वाकडें झाल्यापासून तर विकार सारखा वाढत जात आहे हें लोकांच्या चांगलेंच दृष्टोत्पत्तीस आलें व केवळ मानसिक विकार म्हणून असेंच दुर्लक्ष केल्यास उजवे अंगास अर्धांगवायु होईल अशी भीति वाटूं लागली. या वेळी कमरेपर्यंत पाठीच्या सर्व उजव्या अर्ध्या भागात ओढ लागत असे, चमका निघत व पायास रात्री मुंग्या येत. यावर "एकांगवीर" या औषधाचा उपयोग करण्यात आला, पण परिणाम दिसला नाही

वरील मुख्य लक्षणाबरोबरच घशाला कोरड, रात्री लौकर झोप न येणें व रात्री २ च्या पुढें मारखी तगमग (बेचैनपणा), तोंडास (जिभेस) तिखट लागू न देणें, सर्व अंग दुखणें, सर्वांगास नेहमी थोडाथोडा घाम येणें, त्वचेच्या ठिकाणीं थोडा लालसर काळसर-पणा, सकाळी उठल्यावर व दिवसभर तोंडास चिकटा, भूक नाहीं, पोटात वात धरलेला (गुबारा), थकवा इत्यादि त्रासदायक लक्षणे होती

या रुग्णात शोकामुळें मनोदुष्टि न होता केवळ शरीरस्थ वाताची वृद्धि झाली आहे (कामशोकभयात् वायुः वृद्धि एति) व ती प्राधान्यानें ऊर्ध्वजत्रुस्थ आहे, म्हणून वात-शमन असें सहचर तेलाचे (२-२ थेंब) नस्य दोन्ही नाकपुड्यात सकाळी, मध्यान्हकाळी सायंकाळीस दिलें (शोकजन्य व्याधीत रक्तधातूचा अनुबंध असतो म्हणून त्या तेला-बरोबर प्रथम काही दिवस नितर्कच दूध मिश्र करण्यात येत असे) पोटात घेण्यासहि ११ मासा सहचर तेल (अ. हृ. चि २१-६८) सकाळी सायंकाळीं घेण्यास दिलें सहचर सहचर कानात सहचरतेलाचे ४-४ थेंब टाकण्यास सांगितलें होते

सहचर तेल मुख्यत कोऱ्हांटीचे पंचांग दशमुळें व शतावरी ह्या वनस्पतींच्या रसांत सिद्ध केलेलें असून त्यात कल्काकरिता वाळा, कोष्ठ इत्यादि सुगंधी वात-शामक द्रव्यें वापरलीं आहेत सिद्ध करताना त्यात तेलाइतकेंच दूध घातलें जात असल्यामुळें रक्तादि धातुगत वातविकार व मनोविकार (उन्माद) यावर त्याचें चांगलें कार्य होतें परंतु रुग्णानें चालनीत आहारविहारात पथ्य न पाळताहि सहचर तेलाच्या नस्याने (२ थेंब) नस्यानें त्यानंमानें पण निश्चित गुण दाखविला

या उपायांना उत्तम रीतीनें आठवड्यांच्या आंतच आला आश्चर्याची गोष्ट अशी कीं उजव्या डोळ्यास अल्पशा तरी आज्ञा दृष्टि चांगली सुधारली व तो डोळा [illegible] पूर्वी नासिकाच्या बहुतेक प्रसमु व दुय्यम [illegible] हळूहळू अजिबात नष्ट झालीं

शोकाखेरीज दुसरे कोणतेंहि व्यक्त असे वातप्रकोपक कारण न आढळल्यामुळे प्रारंभी हा रक्तावृत (नुकताच विटाळ बंद झाला असल्यामुळें), मेदावृत वा कफावृत वायुविकार तर नाही अशी शंका वाटत होती व त्याकरिता रक्तयोग, मेदोयोग याचा उपयोग केला होता. त्याचा विशेष फायदा न वाटल्यामुळे केवळ वाताच्या चिकित्सेवर भर देण्यांत आला व त्यानें स्वणास आराम वाटला

---

## (१५३) अलजी पिटिका (प्रमेहविरहित)

रोगी पुरुष, शेतकरी, वय ६५. मानेवर केसात एक लाल पुटकुळी उठली असून तिच्या आजूबाजून रात्रदिवस भयकर आग होत होती

**रोगाची हकीकत**—१५ दिवसापूर्वी ही पुळी आली असून आसपासचा भाग भाकरीप्रमाणे दडस व वर उचलून आलेला होता ती सूज वाढत वाढत जाऊन पुढे गळाभर व पाठीच्या वरच्या बाजूसहि पसरली. या पुटकुळीबरोबरच अंगात ताप भरण्यास सुरुवात झाली ज्वरमान तीव्र असे. या दुखण्यावर ग्रामस्थ उपचारकानें दोन दिवस रोज २५-२५ जळवा लावल्या व मलमहि लावण्यास दिला पण त्या मलमानें आग कमी न पडता उलट जास्त वाढे. रोगाचे हे अपरिचित स्वरूप पाहून "करणी केली असेल' अशी शंका निघाली व त्याचेहि उपाय करून पाहिले.

मानेवर होणारी ही आग रात्री १२ ते २ या कालात फारच त्रासदायक होई त्याच वेळी तळपायाची फार आग होत असे.

पिटिका व भयकर आग या लक्षणावरून कदाचित् लघवीतून जाणारी साखर ही याचे कारण असेल असे वाटून आंग्लपद्धतीने मूत्रपरीक्षण करण्यात आले, पण त्यात साखर आढळून आली नाही

**औषधियोजना**—या रोग्यास शिलाजतु $\frac{1}{2}$ गुज + नागभस्म $\frac{1}{2}$ गुज अशा २ पुडया करून त्या सकाळ-सायंकाळ केवळ दुधातून दिल्या जात आहारात पिठुळ पदार्थ व साखर वर्ज्य केली होती. दूध व भाकरीचा मगज हे अन्न दिले जात असे

मानेवरील पुटकुळी आता फुटलेली होती, म्हणून त्यावर दिवसातून २ वेळ शोधन तेलाचा व्रणपट्ट बाधला जात असे

या उपायानें आग शमन पावण्याऐवजी जास्त वाढल्याचीच लक्षणे दिसूं लागली व रोग्यास पित्तज अतिसार सुरू झाला झोप अजिबात उडाली व रोगी रात्री वेदनामुळे

बेसान होऊं लागला   वरील औषधाशिवाय दोन वेळ अर्धाअर्धा तोळा सारिवासव देण्यात येऊं लागलें, पण त्याचा दाहशामक परिणाम झाला नाही

हा अनुपशय लक्षात घेऊन केवळ मधुमेहव्याधिप्रत्यनीक असा समजला जाणारा शिलाजतुप्रयोग बंद करून दोषव्याधिप्रत्यनीक असे सुवर्णमाक्षिकभस्म १-१ गुंज दिवसातून तीन वेळ देण्याचें व व्रणाभोंवती कांही दिवस महातिक्तकघृत लावण्याचें ठरविलें या उपायानें आग आटोक्यात आली, अतिसार थांबला व मानेवरील आगीच्या जागी मोठा व्रण होऊन त्यातून दुर्गंधयुक्त मेदप्रधान असा पू वाहूं लागला   हा व्रण ५ इंच आडवा व ४ इंच उभा होता   आता व्रण शुद्ध राहण्याकरिता व्रणावर शोधन तेल पिचू ठेवून बांधण्यास प्रारंभ केला   त्यामुळें व्रण जिभेसारखा स्वच्छ लाल राहूं लागला   जखम दिवसातून दोन वेळ स्वच्छ करणें चालूच होतें

सुवर्णमाक्षिक भस्माबरोबर प्रवाळभस्म व गुळवेलसत्वहि दिलें जात असे   शिवाय हें पित्तशमनकार्य चांगलें व्हावें एतदर्थ सारिवा ६ गुंजा व कडुपडवळ चूर्ण ६ गुंजा याचा एक वेळ काढा देण्यात येत असे

वास्तविक शिलाजतु व सुवर्णमाक्षिक भस्म हीं दोनहि औषधें प्रमेह, मधुमेह, पिटिका या विकारात उपयुक्त आहेत   तथापि शिलाजतु हा उष्ण व कटुरसपाकी व सारक असल्यामुळें त्याचा उपयोग प्रामुख्यानें कफदोषभूयिष्ठ विकारात करणेंच इष्ट ( सुश्रुतचिकित्सा अध्याय १५-८ )   सुवर्णमाक्षिक भस्म हें मधुर रसपाकी असल्या-मुळें अलजीनामक्या पित्तप्रधान पिटिकाविकारात योग्य औषध आहे

शोधनतेलानें तीं जखम चांगल्या प्रकारें भरून आली व सुवर्णमाक्षिकभस्मामुळें त्या वृद्ध इसमास चांगलें बल प्राप्त झाल्याचें आढळून आलें   ( सुश्रुतचिकित्सा अध्याय १५-१८ )

---

# (१५४) कफरुद्धपथ कामला

रोगी मुलगी वय ३॥ वर्षे, शरीरानें जरा कृश   [illegible] व तो हल्ली [illegible] पुष्कळ [illegible] ( [illegible] ) [illegible] [illegible] [illegible] [illegible] आठ [illegible] घरातील माणसाचा डोळा [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] शिलाजितहि, केसहि व रोगीहि हळदी साण्यात येत असे.

या सर्व कारणाचा परिणाम हळूहळू व्हावयास लागून २-३ महिन्यात रोगी फिक्का पडूं लागला व त्याबरोबरच सर्व शरिरास शैथिल्यहि येऊं लागले. रोगी अशक्त होऊ लागला व त्याबरोबर सुस्तीहि येऊं लागली चवथ्या महिन्यात २-३ दिवस हळूहळू डोळ्यास पिवळेपणा येऊं लागला, लघ्वीहि खूपच पिवळ्या रंगाची येऊं लागली. शौचास पांढरट फुटीर होऊन दिवसातून केव्हाहि व्हावयाचे. अशी लक्षणें होती

तपासता रोग्याचे पोट बरेच मोठे झालेलें आढळून आलें. यकृताची वृद्धीहि शेवटच्या बरगडीच्या खाली ३" पर्यंत होती काहीहि खाल्ले तरी ताबडतोब पोट फुगत असे व खाल्ल्याबरोबर त्रास होत असे शौचास पांढरेपणाबरोबर चिकटपणाहि होता.

वरील एकंदर लक्षणावरून व कारणाच्याहि विचारावरून कफभूयिष्ठ आमदोषसंचय ठिकठिकाणी झालेला होता व त्याचा परिणाम म्हणून वरील सर्व लक्षणे होत होती असे अनुमित झालं कामलाहि यकृतातील कफभूयिष्ठ रोधामुळेच उत्पन्न झाली होती कारण केवळ पित्तप्रमाणवृद्धिजन्य कामला असती, तर शौचास रंग पांढरा असर व्हावयास नको होता पण मलाचा पांढरा रंगच स्पष्टपणे पित्तमार्गरोध दर्शवीत होता

यात निदानाच्या व चिकित्सेच्या दृष्टीने कारणमीमांसा पाहूं. सदर विकार हा दधिघृतासारख्या गुरु व स्निग्ध अशा द्रव्यापासून झालेला असल्याने व त्यापासून आमोत्पत्ति झाली असल्याने ती आमोत्पत्ति कफभूयिष्ठ होती सदर विकार संतर्पणोत्थ असल्याने चिकित्सा अपतर्पणात्मक करावयास पाहिजे दुसरा मुद्दा असा की, सदर रोग्यास दही खाण्याचा काही विधिनिषेध नव्हता दह्याच्या अंगी उत्तम धर्म आहेत हे खरे, पण त्याचबरोबर त्याच्या दुरुपयोगाने निरनिराळे व्याधि उत्पन्न होतात ज्वरासृक्‌पित्तवीसर्पकुष्ठपाण्ड्वामयभ्रमान्। प्राप्नुयात् कामलां चोग्रां विधि हित्वा दधिप्रियः ॥ (च सू. अ. ७।६२) रक्तपित्तकफोत्थेषु विकारेष्वहितं च तत्। (च. सू. अ २७।२२३) याप्रमाणे दह्याचा निषेध असल्याने या दोषदूष्यभूयिष्ठ विकाराना दही हे कारणीभूत होते व दही खाल्ल्यापासून हे दोषदूष्य वाढतात असेहि अनुमित होते. दह्याच्या विधिविरहित उपयोगाने उत्पन्न झालेल्या अनेक विकारातील अनुगतत्व पाहिल्यास दही हे रक्तवृद्धि करणारे व त्याचबरोबर अभिष्यंदी व कफपित्तवर्धक असल्याने त्यापासून उत्पन्न होणारे विकार, रक्तस्थान व तेहि कफपित्तभूयिष्ठ निर्माण होतील वरील ज्वरादि विकार अशाच स्वरूपाचे आहेत

दह्यासारख्या अभिष्यंदी व कफपित्तवृद्धिकर व रक्तसमान द्रव्याच्या अत्युपयोगाने व विधिरहित उपयोगाने रक्ताच्या मूलस्थानी म्हणजेच यकृत अगर प्लीहेच्या ठिकाणी ( प्लीहानं च यकृत् चैव तदधिष्ठाय वर्तते। स्रोतांसि रक्तवाहीनि '' । च. चि अ ४।८ ) कफपित्तात्मक विकार उत्पन्न होणार. कामला हा विकार रक्तदुष्टिज आहे (नीलिका कामला व्यङ्गं ' रक्तप्रदोषाज्जायन्ते। च सू २८।१० ) यकृत अगर प्लीहावृद्धीच्या कारणाचा विचार केल्यासहि रक्तवृद्धिकर अगर रक्ताच्या स्थानीं परिणाम

करणारीं द्रव्ये यकृत अगर प्लीहावृद्धि करितात असे दिसून येईल (विदाहयभिष्यदिरतस्य ··· । माधवनिदान, उदर )

सदर विकारातील यकृतवृद्धीला अभिष्यंदी व तेंहि रक्तगमान असे द्रव्य कारण असल्यानें त्या अभिष्यंदानें रक्तस्थानी म्हणजेच यकृताच्या ठिकाणी सतर्पक द्रव्यामुळे वाटलेल्या मेद कफामुळे रोध झाल्यामुळे पित्तानुलोमन होत नव्हतें व त्याचा परिणाम म्हणून पित्ताची व्याप्ति सर्व अभिसरणात होऊन पीतनेत्रत्वङ्मूत्रादि लक्षणें उत्पन्न झाली होतीं सुस्ती हे लक्षणहि यकृतवृद्धीत बऱ्याच वेळा आढळून येतें यातील पाडुत्व अतिस्निग्ध आहारानें उत्पन्न होणारें लक्षण होय. ( अतिस्निग्धे तु पाण्डुत्वम्' वा सू. अ १६।३१ ) चिंचेचे सारभात इत्यादिसारखें स्यागेंहि यकृत्वृद्धीला पोषकच होतें

यातील चिकित्सेची दिशा पुढीलप्रमाणें ठरते —कारणाचा सामान्य विचार केल्यास प्रस्तुतचा विकार सतर्पणोत्थ असल्यानें चिकित्सा अपतर्पणात्मक पाहिजे अपतर्पणात-सुद्धा रोग्याची क्षीणता विचारात घेता तीव्र शोधन न देता सौम्य शोधन देणेंच योग्य ठरतें शिवाय रोगीहि वयत लहान व दोषहि कालावधीमुळे खोल गेलेले, तेव्हा याचा विचार करून सौम्य शोधन व कफमेदोलेखन असें कार्य करणारी द्रव्यें पाहिजेत यकृता-तील कफाचा रोध नाहीसा झाल्यावर पित्तमार्ग आपोआप मोकळा होतो व पित्तमार्ग मोकळा झाल्यावर पित्त आपोआप स्रवूं लागतें व अभिसरणात पसरलेलें पित्त कमी होऊन लक्षणें कमी होतात (तिलपिष्टनिभं यस्तु कामलावान् सृजेन्मलम् । कफरुद्धपथ तस्य पित्तं कफहरैर्जयेत् ॥-वाग्भट पाण्डुरोगचिकित्सा ) यकृत् हे रक्ताचें स्थान असल्यानें रक्तावर कार्य करणारी व तेंहि कफमेदोलेखनात्मक कार्य करणारी द्रव्ये पाहिजे होती स्निग्ध सतर्पणात्मक अशा दीर्घ आहारामुळे यकृतात दुष्ट मेद संचयहि झाला होता त्याचेंहि लेखन व पाचक व्हावयास पाहिजे कफपित्तात्मक दोष असल्यानें व दह्यासारख्या अभिष्यंदी पदार्थांनें विकारोत्पत्ति असल्यानें कफपित्तनाशक व शोधनानुग असा तिक्तरस वापरावयास पाहिजे (कषायरस दोन्ही शामक, पण शोधनास निरुपयोगी व गुरु म्हणून वर्ज्य तिक्तरसानें क्लेदहि कमी केला जातो ) कारणाचा विशेष विचार करावयाचा म्हणजे घृत या द्रव्याचा उपयोग जास्त झाला असल्यानें घृतव्यापत्तिनाशक अशा आहार-द्रव्याची योजना व्हावयास पाहिजे

अशा प्रकारें चिकित्सातत्त्वाच्या विचारानतर चिकित्सातपशिलाकडे वळू सदर रोग्यावर करण्यात आलेला उपचार पुढीलप्रमाणें होता आरोग्यवर्धिनी २ गुंजा + सूक्ष्म ताम्र (१×२०) ४ गुंजा एकत्र करून त्याच्या दोन पुड्या २ वेळ समानकाळी मुळ्याच्या रसासारख्या यकृत्पित्तस्रावी अनुपानावरोबर देण्यात आल्या औषध एवढेंच देण्यात आलें आहार तक्र हा ठेवण्यात आला होता स्निग्ध व अन्य कारणद्रव्यें ' अपथ्य " म्हणून सागण्यात आली होती

या औषधियोजनेंतील आरोग्यवर्धिनींतील घटकद्रव्याचा व भावनाद्रव्याचा विचार केल्यास ती द्रव्यें रक्तावर व यकृतावर कार्य करणारी अशी आढळून येतील त्यांतील **चित्रक, कुटकी, लोह, पारा, शिलाजतु, गुग्गुळ व ताम्र** ही द्रव्यें रक्तातील कफभूयिष्ठ दुष्टिनाशक, शोधन, लेखन, मेदोलेखन व पाचन आणि अभिष्यंद कमी करणारी अशी आहेत विशेषत **ताम्र, गुग्गुळ, शिलाजतु, त्रिफळा, चित्रक** ही द्रव्ये रक्तस्थानातील मेदोलेखन व पाचनास अत्यंत उपयुक्त अशीच आहेत आरोग्यवर्धिनीला भावना **कडुनिंबाच्या पानाचश** रसाच्या आहेत व तें द्रव्यहि रक्तातील कफपित्तात्मक रोध व दुष्टिनाशक आहे आरोग्यवर्धिनीच्या कफलेखन कार्याला मदत म्हणून आरोग्यवर्धिनीबरोबर आणखी सूक्ष्मताम्राची योजना करण्यात आली या ताम्रानें पित्तवृद्धि न होता उलट त्याचा मार्ग मोकळा झाल्यानें पित्तशमनच होते यकृतावर कार्य करण्याकरिता व अग्निमांद्यादिकारक व स्त्रोतोरोधावरून अनुमित असा समानवायु त्याचें अनुलोमन होण्याकरिता औषध समानकाली देण्यात आलें.

याचा प्रथम इष्ट परिणाम मलाची विकृति बदलण्यात झाला प्रथम मल भसर, पांढरट, फुटीर दुर्गंधीयुक्त असा येत असे. तो बदलून पिवळा व साधारण पातळ असा येऊ लागला व २-३ दिवसात तर डोळे व त्वचा याचाहि पिवळेपणा बराच कमी झाला उपशयामुळे हीच योजना आणखी चालू ठेविली

कामलेत तक्राहाराचें महत्व फारच आहे त्यातत्यात्यात घृतासारख्या द्रव्यानी रक्त, मेद व कफवृद्धि होऊन झालेल्या यकृतवृद्धिजन्य कामलेत तर त्याचा फारच उपयोग होतो तक्र हें घृतव्यापतीत आहाराच्या व औषधीच्या दृष्टीने श्रेष्ठ समजलें जाते कारण घृत हे तक्रोद्धृत असल्याने तक्राचा स्वभाव शरीरातील विकृत अगर प्राकृत स्नेहविशोषणात्मक असा असतो घृताच्या फाजील उपयोगानें उत्पन्न होणाऱ्या विकारातहि तक्रसिद्ध पेय देता येतें (तक्रसिद्धा यवागू स्यात् घृतव्यापत्तिनाशनी । च सू अ २।२९)

वरील उपक्रमानें आठच दिवसात कामलेची सर्व लक्षणे कमी तर झालीच, पण त्याबरोबरच शैथिल्यहि कमी होऊ लागून मलविसर्जनातहि नियमितता आली. १५ दिवसात रोग्याच्या अग्नीत व बलात चांगलाच फरक पडला

नंतर यकृत्, मेद व रक्त याना बलदायक, कफपित्तघ्न अशा **रोहितारिष्टाची** व यकृत्स्रावी, अग्निदीपक व पाचक अशा **कुमारीआसवाची** योजना करण्यात आली होती

स्निग्ध, अभिष्यंदी, रक्तवृद्धिकर व मेद संचय करणाऱ्या कारणानी उत्पन्न झालेल्या या कफरुद्धपथ कामलेत वरील प्रकारच्या औषधान्नाचा चांगलाच उपयोग झाला, व रोगी पूर्णपणे बरा झाला.

---

# (१५५) ऊर्ध्वग रक्तपित्त

रोगी पुरुष, वय साधारण २४ वर्षे अगाने मजबूत, मेहनत केलेला कष्टाचीं कामं करणारा सध्याचं त्याचं काम पिठाची गिरणी चालवून धान्य दळून देण्याचे होते

सदर रोगास एक दिवस नाकातून घोळणा फुटून भराभर रक्त येऊ लागले दुसऱ्या दिवशींहि त्याप्रमाणेच येऊ लागले सर्व अग गरम वाटे शौचास साफ होत नाही म्हणून तक्रार होतीच लघवीसहि गरम गरम होत होते व लघवी झाल्यानतर स्थानिन आग वाटे तहानहि बऱ्याच प्रमाणात असून तोड येण्यापूर्वी तोडाची जशी स्थिति असते तशीच आता झालेली होता मुखातील घशातील जळजळीशिवाय दुसरं कोणतेंहि लक्षण नव्हते

सदर रोग्याच्या कारणाचा तपास काढता त्या कालात लग्नसराईमुळे धान्य दळून देण्याचा मोसम असल्याकारणानें बराचसा शारीरिक ताण पडत असे कामाच्या मानानें मदतीची अपेक्षा होती, पण दुसरा मनुष्य नसल्याने स्वत लाच गिरणीचें साफसफाई-पासूनचं सर्व काम पडे व पीठ वगैरेहि दळून देण्याचं काम स्वत च करावे लागे दिवस कामास अपुरा पडू लागला म्हणून रात्रीहि काम होऊ लागले दिवसभर थकलेल्या शरीरास जरा उत्तेजित ठेवण्याकरिता चहा सुरु झाला व त्याबरोबर एकटेपणाच बराच वेळ जागून काढावयाचा, तेव्हा करमणूक म्हणून चिवडा व भजींहि खाण्यात आली

वरील जागरण, चहा, चिवडा, भजी व मेहनत या सर्व कारणानी प्रथम पचनविकृति होऊन अन्न पच्यमान स्थितीत बराच वेळ राहू लागले अन्नहि मधुर, अभिष्यदि व विदाही असे होते त्याचा परिणाम अर्थातच रक्तदृष्यावर विदाहवर्धक झाला साधारण अन्नाचा पच्यमानस्थितीतील विदाह हा पित्ताचा विदाह वाढविण्यास तेवढा कारणीभूत झाला नसता पण विदाही पित्तवर्धक अशा द्रव्याचा पच्यमानावस्थेतील विदाह रक्तात पित्तवृद्धि करण्यास कारणीभूत झाला

याचा परिणाम प्लीहावृद्धीत झाला असता, पण त्याला दीर्घकालाची अपेक्षा असते त्याचप्रमाणे चिवडा, भजी वगैरेसारख्या पदार्थाबरोबर दही अगर दूध असते, तर त्यानें कदाचित लवकरहि प्लीहावृद्धि झाली असती परतु चहासारखे उष्णवीर्य द्रव्याबरोबर सयुक्त असे विदाही पदार्थ रक्तात दुष्टी करण्यास कारणीभूत झाले रक्ताच्या प्रमाणातहि वाढ झाली व बरोबरच त्यात विदाही पित्तहि वरील कारणानीं बरेच वाढले या शारीरिक विशिष्ट अवस्थेतील त्याचा परिणाम म्हणजे रक्तपित्त होय व तेच या ठिकाणी घडलें

आता या ठिकाणी ऊर्ध्वगच रक्तपित्त का झाले याचे कारण असे की आमाशयावर वारवार पडणाऱ्या अन्नाच्या अतिरेकाचा व अभिघाताचा परिणाम व तसेच कामामुळे व जागरणामुळे डोक्यावर घडणारा परिणाम याचे योगाने ऊर्ध्वभागास अबलत्व आले व म्हणून ऊर्ध्वग रक्तपित्त निर्माण झाले

यामध्यें जागरण, भोजन ह्या कारणाच्या योगानें पित्तवृद्धि झाली व ती पित्तवृद्धि त्याबरोबरच्या विदाही व गुरु अशा आहाराचा सतर्पणात्मक परिणाम होऊन रक्तात झाली

वरील विकार सतर्पणात्मक व विदाही अशा कारणानी उत्पन्न झालेला असल्याने त्यात शोधन पाहिजे त्यातल्यात्यात विदग्धपित्तामुळें हा विकार उत्पन्न झालेला असल्यामुळे शोधनांपैकी पित्तदुष्टीला योग्य असें शोधन जे विरेचन तें या ठिकाणी पाहिजे व शिवाय विकारहि ( ऊर्ध्वग रक्तपित्त ) विरेकसाध्य असल्यानें विरेक हेच शोधन या ठिकाणी योग्य होय. शिवाय बद्धकोष्ठामुळें मलसंचयाचीहि शक्यता म्हणून विरेचन हे शोधन यात प्रथम व आवश्यक म्हणून ठरविले

त्याकरिता विरेचनार्थ मुख्य द्रव्य म्हणून त्रिवृतचूर्ण ६ मासे व पिपळीचूर्ण ६ गुंजा या प्रमाणाची एक पुडी काढा करुन साखर टाकून घेण्यास दिली स्थानिन चिकित्सा वगैरे काही केली नाही

यातील त्रिवृत हे विरेचनार्थ प्रधान कार्यकारी द्रव्य असून त्या द्रव्याकडून ज्या ज्या दूष्यस्थित दोषावर अगर कोष्ठावर कार्य करवून घ्यावयाचें आहे, त्या प्रकारचा संयोग-संस्कार करुन तें द्रव्य दिल्यास त्या त्या ठिकाणचें शोधनकार्य उत्तम होते या ठिकाणी रक्तावर कार्य करावयाचे असल्यानें पिपळीसयोग करण्यात आला बरोबर साखरहि असल्याने पित्ताचा विदाह तर कमी होतोच, पण त्याबरोबर व्यावहारिक फायदा असा की हा क्वाथ घेणेहि कठीण जात नाही

या योजनेनें त्यास ११ विरेक झाले. प्रत्येक विरेक द्रव, उष्णधर्मी असा झाला ११ विरेक होऊनसुद्धा रोग्याचे बल विशेप कमी झाले नव्हते शोधन झाल्याने मुख्य विकार प्रशमित तर झालेच, पण त्याबरोबरच इतर उत्पन्न होणारी लक्षणेंहि टळली पुढें मात्र कारणाचा अतिरेक होऊ न देण्याची खबरदारी घेण्यात आली

---

## (१५६) कफमेदज ग्रंथि

रोगी मुलगा, वय ११॥ वर्ष. अगानें बाळसेदार, गौरवर्ण. उजव्या कानाच्यामागे थोडयाशा खालील बाजूस साधारण सव्वा इंच लांबीरुंदीची, कठीण, सवर्ण, नीरुज अशी गाठ हा विकार

पूर्वेतिहासा व उत्पत्तिक्रमाच्या विवरणात शिरता असें आढळून आलें की, पूर्वी रोग्याचा उजवा कान फुटला होता, त्यावेळीं तो बराच ठणकत असे त्यावर hydrogen per-oxide वगैरे औषधे कानात घालून तो बरा झाला पण मागे एक गाठ मात्र झालेली

दिसली हा कान गेल्या डिसेंबर महिन्यात फुटला त्यानंतर काहीं दिवसानीं गाठ मात्र हळूहळू वाढत चालली व ती जवळजवळ दीड इंच लांबीरुंदीची झाली. यावर antiphlogistine, iodine वगैरे औषधाचे स्थानिक उपचार बरेच झाले, पण गाठ थोडीशीच कमी झाली Iodine पुन्हा पुन्हा लाविल्याने जागा मात्र काही काल होरपळून गेली होती डॉक्टरानीं शस्त्रकर्माचा सल्ला दिला, पण रोगी लहान असल्या-मुळें रोग्याचे आईबाप सदर गोष्टीस तयार झाले नाहींत व या विचारातच १५-२० दिवस निघून गेले

सदर ग्रंथीला मूलत कारण पूतिकर्ण होते ते आता बरें झाले होतें तरी त्या ठिकाणची शुद्धि बरोबर न झाल्याने कफमेदसंचयात्मक अशी ग्रंथि त्या ठिकाणीं निर्माण झाली. फुटलेला कान बरा झालेला तेव्हा जवळच्या मार्गानें त्याचें शोधन शक्य नव्हते वरें, जलौकाचा उपयोगहि या ठिकाणीं कफमेदोभूयिष्ठत्वामुळें झाला नसता करिता आतून लेखन व बाहेरून विम्लापन या दोन प्रकारच्या चिकित्सातत्त्वाचा अवलंब करून, आतरचिकित्सा म्हणून वंगभस्म ½ गुंज+ताम्रभस्म ¹⁄₁₀ गुंज हे प्रमाण एकत्र करून त्याच्या ३ पुड्या करून ३ वेळ मधात घेण्यास दिल्या व बाहेरून तिलतेल लावून विम्लापन (रगडणें) करण्यास सांगितले वंगताम्राचें, कफमेद पाचनाचें व लेखनाचें कार्य २-३ दिवसातच स्पष्ट दिसूं लागले गाठीला मऊपणा आला गाठ किंचितशी कमी वाटूं लागली

वरील योजनेचा उपशय पाहून व एकदा प्रवृत्ति उत्पन्न झालेली पाहून विम्लापन पूर्वी-प्रमाणेंच चालू ठेविलें औषधीच्या पण पोटातून घेण्याच्या प्रमाणात बदल केला वंग ¼ गुंज + ताम्र ¹⁄₂₀ गुंज याप्रमाणें एकत्र करून त्याच्या ३ पुड्या करून त्या ३ वेळ मधात घेण्यास दिल्या याने गाठ झपाट्यानें कमी होऊन १०-१२ दिवसात ती गाठ अजिबात नाहींशी झाली

शरीरात आपण चिकित्सेनें साम्यप्रवृत्ति निर्माण करीत असतो सुरवातीस प्रवृत्ति निर्माण करण्यास जरा वेळ लागतो व प्रमाणहि थोडेंसे जास्त द्यावे लागतें पण एकदा प्रवृत्ति सुरू झालीं की, त्या प्रवृत्तीला टिकविण्याकरिता अगदींच सूक्ष्म प्रमाणात दिलेल्या औषधीहि उत्तम कार्यकारी होतात

[ वरील प्रकारच्या ग्रंथि वगैरेसारख्या विकारातील पाश्चात्यवैद्यकविशारदाची शस्त्र-कर्माकडील ओढ हरघडी प्रत्ययास येते आयुर्वेदसुद्धा अशा प्रकारच्या विकारात प्रभावशाली ठरू शकतो अर्थात् हे म्हणणें सर्वच ठिकाणी लागू पडते असें मात्र नाही वेळ जास्त लागतो ह्या विधानासहि तेवढें महत्त्व नाही कारण शस्त्रकर्मानंतरचा व्रण भरून वगैरे येण्यास तेवढा काळ लागतोच.

लहान मुलाच्या पूतिकर्णाच्या एका कारणाचा प्रसंगसंगतीनें उल्लेख करितों लहान मुलाना आडवें घेऊन पाजल्यास त्याना पूतिकर्णाचा विकार होतो, असें मागें एका हिंदी

मासिकात माझ्या वाचण्यात आले होते. आजकाल लहान मुलात कर्णपाक अगर प्रतिकर्ण हा विकार फार प्रमाणात आढळून येतो त्याला कारणेहि पुष्कळ आहेत. पण त्या कारणाबरोबर वरील कारणाचाहि विचार करून त्याची यथार्थता अनुभवून पाहावी.]

---

# (१५७) जीर्णज्वर

रोगी स्त्री, वय ३५ वर्षं, मारवाडी अंगानें स्थूल प्रसूतीनंतर ३ महिन्यानी जीर्णज्वर येऊं लागला डॉक्टरी उपाय एक महिना केल्यानंतर आयुर्वेदीय चिकित्सेसाठी आला नाडी क्षीण, जिभेवर पाढरी बुरशी, ताप सकाळी १००° व दुपारी ९८° याप्रमाणे तीन दिवस होता शौचास साफ होत नसे. कधी कधी छातीत दुखत असे छाती तपासून पाहता विशेष काही आढळले नाही हातापायाची आग, डोळ्याची आग, कधी कधी अनियमित तहान लागत असे झोप चागली येत असे दुपारी चार वाजेनंतर ताप उतरल्यावर रोग्यास बरे वाटत असे सूतिकाज्वर नाही व क्षयहि नाही हे लक्षणावरून निश्चित ठरविले लघ्वी तपासून घेतली त्यात विशेष काही आढळले नाही तेव्हा जीर्णज्वर असे निदान ठरवून खालील चिकित्साक्रम ठरविला.

**शष्ठयादि** ( कचोरा, वाळा, रिंगणीमूळ, माखर, सुंठ ) काढा सकाळी ६ वाजता १ चमचा मध घालून

**बृहत्सुवर्णमालिनीवसत** १ गु + **सितोपलादिचूर्ण** ५ गु + **गुळवेल सत्व** ३ गु + **यष्टिमधु** ५ गु या मिश्रणाच्या २ पुड्या करून १ पुडी सकाळी ९ वाजता मधातून व दुसरी पुडी दुपारी ४ वाजता मधातून व वर एक एक कप दूध

**मधुकादि काढा** रात्री ९ वाजता गरम पाण्याबरोबर शौचास साफ होण्याकरिता

**चदनबलालाक्षादि तेलाची** सर्वांगास मालिश रात्री व सकाळी ताप नसता स्पज करण्यास सागितले

ह्याप्रमाणे योजना करून फार उत्तम रीतीने फायदा झाला

चिकित्साक्रम ठरविताना बाईची कफप्रकृति व छातीतील कळ यावरून कफविकारप्राबल्य ध्यानात आणून शष्ठयादि काढा, जीर्णज्वरावर बल्य म्हणून सुवर्णकल्प, कफदोष काढून टाकण्याकरिता सितोपलादिचूर्ण, जीर्णज्वरावर उपयुक्त म्हणून गुळवेल सत्व व कफाचे विलयन होण्यासाठी यष्टिमधु अशी योजना केली उरस्य पीडा व जीर्णज्वरनाशक व शरीरात रक्तप्रवाह जोराने व्हावा म्हणून मालिश सागितले आहार—दूधभात, कधी कधी तादुळाची भाकरी, मुगाचे कढण, मोसंबी. साळीच्या लाह्या

हीच चिकित्सा थोड्याबहुत फरकाने क्षयाच्या प्रथमावस्थेत उपयोगी होते असा अनुभव आहे

---

## (१५८) जीर्ण शीतपूर्वक ज्वर ( Chronic Malaria )

रोगी पुरुष, वय १७, ब्राह्मण, विद्यार्थी. या रोग्यास प्रथमतः ज्वर सुरू झाला सकाळीं १० वाजल्यानंतर थंडी वाजून ज्वरोष्मा वाटूं लागे व साधारणतः १२-१ वाजेपर्यंत वाटत राही. ज्वरोष्मा १०४°–१०५° पर्यंत वाढे. सायंकाळीं थोडा थोडा कमी होण्यास लागून दुसरे दिवशीं सकाळी ६ वाजता ज्वर पूर्णपणे उतरत असे. सकाळी ६ ते १० पर्यंत रोगी साधारण हुषारींत असे. पुनः १० वाजता थंडी वाजण्यास सुरुवात होऊन नेहमीप्रमाणे ज्वर वाढूं लागे. रोग्यास इतर अन्नापेक्षा खजूर खाण्याची इच्छा होत असे व ज्वर नसलेल्या वेळीं त्यास क्षुद्बोध होई, तेव्हा तो खजूर खात असे. असा क्रम सतत तीन आठवड्यापेक्षा अधिक काळपर्यंत चालू होता.

रोग्यास अगदी प्रथम दिवसापासून क्विनीन व त्याच प्रकार पुरेसा काळपर्यंत देण्यात आले होते. रोगी चिकित्सेकरिता आला त्यावेळीं फिक्ट दिसत होता. बलहानी बऱ्याच प्रमाणात झाली होती. अग्नि मंद झाला होता. ज्वर पूर्वीच्याच प्रमाणात व त्याच क्रमाने येत असे. प्लीहावृद्धि मात्र नव्हती.

आयुर्वेदीय शास्त्रदृष्ट्या हा ज्वर विषमज्वरांतर्गत वर्गीकरणापैकी मांसगतज्वर होय असे दोषदूष्यसंबंधाच्या विवेकाने स्पष्ट होते. मांसगत ज्वराच्या भावनालक्षणाचा पुढीलप्रमाणे उल्लेख केलेला सापडतो. अन्तर्दाहोऽविकस्तृष्णा ग्लानिः सरुष्टविट्कता। दौर्गन्ध्यं गात्रविक्षेपो ज्वरे मांसस्थिते भवेत्। (च. चि. अ. ३) वरील लक्षणापैकी बरीच लक्षणे येथे दिसत होतीं.

या प्रकारच्या ज्वराची चिकित्सा करताना त्याच्या संप्राप्तीचा विचार केला, तर आपणास चिकित्सासौकर्याचे दृष्टीने उद्बोधक मुद्दे सापडतात. दोषोऽल्पोहितसंभूतो ज्वरोत्सृष्टस्य वा पुनः। धातुमन्यतमम् प्राप्य करोति विषमज्वरम्॥ (मा. नि.) अधिशेते यथा भूमौ बीजं काले च रोहति। अधिशेते तथा धातु दोषः काले च कुप्यति॥ कालप्रकृतिदूष्याणाम् प्राप्यैवान्यतमाद्‌बलम्॥ (च. चि. अ. ३) दोष हे स्वतंत्र रीत्या ज्वर उत्पन्न करण्याइतके बलवान् व उत्तान नसतात; परंतु ते धात्वंतराधारभूत असून त्या धातूच्या अबलत्वाचा फायदा घेऊन ज्वरोत्पादनाचे कार्य अव्याहत करीत असतात. म्हणून या ठिकाणी दोषशामक अगर केवळ दोषप्रत्यनीक अशा रीतीची एकदेशीय चिकित्सा मूलग्राही नसल्याकारणाने प्रभावी ठरू शकत नाही.

या रोग्यास आयुर्वेदीय सिद्ध प्रयोगापैकी पटोलनिंबत्रिफलामृद्वीकामुस्तवत्सका। या द्रव्यांनी सिद्ध केलेले घृत उपयुक्त ठरले असते याबद्दल दुमत नाही. परंतु ही औषधे मिळवून आणणे तर प्रयासाचे होतेंच, परंतु त्यापेक्षाहि घृत तयार करून देणे अधिक त्रासाचे व दिरंगाईचे होत होते. याकरिता 'क्रियाकाल' जाऊ नये म्हणून सिद्धौषधिचिकित्साच अधिक श्रेयस्कर वाटली.

रोग्यास कोष्ठशुद्धि नियमित होत असल्याकारणानें विरेचन द्रव्याची आवश्यकता वाटली नाही. फक्त शमन व पाचन चिकित्सेची आवश्यकता होती अशा ज्वरात नागकल्पाचा फार चांगला उपयोग होतो. रोगी आनूप देशातील होता व कालहि वसंताच्या सुरुवातीचा असल्याकारणानें या ठिकाणी नागकल्प चांगले काम करील हे निश्चित होते. परंतु तो कल्पहि सौम्य असावयास पाहिजे होता, कारण रोगी अबल झाला होता व त्यास प्रतिश्याय कास, मस्तक जड होणे इत्यादि कफप्रकर्षाची चिन्हेहि तितकी तीव्र नव्हती म्हणून त्रिभुवनकीर्तिसारखें तीव्र औषध न योजता साधा मृत्युंजय १-१ गु. सकाळी व संध्याकाळी देण्यास सुरुवात केली सुंठ, धणे व मुस्ता या पाचन औषधाचा कषाय अनुपानार्थ प्रयोजिला. याबरोबरच बृंहण चिकित्सेची जोड पाहिजे म्हणून लघुमालिनीवसंत १ गुंज दुपारी दोन वाजता दूधसाखरेंतून देण्यात येत असे

वरील चिकित्सेचा उपशय लगेच दुसऱ्या दिवसापासून दिसूं लागला. दुसरे दिवशी थंडी भरून आली, परंतु ज्वरोष्मा नेहमींचे मानाने बराच कमी होता याच क्रमाने ज्वरोष्मा कमी होता होता रोगी चवथे दिवशी ज्वरमुक्त झाला त्यानंतर दोन दिवस पूर्वीचीच औषधे देऊन पुढे फक्त आठ-दहा दिवस नुसताच लघुमालिनीवसंत चालू होता ज्वर बंद झाल्यानंतर बाकी लक्षणे हळूहळू कमी होऊं लागली. रोगी पूर्णपणें बरा झाला मलेरियाच्या उपद्रवापैकी कोणतीहि तक्रार शिल्लक राहिली नाही हे या ठिकाणीं नमूद करण्यासारखे आहे.

---

## (१५९) शूल (आवृतवातज)

रोगी पुरुष, वय २३ वर्षे. ब्राह्मण. साधारण कृश प्रकृति. ऑगस्ट महिन्याचे आरंभी पोट दुखण्याची तक्रार घेऊन आला. बहिरा असल्यामुळें त्याचा सांभाळ करणारी बहीणच त्याच्याबरोबर आली होती

**विकाराची लक्षणे**—रुग्णानें सांगितली नसीच त्याच्या विकाराची लक्षणे लिहून घेण्यात आली कारण त्यास प्रश्न विचारून अधिक माहिती काढणे कठीण होते

पोट दुखतें, अंग जड पडतें. भुकेवर वासना नाही, थोडें खाल्लें की पोट जड पडतें, नंतर थोड्या वेळाने फार ढेंकर येतात जेवण होऊन तीन तास गेले की, तासातासानें चार वेळ शौचास जावें लागते सुस्ती आहे या विकारामुळें बहिरेपणा आणखी वाढला आहे

रोगाचें कारण कळलें नाही. तथापि तो काल (वर्षाऋतु) वातप्रकोपाचा होता व जेवणानंतरच्या पहिल्या (कफ) कालात पोट व सर्व अंग जड पडणे, पोट दुखणें, ढेंकर येणें व नंतर जुलाब होणे ही लक्षणें कफ, वायु याची वृद्धि दर्शवीत होती. भोजनानंतर

अन्नावृत व कफावृत होऊन तो वृद्ध वायु. शूल, उद्गार बाधिर्य निर्माण करीत होता वर्षाऋतूंत पित्ताचा चय होत असतो या अतिसाराम, सचित पित्ताचे वायूस आवरण कारण होत असावे

तपासणी करता या रोग्याच्या अंगात ज्वर बिलकूल नव्हता. इतकेच नव्हे, तर सकाळी १ वाजण्याच्या वेळी त्याच्या छातीच्या मध्यावर व दोन्ही काखात बराच घाम असल्याचे आढळून आले

औषधयोजना —कफ हा रसधातूचा मल असल्यामुळे रसधातुगत दोष कमी झाल्यास कफवृद्धि कमी होईल या कल्पनेने या विकारावर रसधातुगत ज्वरयोग ( इंद्रजव, कडू पडवळीची पाने, कुटकी ) २ मासे देण्याचे ठरविले व वृद्ध वायूचे शमन व्हावे या उद्देशाने त्याबरोबर ४ गुंजा गुळवेलचूर्ण दिले सकाळी रिकाम्या पोटी (अनन्नकाली) या चूर्णाचा काढा घेण्यास सांगितले संचित पित्त व वृद्ध वायु हे स्वस्थ व्हावेत व त्याजबरोबर रसधातुगत अग्नि दीप्त होऊन त्यायोगे कफोत्पत्ति कमी व्हावी (अ हृ चि १,८७) एतदर्थ त्या गाळून घेतलेल्या काढ्यात अर्धा चमचा तूप घालून पुन्हा एक कढ देऊन मग तो काढा पिण्यात येई जमल्यास श्रोत्रेंद्रियावरील परिणाम कमी करण्याचे कार्यहि या औषधाने होते का पाहावे हाहि काढ्यात तूप घालण्यात एक हेतु होता

या योजनेचा अत्यंत इष्ट असा परिणाम घडून आला ८-१० दिवसात शूल, जडता वगैरे पचनासंबंधीची सर्व लक्षणे नाहीशी झाली व अतिशय जोरदार भूक लागते असा अनुभव तो गृहस्थ सांगू लागला.

पुढे हे औषध कमी करून घाम कमी होण्याकरिता ५-६ दिवस मेदोगत ज्वरयोग (काडेचिराईत, गुळवेल, चंदन, सुंठ) १ मासा + वाळा ४ गुंजा + नागरमोथे ४ गुंजा याचा काढा तूप घालून घेण्यासाठी दिला व त्याने घाम येणे क्रमाने कमी झाले

या बाधिर्यास दशमूलाच्या काढ्याच्या शेकाचा अनुपशय होत असल्याचे आढळून आल्यावरून या केवळ वातज (पित्तानुबंधि) बाधिर्याची बृंहण औषधाची चिकित्सा करावयाचा विचार करून प्रथम स्वादुपाकरसाच्या लघुपंचमूळानी ( रिंगणी, डोरली, सालवण, पिठवण, गोखरू ) सिद्ध केलेले खोबऱ्याचे तेल कानात, नाकात सोडण्यास व कानाचे आसपास चोळण्यास दिले व त्याने थोडे ऐकू येऊ लागले

गेले दोन महिने औषध बंद आहे तथापि श्रवणात पूर्वीपेक्षा सुधारणा आहे. वरील औषधानी महास्नेह ( तूप, तेल, वसा, मज्जा यांचे मिश्रण) सिद्ध करून तो वापरल्यास अधिक उपयोग होईल असे वाटते

[ वृद्ध नसलेला परंतु आवरणाने आवृत झालेला वायु वृद्ध वायुप्रमाणेच शूलादि लक्षणे उत्पन्न करतो अशा वेळी केवळ आवरणाची चिकित्सा केली असता ती लक्षणे नष्ट होतात प्रस्तुत रुग्णाचा वायु वृद्ध वायु असून आवृत आहे. त्यामुळे आवरणाच्या चिकित्सेबरोबर आवृताची चिकित्सा येथे केली आहे. ]

---

# (१६०) हें आमचें ' कँपॉलॉन ' चें इंजेक्शन

## पुनरावृत्त आंत्रिक ज्वराची जीर्णावस्था

रोगी मुलगी, वय ५. आन्त्रिक सन्निपात हे निदान आन्त्रिक सन्निपाताच्या सर्वसाधारण अवस्थानुसार कालमर्यादा चालू होती. परंतु १३-१४ व्या दिवशी झोपेंत दचकून उठणें, नाक खाजविणे इत्यादि कृमीची लक्षणे स्पष्ट होऊं लागली प्रथमपासून लक्ष्मीनारायण व सूतशेखर ही औषधें चालू होती परतु कृमीकरिता काही निराळी कृमिघ्न चिकित्सा करणे जरूर होते. कृमीकरिता सन्निपातामध्ये काय चिकित्सा करावी हा मोठा प्रश्न पडला वगभस्माचे कृमिघ्न मोहनाशनम् ६ गुण सागितले आहेत. परतु त्याबरोबर ईपत् वातप्रकोप हाहि एक या अवस्थेत अनवश्यक असा दोष टाळण्याकरिता वातनाशक म्हणून वगभस्म व महायोगराजगुग्गुळ अशी दोन औषधे खालीलप्रमाणे सुरू केलीं.

वगभस्म $\frac{1}{4}$ गुज + महायोगराजगुग्गुळ $\frac{1}{4}$ गुज, पुडी एक, सकाळी मोरावळ्यात. कृमि हे आमाशयस्थ अतएव कफज म्हणून सकाळी योजना केली व वरील योजनेनुसार सान्निपातिक लक्षणे कमी होऊन ज्वरमान २१ व्या दिवशी उतरलें.

परतु आन्त्रिकाचे अवशेष राहिल्यामुळे म्हणा किंवा अपथ्य आहारविहारादिकाच्या परिणामामुळे म्हणा पुन्हा ताप उतरल्यापासून ७ व्या दिवशी ज्वर १०१° पर्यंत वाढला व त्यानतर त्याने पुन्हा आन्त्रिकाचे स्वरूप धारण केले.

मात्र या वेळी मुलीची प्रकृति बरीच क्षीण झाली होती व तिची ती भयकर दीनवाणी स्थिति पाहावत नव्हती यानतर वारवार नाडी क्षीण होत असे, त्याकरिता सूक्ष्मलक्ष्मीविलासगुटी १ गुज याचे मोरावळ्यात चाटण देत असे. बाकीचा चिकित्साक्रम पूर्ववत् या वेळी कृमीची लक्षणे नव्हती.

हा उलटलेला आन्त्रिक १४ दिवसात कमी झाला परतु त्यानतर पुढे सायकाळी ४ चे सुमारास ज्वर मात्र बराच म्हणजे १०१°-१०२° पर्यंत वाढत असे

याच वेळी कॉलऱ्याच्या साथीचे डॉक्टर या भागात आले होते. त्यांना सदरहू रोगी दाखविला व हा ज्वर का वाढतो याबद्दल पृच्छा केली त्यानी anaemia मुळे ज्वर वाढत आहे व त्याकरिता campolon ची इंजेक्शन्स द्यावी, असा आपला सल्ला दिला या ठिकाणी वरील योजना शक्य नसल्यामुळे आयुर्वेदीय औषधे देणे भाग होते

आयुर्वेदीय तत्त्वानुसार हा ज्वर " जीर्णज्वर " या सदरात मोडेल तेव्हा जीर्णज्वराची चिकित्सा करण्याचे ठरविले, जीर्णज्वरघ्न व पाडुत्वनाशक म्हणून "महासुदर्शनचूर्ण " देण्याचे योजिले मात्र याच स्वरूपात दिल्यास त्याच्या तिक्तरसामुळे वातप्रकोप होईल व अगोदरच शरीर रूक्ष झालेले होते, यास्तव महासुदर्शनचूर्णसिद्धदुग्ध देणे

सुरू केले. सांगण्याचे आश्चर्य हे की, वरील योजना दोनच दिवस सुरू केल्यानंतर तिसरे दिवशी ज्वर चढला नाही. त्याच दिवशी पुन्हा तेच डॉक्टर भेटले व त्यांनी सहजच सदर रोग्यासंबंधी पृच्छा केली. अर्थात् त्या वेळी आमच्या आयुर्वेदीय "कॅपॉलॉन"ची त्यांना कल्पना दिली.

सदरहू रोगी शहरात असता तर हा मार्ग सापडला नसता. कारण लगेच इंजेक्शन्स देण्यात आली असती. कॅपॉलॉनच्या सर्वच अवस्थांत वरील औषध कार्यकारी होणार नाही. परंतु शास्त्रीय ग्रंथ पुढे ठेवून अवस्थाभेदानुसार चिकित्सा केली असता मार्ग सापडतो व पाश्चात्य औषधाकडे वळण्याचे कारण पडत नाही.

---

# (१६१) प्लीहावृद्धि

## ( प्लीहोदर, Enlargement of Spleen )

रोगी पुरुष, वय वर्षे २९. पोलिस खात्यात नोकरी. रोगाचा इतिहास —दोन महिन्यांपूर्वी एक दिवसाआड जोरदार थंडीताप येत असे. त्यावर सरकारी दवाखान्यातील औषधें घेतली. ताप थांबला पण प्लीहा कमी झाली नाही. नंतर Quino-Hemogen एक बाटली घेतली, पण दुखणे वाढतच चालले व चालताना त्रास होऊं लागला. दर्शनस्पर्शनप्रश्नांनी परीक्षण करिता उदराची प्लीहेकडील बाजू सुजलेली आहे, प्लीहा ४ बोटे लांब व ३ बोटे रुंद वाढलेली आहे व शौचास चांगलें साफ होत नाहीं असे आढळून आलें.

चिकित्सा —ही शीतपूर्वकज्वरजन्य प्लीहावृद्धि असून यापासून पुढे जलोदर होण्याचा संभव आहे हे जाणून या प्लीहोदराची उदरचिकित्सेच्या ( नित्य एव विरेचयेत् ) या सर्वमान्य नियमाप्रमाणे विरेचनप्रधान चिकित्सा करण्याचें ठरविलें व प्रथम दिवशी इच्छाभेदी रसाच्या २ गोळ्या ( २ गुंजा ) रात्रौ गरम पाण्यात घेण्यास दिल्या; त्याने दुसऱ्या दिवशीं ५-६ जुलाब झाले. तदनंतर रोज महामृत्युंजय २ गुंजा + कफनाशकगुटी २ गुंजा + शेफालीकल्प ८ गुंजा + ताम्रभस्म ½ गुंज, या मिश्रणाचे सारखे ४ भाग करून ते प्रत्येक वेळी रोहितकारिष्ट १ चमचा व २ चमचे ऊन पाणी यांतून, याप्रमाणे दिवसातून ४ वेळ घेण्यास सांगितलें व पोटावरील सुजेवर शोथहर लेप लावण्यास दिला. या योजनेतील शेफालीकल्प व महामृत्युंजयातील सागरगोटा ही औषधें शीतज्वरदोषघ्न असून, ताम्रभस्म, जेपाळ व रोहितक हीं औषधिद्रव्यें प्लीहागत दोषसंचय हरण करण्यास समर्थ अशी आहेत. या योजनेने १७-१८ दिवसांत पोटावरील सूज, प्लीहावृद्धि व चालताना होणारा त्रास ही सर्व नाहीशी होऊन रोगी उत्तम रीतीनें बरा झाला.

# (१६०) हें आमचें 'कँपॉलॉन' चें इंजेक्शन

## पुनरावृत्त आंत्रिक ज्वराची जीर्णावस्था

रोगी मुलगी, वय ५. आत्रिक सन्निपात हे निदान आत्रिक सन्निपाताच्या सर्वसाधारण अवस्थानुसार कालमर्यादा चालू होती. परंतु १३-१४ व्या दिवशी झोपेंत दचकून उठणे, नाक खाजविणे इत्यादि कृमीची लक्षणे स्पष्ट होऊ लागली. प्रथमपासून लक्ष्मीनारायण व सूतशेखर ही औषधे चालू होती. परतु कृमीकरिता काही निराळी कृमिघ्न चिकित्सा करणे जरूर होते. कृमीकरिता सन्निपातामध्ये काय चिकित्सा करावी हा मोठा प्रश्न पडला वगभस्माचे कृमिघ्न मोहनाशनम् ६ गुण सागितले आहेत. परंतु त्याबरोबर रूक्ष वातप्रकोप हाहि एक या अवस्थेंत अनावश्यक असा दोष

सुरू केले. सांगण्याचे आश्चर्य हे की, वरील योजना दोनच दिवस सुरू केल्यानंतर तिसरे दिवशी ज्वर चढला नाही. त्याच दिवशी पुन्हा तेच डॉक्टर भेटले व त्यांनी सहजच सदर रोग्यासंबंधी पृच्छा केली. अर्थात् त्या वेळी आमच्या आयुर्वेदीय ' कॉलॉप्स 'ची त्यांना कल्पना दिली.

सदरहू रोगी शहरात असता तर हा मार्ग सापडला नसता. कारण लगेच इंजेक्शन्स देण्यात आली असती. कॅपॉलॅपच्या सर्वच अवस्थात वरील औषध कार्यकारी होणार नाही. परंतु शास्त्रीय ग्रंथ पुढे ठेवून अवस्थाभेदानुसार चिकित्सा केली असता मार्ग सापडतो व पाश्चात्य औषधाकडे वळण्याचे कारण पडत नाही.

पोटावर ऑपरेशन करून घेण्याकरिता सिव्हिल हॉस्पिटलमध्ये पाठविण्याचा सल्ला त्यानी दिला इतकी कठीण अवस्था प्राप्त झाली होती

**रक्तधातुगत दोषांची लक्षणे:—पहिला दिवस**–रोग्याच्या अंगात ताप बिलकूल नव्हता. तरी थंडीच्या वेळीसुद्धा रोगी अंगावर लंगोटीखेरीज दुसरे वस्त्र राहू देत नव्हता (दाह) त्यास दर चार-पाच मिनिटानी पिवळया जर्द ओकाऱ्या होत होत्य ( छर्दन ). तो सारखे थंडगार पाणी मागत होता––नव्हे पीत होता–( तृष्णा ) व लगेच ओकत होता. ही रक्तगत विकाराची लक्षणे ( व वरील पाचक लवणद्रव्याचा अनुपशय ) पाहून **रक्तयोगकल्पाची*** पाण्यातून योजना केली

**तिक्तरसद्रव्याचा उपशय·––रक्तयोगकल्पाने** त्याची तहान, उलट्या, जीव घाबरणे थोडया प्रमाणात कमी झाले त्याला साधे पाणी उलटे पण **रक्तयोगकल्पमिश्रित** पाण्याची क्वचितच वांति होई बहुधा ते पचत असे इतकेच नव्हे, तर तो तेच पाणी मागत असे

**अम्ललवणरसद्रव्यांचा अनुपशय** ––या रोग्याने डाळ हे आहारद्रव्य घेतले असल्यामुळें त्यावर अम्लद्रवपान पाचक म्हणून उपयोगी पडेल या कल्पनेने **असुलाचे सार मीठ, गूळ** घालून भिजवून पिण्यास दिले होते परतु ते सर्व उलटून पडले व त्याने तृष्णादि लक्षणे वाढली. ( अम्ल लवण-रसाची पेये व औषधे उलटून पडत असता तिक्त [ कडु ] रसाचे पाणी व पुढे दिलेला विरेचन कषाय ही पचली हे रक्तधातुगत विकार या दृष्टीने लक्षात घेण्यासारखे आहे )

**वातनाशन तैलबस्तीचा अनुपशय** — मलप्रवृत्ति होऊन उदावर्त कमी व्हावे, याकरिता प्रथम **सहचर, बला, वेदनाहर व निर्गुंडयादि तेलाच्या** मिश्रणाचे २ स्नेहबस्ति ( ५ तोळे पिचकारीने ) दिले व नतर दोन वेळ पुढे नळीत सिद्धतेल घालून साबण, काळे मीठ, पाणी याच्या मिश्रणाचे बस्ति दिले पण त्याचा काही उपयोग झाला नाही थोडासुद्धा मल बाहेर आला नाही

**तैलाभ्यंगाचा अनुपशय:**––पोटातील वायूचे अनुलोमन होण्यास अभ्यंगाने मदत होईल या कल्पनेने वरील तैलमिश्रणात सोवर्चल घालून ते पोटास लावण्यास दिले.

---

***पच-कषाय-कल्प** –( चिकित्सामंदिरातील पंचकषायाचे यशस्वी प्रयोग प्रत्यक्ष पाहून आयुर्वेद महाविद्यालयातील विद्यार्थ्यांनी या वनस्पतिचूर्णाची खाजगी व्यवसायात वापरण्याजोगी सिद्ध औषधे बनवून त्याचा अनुभव घेण्याविषयी विनंति केली म्हणून तूर्त **इद्रयव** आदि प्रत्येक वनस्पतीचा काढा करून त्यात साखर घालून, आटवून त्याचा कल्प आयुर्वेदाश्रम फार्मसीने बनवून दिला आहे चूर्णाप्रमाणे आयतेवेळी मिश्रण करून हे कल्प देता येतात पाण्यात विरघळत असल्यामुळे घेण्यास फार सोईचे आहेत त्याचा गुणहि चागला येतो )

हान, पाय वळत असल्यामुळे त्याने ते सर्वांगास लावून घेतलें अभ्यंगानेंहि पोटाची फुगवटी, कडकपणा काही कमी झाला नाही

**द्रवस्वेदाचा अनुपशय.**—दुसरी रात्र–सायंकाळी एरंड, पीलू याच्या काढयानें पोट शेकण्यात आलें ( आर्द्रस्वेद ) या स्नेहस्वेदाचा अत्यन्त विपरीत परिणाम झाला नित्याप्रमाणे रात्री होणारी त्याची दाह, तहान, उलटया ही लक्षणें मनस्वी वाढली व त्या रात्रीत एका मोठया वाटीभर थंड पाणी तो प्याला व ओकला

**कषायरसद्रव्याचा उपशय**—दिवस २ रा–रक्तार्शयोगशर्करा चालू होती त्याच्या जोडीला **प्रवाळपंचामृत, कामदुघा, सुवर्णमाक्षिकभस्म** याचें मिश्रण चालू केलें यानें तहान, वांति, दाह यांचें प्रमाण बरेंच कमी राहिलें त्यास थोडें सावेसें वाटूं लागलें, म्हणून दूधसाखर दिलें स्नेहस्वेदाचा अनुपशय दिसून आल्यावरून तें अजिबात बंद केलें यामुळे इतर त्रास कमी झाला पण पोटाच्या स्थितींत विशेष फरक पडला नाही सध्याकाळी पुन मात्राबस्ति दिला त्यामुळेंहि शौचास न होता थोडें आवरक्तच पडलें

**दिवस २ रा सायंकाळीं**—पित्तशामक विरेचनानें अनुलोमन होतें का पहावें म्हणून **कुटकी, त्रिफला, त्रिवृत्, कपिला** याचा काढा १ वेळ भरपूर पाजला हा कडु असून सुद्धा त्याची वांति न होता तो पचला (कटुरस रक्तधातूवर शामक कार्य करतो) तथापि विरेचन झालें नाही

**रात्र ३ री**—एकंदरीत त्रास कमी २–३ वेळ शौचास जावेंसें वाटलें, पण थोडयाशा रक्तापलीकडे काही पडलें नाही

**दिवस ३ रा**—पुन कालचा विरेचनद्रव्याचा काढा पाजला पण सायंकाळपर्यंत जुलाब झाला नाही

**रक्तपित्तज आन्त्रशोथ**—सायंकाळीं मुखमार्गानें व गुदमार्गानें केलेल्या उपायानें इष्ट कार्य साधत नाही असें दिसून आल्यावरून प्रत्यक्ष पोटावरच रक्त व पित्तशामक शोथहर द्रव्याचा लेप लावण्याचें ठरविलें रक्तधातूच्या व पित्तदोषाच्या विकृतीमुळे आतडयात शोथ येऊन हा अडथळा उत्पन्न झाला असला पाहिजे हा शोथ कमी झाल्यास, स्वभाव आपोआप प्रस्थापित झालाच पाहिजे असें वाटून इतर सर्व औषधें बंद केली, व **गेरु, पुनर्नवा** याच्या चूर्णाबरोबर **शोथहर लेप थंड पाण्यात** उगाळून पोटावर घातला एकदा लेप सुकल्यावर पोट तपासून पाहता थोडें नरम वाटलें म्हणून दोन तासानी पहिला लेप धुऊन काढून पुन तोच लेप घातला यानें पोट बरेंच नरम झालें, इतकेंच नव्हे, तर रात्री (रोग वाढण्याच्या वेळी) ३–४ वेळ चांगलें भरपूर शौचास झालें व रोगी स्वस्थ होण्याच्या मार्गास लागला रक्तगत पित्तशामक चिकित्सेनें पुढील चार दिवसात रोगी पूर्ण बरा होऊन आपल्या गावी गेला

**आवृत वात.**—या चिकित्सेच्या निमित्ताने वैद्यकातील एक महत्त्वाचा सिद्धांत स्पष्ट झाला कोठेंहि वेदना होऊं लागल्या की, वाताची वृद्धि आहे असे अनुमान करून त्यावर रूक्ष स्वेद वा स्नेहपूर्वस्वेद करण्याची प्रथा समाजाच्या व वैद्यवर्गाच्या अगदी अंगवळणी पडलेली आहे तथापि केवळ वृद्ध वायु वेदना निर्माण करतो असें नसून, आवृत (अवृद्ध) वायुहि वेदना निर्माण करतो, वायूस दुसऱ्या वायूचें, तसेंच आम, कफ, पित्त, रक्त, मास, मेदादिकांचेंहि आवरण होऊं शकतें. पित्त व रक्त या आवरणाखेरीज इतर आवरणाचे वेळी आवरण कमी करण्यास स्वेदाचा उपयोग होत असल्यामुळेंच सर्वत्र वेदना होत असता शेकण्याची प्रथा पडली आहे रक्तावृत वा पित्तावृत वायूवर स्वेद दिल्यानें आवरणाची वृद्धि होऊन विकार बळावतो. वरील रोग्यांत अशीच स्थिति असल्यामुळें स्वेदाऐवजी रक्तपित्तशामक चिकित्सा येथें आरोग्यदायक झाली.

रक्तपित्तविकृतीमुळे आन्त्रशोथ, आन्त्रशोथामुळे अपानवायु आवृत व आवृत अपाना-मुळे प्राणोदानव्यानदुष्टि हे या विकाराचें शास्त्रीय स्वरूप आहे.

[ काही पित्तविकार रात्री १२ ते २ बळावतात हे मागे निवडक रुग्ण चिकित्सा अलजीपिटिका (प्रमेहविरहित) यांत दिसून आलें आहेच ]

---

## (१६३) त्रिदोषज गुल्म

### महारुजं दाहपरीतमश्मवद् घनोन्नत .. ॥

रोगी स्त्री, वय ३५, ब्राह्मण, शरीरानें सडपातळ सुमारे १८ वर्षांपासून पोट-दुखीची व्यथा लागलेली १५-२० दिवसातून ४-५ दिवस तरी पोट दुखलें नाही असें कधीच आठवत नाही.

**रोगपरीक्षा.**—रोग्याची दर्शनपरीक्षा करता शरीरयष्टि कृश, डोळे खोल गेलेले, पोट दुखण्याच्या भीतीनें नेहमी अल्पाहार केल्यानें या वयातच वृद्धापकाळची छटा शरीरावर दिसली स्पर्शनपरीक्षेत नाडी वातप्रधान लागली पोटात बेंबीच्या उजव्या बाजूला किंचित् वर कागदी लिंबाएवढा मोठा व दगडासारखा कठीण गोळा लागला हा गोळा दाबला असता किंचित सरकत असे गोळा दाबल्यावर रुग्णास अतिशय वेदना होत असत

प्रश्न विचारला असता पुढील पूर्वेतिहास समजला वयाच्या चौदाव्या वर्षी पति निवर्तल्यावर घरकामाचे कष्ट जास्त करावे लागले. आहार शिळ्या भाकरीसारखा रूक्ष करावा लागला अशा स्थितीत २-३ वर्षानंतर पोट दुखण्याची सवय लागली

प्रथम डॉक्टरकडून औषधोपचार करण्यात आला त्यामुळे काही दिवस गुण वाटला, परतु पुन्हा पोट दुखू लागले अशा रीतीने एक वर्षपर्यंत अलोपार्थीचे इलाज केल्यावर होमिओपार्थीचे उपचार सुरु केले होमिओपाथीच्या डॉक्टरने अन्न अजिबात बद केले दूध, ताक, फळाचा रस वगैरे द्रव आहार घेण्यास सागितले हा उपाय दोन वर्षे केला या दोन वर्षात पोटात मुळीच दुखले नाही दोन वर्षानतर अन्न खाण्याची अतिशय इच्छा झाली म्हणून डॉक्टरची परवानगी न घेता अन्न खाण्यास सुरुवात केली त्यामुळे पुन्हा पोटात दुखण्यास सुरुवात झाली एका मिशन हॉस्पिटलमध्ये "क्ष" किरणानी जेवणापूर्वी, जेवणानतर व औषध दिल्यानतर असे तीन वेळा फोटो काढले तीनहि फोटोमध्ये पचनव्यवस्थेत कोठेहि बिघाड दिसला नाही अशा प्रकारे पुष्कळ इलाज केला

पोटातील गोळा बस्तीपासून आमाशयापर्यंत कधी कधी फिरतो फिरू लागला म्हणजे जास्त त्रास होतो पोट दुखते तेव्हा पोटात आग झाल्यासारखेहि वाटते शौचास बहुतेक साफ होत नाही म्हणून दोन तीन दिवसानी बस्ति घ्यावा लागतो

**निदान**—वरील लक्षणावरून त्रिदोषगुल्म असे निदान केले त्रिदोषगुल्म प्राय असाध्य असतो, म्हणून ही पोटदुखी निश्चित बरी होईल असे सागता येत नाही असे रुग्णाच्या नातलगास सागितले परतु तात्पुरता तरी त्रास कमी व्हावा अशी इच्छा प्रदर्शित केल्यामुळे औषध सुरू केले

**औषधयोजना**—गुल्माच्या चिकित्सेत क्षार दिल्यास उत्तम उपयोग होतो, म्हणून ओल्या नारळात मीठ भरून मातकापड करून तो नारळ जाळून तयार केलेला नारिकेलक्षार ( हा पाठ भावप्रकाशात आहे ) १ गुज, पित्तजन्य शूलावर उपयोगी पडणारे शखभस्म १ गुज आणि शूल व गुल्मावर गुण देणारे हिंग्वाष्टकचूर्ण २ गुजा या मिश्रणाची एक पुडी अशा आठ पुड्या करून प्रत्येक तीन तासानी कागदी लिंबाच्या रसात घेण्यास दिल्या हा क्रम तीन दिवस केल्यावर पोट दुखणे काही कमी झाले, रुग्णाने थोडा भात खाल्ला तरी त्रास झाला नाही, परतु शौचास साफ झाले नाही म्हणून चवथ्या दिवसापासून वरील मिश्रणाच्या ६ पुड्या दिल्या व रात्री निजताना त्रिफळाचूर्ण १॥ मासा ऊन पाण्यावरोवर घेण्यास दिले याप्रमाणे ७ दिवस चिकित्सा-क्रम ठेवला याचा अतिशय उत्तम उपयोग झाला आठव्या दिवसापासून पोट दुखणे निम्मे कमी झाले रुग्णाने गव्हाची पोळी न विचारता खाल्ली, तथापि त्रास झाला नाही दोन सप्तकात बराच गुण वाटला पोट दुखणे अजिबात बद झाले भूक लागू लागली पचन सुधारले पोटातील गोळा मऊ व लहान लागू लागला नतर एक सप्तकाचे औषध घेऊन रोगी स्वत च्या गावी गेला

---

# (१६४) रक्तमेदःशैथिल्यज शोथ

रोगी मुलगा, वय १४ वर्षे, उंची ४ फूट १० इंच, वर्ण काळासावळा. खरखरीत आवाजाचा त्याची मुख्य तक्रार म्हणजे त्याच्या तोंडावरची ( गालावरची ) सूज होय ह्या सुजेच्या अनुरोधाने इतर लक्षणाचा तपास लाविला, तरी सदर रोगी पुन्हा आपल्या मुद्यावर येऊन "माझ्या गालावर सूज आहे व ती कमी व्हावयास पाहिजे" असे सांगत होता त्याला इतरहि लक्षणे होती पण त्रासदायक असे विशेष कोणचेच लक्षण नव्हते त्यामुळे तो वैद्याचे लक्ष आपल्या गालावरील सुजेकडे ओढण्याचा प्रयत्न करीत होता याला कारणहि तसेच होते. ही गालावरची सूज काही विशेष शूल वगैरे उत्पन्न करीत होती असातला भाग नव्हता पण त्याला भेटणारे सर्व लोक त्याच्या गालावरच्या सुजेबद्दल विचारीत आणि म्हणून तो औषधाकरिता आला होता

पद्धतशीर तपासणीत पुढील लक्षणे आढळून आली —त्वचा खरखरीत पांडुरवर्णी व शिथिल तोंडावरचा टापसा, पोट जरासे मोठे दात कागदी पांढरे, नखे पातळ, चापट व पांढरट लहानपणी झालेल्या खुपऱ्याकरिता डोळ्याच्या खालील बाजूस बाहेरून दिलेल्या डागाचे व्रण आवाज खरखरीत गाल व पोट चालताना थलथलणे, थोडेसे चालले तरी दम लागणे घाम येताचा येत असे रात्री झोपल्यानंतर जास्त घाम येत असे. घशाच्या गाठी मधूनमधून ८-१५ दिवसानी दुखावयाच्या व बोलण्यास त्रास पडावयाचा गाठी विशेषत रात्री दुखत शोथ दाबून पाहिल्यास खड्डा पडत नसे सूचक प्रश्न न विचारताहि अम्लशिशिरप्रीति (आंबट व थंड पदार्थाची विशेष आवड) आपण होऊन रोग्याने सांगितली गरिबी, लक्षणाची अतीव्रता व खेड्यात राहणी याच्यायोगाने आतापर्यंत कोणताच उपाय केला गेला नव्हता

सुजेच्या उत्पत्तीबद्दल विचारता ती अगदी लहानपणापासून आहे असे सांगण्यात आले त्याच्याच भाषेत सांगावयाचे म्हणजे "मला समजू लागले तेव्हापासून गालावर सूज आहेच" तेव्हा हा शोथ बऱ्याच वर्षांचा होता याबरोबरच कारणाचाहि तपास काढता मृत्तिकाभक्षण हे कारण आढळून आले हा टापसा, ही कदाचित् अनुवंशिक प्राकृतिक ठेवण तर नाही अशा संशयाच्या निश्चितीकरिता त्याच्या आईवडिलाच्या व भावाच्या प्रकृतीबद्दल तपास काढला व असा त्रास इतर कोणालाहि नसल्याचे त्याने सांगितले

**निदान.**—वरील लक्षणावरून रक्तक्षीणता, मेद.शैथिल्य या प्रकारच्या धातुविकृती-सहित मृत्तिकाभक्षणज वातभूयिष्ठ पांडुरोग असे निदान ठरते.

**चिकित्सा**—चिकित्सा मूळ कारणास धरून व त्याबरोबर विद्यमान लक्षणनाशक असा पाहिजे, म्हणून कोष्ठाचे सौम्य शोधन व रक्तमेदोधातुस्थित अग्निबलवर्धन करण्यास सुरुवातीपासूनच विडंगारिष्ट २ वेळ दुप्पट पाणी घालून दोन्ही जेवणानंतर

घेण्यास दिलें याप्रमाणे १५ दिवस दिलें त्यानें शौचास साफ होऊं लागून भूक वाढं लागली १५ दिवसानंतर रक्तबल वाढण्यास व गळयाऱ्याहि वारवार उद्भवणाऱ्या तक्रारी विचारांत घेतां त्यास **नवायसचूर्ण + तालिसादिचूर्ण + त्रिफलाचूर्ण** याच्या पुड्या **दशमूलारिष्टातून** घेण्यास दिल्या

वरील सर्व लक्षणावर या योगाचा परिणाम चांगलाच दिसू लागला रक्तालाहि पुरेसें बल मिळालें मेद शैथिल्यहि कमी व्हावयास लागून धातूच्या अबलत्वामुळे शोथकारण जो वायु त्याचेंहि शमन झाल्यानें शोथ कमी होऊं लागला याप्रमाणे एक महिनाभर औषध दिलें विकार दीर्घकालीन म्हणून औषधीच्या कार्यालाहि वेळ लागतोच

या योजनेनें एक महिन्यात पूर्वीची दम वगैरे लागण्याची तक्रार अजिबात नाहीशी झाली एवढेंच नव्हे, तर त्यानंतर तो व्यायाम व्यवस्थित घेऊं लागला पंचवीस नमस्कार व पाऊण मैलपर्यंत धावणें एवढा व्यायाम तो सहजी घेऊं शकला पूर्वीचा गळ्याचा त्रास औषध घेऊं लागल्यापासून उद्भवलाच नाही आवाजहि सुधरला नखाचा चापटपणा व पांढरेपणा जाऊन त्यानाहि योग्य बल मिळालें शोथ तर स्पष्टपणें कमीच झाला. पोटाचाहि मोठेपणा कमी झाल्यानें चालणें अगर धावणें या प्रक्रियेत फारसा अडथळाहि आला नाही यानंतर सर्व धातुबल्य, विशेषत रक्तबल्य, असें "लोहासव" १५ दिवस देण्यात आलें

सदर रोग्यात शोथ हा स्वतंत्र विकार नसून पांडुरोगातील लक्षणाचें,त्याला स्थान आहे स्वतंत्र शोथघ्न आंतर व बाह्य चिकित्सेपेक्षा पांडुरोगनाशक चिकित्साच अशा ठिकाणी जास्त कार्यकारी होते वस्तुत रोगी पांडुरोगी असून वरील शोथाचें शीर्षक देण्याचें प्रयोजन एवढेंच कीं, स्वतंत्र व्याधि निराळा असूनसुद्धा परतंत्र व्याधि अगर लक्षण एवढेच काहीतरी कारणानं लक्षात घेतलें जाऊन चिकित्स्य विकार बाजूस राहून योग्य चिकित्सा होऊं शकत नाही केवळ रोगी त्या लक्षणाला महत्त्व देतो म्हणून तो विकार स्वतंत्र मानून भागत नाही, तर स्वतंत्र विकार लक्षात घेणें हेंच चिकित्सेंत उपयुक्त होय

---

# (१६५) रक्तप्रदर व अपस्मार

रोगी, स्त्री, वय २८ वर्षे चार वर्षापूर्वी एक मूल झालें बाळंत होताना फार त्रास झाला त्यानंतर दोन वर्षानी अनियमित ऋतुस्राव होण्याची सुरुवात झाली अनेक तज्ज्ञ स्त्रीचिकित्सकाकडून औषधोपचार करण्यात आला, पण गुण आला नाही पुढे पुढे रोग्याम अपस्मारासारखे झटके येऊं लागले १० ते १५ दिवसानी काहीएक कारणा-

वांचून रोग्यास फीट येत असे. मासिक स्रावास फार वाईट वास येत असे. स्राव फारच होत असे ( profuse bleeding ). स्त्रीचिकित्सकाच्या सल्ल्यावरून बागडी ( pessary ) ठेवण्यांत आली. त्यानेहि फार फायदा झाला नाही. पाठीच्या कण्यात दाह होत आहे असें फीट येण्यापूर्वी साधारण एक तास वाटत असे. दाहाची सुरुवात खालून वर अशी होत असे

**निदान**—रोगी चिकित्सेस आला त्या वेळी स्राव फारच होत असे हातापायातून कढत वाफा निघत आहेत असें वाटत असे. मलावरोध होता अन्नावर फारशी इच्छा नव्हती लघवीस कढत होत असे स्वप्नें फार पडत असत लक्षणावरून मुख्य पित्तदोषांनी दुष्टि असे ठरवून व मलावरोधामुळे आत्राचा दाब मूत्राशय व गर्भाशय ह्यावर, त्यामुळे व गर्भाशयशैथिल्य म्हणून अनियमित स्राव, हातापायातून वाफ निघणे ह्यावरून भ्राजकपित्ताची दुष्टि हे सिद्ध झाले मलावरोध ह्यावरून अपानवायूची दुष्टि ( क्रुद्धस्तु कुरुते रोगान् घोरान्वस्तिगुदाश्रयान् ॥ ) स्वप्ने पडत असत त्यावरून मूत्राशयावर दाब पडत असला पाहिजे व त्यामुळें त्याची कार्यक्षमता कमी झाली होती अशा ठिकाणी **चद्रप्रभेतील** शिलाजतु व इतर असलेल्या औषधाच्या सयोगाचा उत्तम उपयोग होतो. म्हणून खालील चिकित्साक्रम ठरविला.

**प्रवाळभस्म** (चंद्रपुटी) २ गुजा (प्रवाळभस्म शीतवीर्य व दाहशामक म्हणून रक्तशुद्धि करणारे व पित्त कमी करणारे ) + **चोपचिनी चूर्ण** ४ गुजा + **चदनादि चूर्ण** ४ गुजा ( चदनादि चूर्ण मूत्रपिडावर काम करणारे व पित्ताचे तीक्ष्ण उष्ण गुण कमी करणारे ) + **कामदुधा** १ गुज (कामदुधा शीतवीर्य व पित्ताचे नियमन करण्याकरिता ) अशी एकएक पुडी **दाडिमावलेहातून** सकाळी ७ वाजता व दुपारी ४ वाजता दाडिमावलेहातून पुडी देण्याचे कारण अरुचि नाहीशी व्हावी व पित्तावर शामक असें कार्य व्हावे म्हणून **अशोकारिष्ट** १ (भाग अशोकसालीच्या कषायरसाच्या गुणामुळें गर्भाशयशैथिल्य ह्यावर परिणाम व्हावा व स्राव कमी व्हावा, लघवीहि थोडी सुधारावी ) + **दत्यरिष्ट** १ भाग व ४ भाग पाणी ( दंत्यरिष्ट शौचास साफ व्हावे, भूक लागावी व पोटात वायु होऊन त्याचा दाब गर्भाशयावर पडूं नये म्हणून )

दुपारी जेवल्यानतर एक तासानें **कडुनिबाची पाने** २ तोळे + **पाणी** ८० तोळे ह्याचा कोवट काढयाचा उत्तरबस्ति घेण्यास सागितला ह्याचे कारण स्रावास वाईट वास येत होता व योनिमार्गाची शुद्धि होण्याकरिता तो धुऊन काढणे अत्यत इष्ट होतें. उत्तरबस्ति तीनचार दिवस घेताच पाठीच्या कण्यात होत असलेला दाह व मुग्या चालतात असें लक्षण होते ते बद झाले. त्यावरून कोवट पाण्याचा परिणाम पृष्ठरज्जूवर आनून उत्तम रीतीने झाला रोगी उत्तम बरा झाला. मासिक स्राव नियमित होऊं लागला स्वप्नें बद झाली व भूकहि उत्तम लागूं लागली

---

# (१६६) पित्तभूयिष्ठ अपस्मार

मला एक बोलावणे आलें, तोच दुसरेंहि आलें! अर्थात् रोगी अत्यवस्थ असला पाहिजे आणि जाण्याच्या पंथातच असला पाहिजे असा मी अदमास बांधला! रस्त्यानें जातानाच रोग्याची हकीकत विचारता समजली ती —

रोगी ६–७ वर्षाची लहान मुलगी तिला ताप आला आणि दुसरे दिवशी एकाएकी वांति होऊन ती बेशुद्ध पडली अन् कनेंसेंच करायला लागली! ताप फार नव्हता

रोग्याच्या घरी गेल्यावर रोग्यास हाक मारली, पण उत्तर आलें नाहीं उष्णतामान ९९° होते नाडीची गति अत्यंत चपल होती मधून मधून ठोके देखील मोजता येत नव्हते! घाम एकसारखा चाललेला कातडी व डोळे पिवळट डोळ्याला संज्ञा काही नाही दृष्टि ताठ व एका बाजूला एक सारखी लागलेली ओठाच्या कोपऱ्यास बारीक बारीक झटके ( twitching of corners of mouth ) आणि त्यातून तारदार पिवळा फेंस व पाणी इतक्यात पापण्या आपोआप तीन चार वेळ मिटल्या व उघडल्या गेल्या हे एक सुचिन्ह समजून लागलीच मी औषधोपचार सुचविला "**लेंडीपिंपळी उगाळून मधातून चाटवा, ही जगेल**"

इतक्यात पुन जोराची वांति होऊन नाकातोंडातून पिवळे चिकट पाणी बाहेर आलें आणि हातापायास खूपच घाम येऊन अंग थंड पडलें "आता कशाची ही वांचते!' सर्वत्र रडारड! आता येथून पाय काढणेंच बरें असें समजून, "मी जातो आता," असें सागून य पलायनच केलें म्हणाना! पण जाता जाता पुन एकवार मधातून पिंपळी उगाळून ते चाटण द्या म्हणून सांगितलेंच

हा प्रकार दुपारी ४ चे सुमारास घडला आता सायंकाळी काय निर्णय होतो म्हणून मी वाट पाहतो तोच शुभ वातमी मिळाली "ती पोर जवळ जवळ गेली होती! पण जरा वेळानें तिनें ऊंऽऽ केलें अन् मग आम्ही तुमच्या सांगण्याप्रमाणे ते औषध दिलें आता ती तगमग फार करते आहे तर आता काय देणार?" तेंच औषध रात्रभर दर दोन तासानी चाटवीत जा आणि तिला झोप लागली तर मात्र उठवूं नका असें सांगितलें

माझ्या मतें हा पित्तभूयिष्ठ अपस्मार ठरला कारण त्यावेळी शरदृतु होता आणि एकदर लक्षणे "हृत्कम्प शून्यता स्वेदो ध्यान मूर्च्छा प्रमूढता।" ही स्पष्ट दिसून शिवाय तीत "पीतफेनाङ्गवक्त्राक्ष।" हेंहि लक्षण स्पष्ट दिसत होते रोग्यास होणाऱ्या भावना "पीतासृग्रूपदर्शन अनलव्याप्तलोकदर्शन" ह्या समजण्यास नीटसा मार्ग नव्हता मात्र तहान फार लागत होती म्हणून रात्री केवळ दूध व पाणी देण्यास सांगितलें अपस्मार हा व्याधि, मुख्य मर्म जे हृदय त्याचा आश्रय करून होणारा असल्यामुळे, अशा ठिकाणी रसायन औषधाचा उपयोग करावा लागतो तोंडावाटे पडणारें पिवळे पाणी

चिकट होतें, म्हणून तेथें आमाशयातील कफाचा पित्तामुळे उत्क्लेश झाला असावा अर्थात् या ठिकाणी पित्ताचें अनुलोमन करण्यास सद्द्रव्याचीहि जरूरी होती. व योगवाही आणि सूक्ष्म स्रोतोगामी असून पित्तास अविरोधी असे अनुपान हवे होतें; म्हणून या ठिकाणी मधाची योजना अनुपानार्थ केली होती आणि औषध म्हणून पिपळीचा उपयोग केला रात्रीतून शौचास व लघ्वीस होऊन सकाळचे सुमारास रोग्यास झोपहि लागली होती.

दुसरे दिवशी गेल्यावर तपासणी करताना रोग्याची होत असलेली हालचाल वगैरे पाहून व त्वचेचा रंग पाहून मला जरा नवल वाटलें ! कालचा तो पित्तल रग आज बदलला होता आणि आपल्या सागण्याप्रमाणें हालचालहि होत होती दुसरे दिवशीहि रोग्यास केवळ दुग्धाहारच देण्यास सांगून रोग्यावर झालेला मानसिक परिणाम नष्ट व्हावा आणि पित्तशमन व्हावें म्हणून चन्द्रप्रभावठी १ गोळी चार वेळ मोरावळ्यांतून घेण्याकरिता दिली यानें रोग्यास आरोग्यप्राप्ति झाली.

---

## (१६७) ऊर्ध्वग रक्तपित्त ( Haematemesis )

रोगी, वय ५० वर्षे. म्हातारपणामुळें मधून मधून दम्याचा विकार डोकावूं लागलेला, पण शरीरात निराळीच संप्राप्ति घडून आली !

एके दिवशी तिसरे प्रहरी रोग्याकडून तातडीचे बोलावणे आले गर्दी बरीच जमली होती, तरी मला मार्ग ऐसपैस मिळाला का बोलावले त्याचा उलगडा अजून व्हावयाचा होता म्हणून "काय झालं" असें मी विचारताच "काही नाही हो, त्याना रक्ताची वांति झाली. या घमेल्यात झाली होती आतांच आम्ही फेंकली. हा रक्ताचा बेडका पाहा"

या हकीकतीवर माझा विश्वास बसेना ! खोलीत लोहगंधि येत होती हे मात्र खरे आता खरा प्रकार रोग्यासच विचारावा म्हणून तिकडे वळलो मला पाहताच—

"भाऊसाहेब, आता कस करूं मायबाप ?" असे म्हणून रोग्यानें प्रथम एक नमस्कार केला "काय झाले ?" असे विचारतांच रोग्याने सर्व हकीकत घाबऱ्या घाबऱ्याच पण इत्थंभूत निवेदन केली.

"अगोदर दोनतीन दिवसापासून मला काळी परसाकडे होत होती, तरी मी तिकडे लक्षच दिले नाही. भूक काही लागत नव्हती, पण वेळेवर आधार म्हणून कांहीतरी खात होतो. आज जेवायला बसलो तो पोटात कसेसेच झालें अन् मळमळ सुटली हातांतला घास खाली पडून गेला ! परसाकडे लागली म्हणून तसाच हात धुतला अन्

गेलो काळी परसाकडे झाली अन् घरी आलो तो जास्तच मळमळ सुटली, घाम आला अन् मूर्च्छा आली आता आपली शेवटची वेळ आली म्हणून माझा मीच जमिनीवर निजलो तोच रक्ताची वांति झाली अन् थोडा वेळ बेशुद्धावस्थेंतच पडून राहिलो आता जीव फार कासावीस होतो आहे घबराट फार होते अन् पोटात भयंकर आग होत आहे! आता कसं करूं? यातून वाचविणारे तुम्हीच आहात मायबाप आता!"

"घाबरण्याचं काही कारण नाही तुम्ही स्वस्थ पडून विश्रांति घ्या मी औषध पाठवितो"

रोग्याने सांगितलेल्या हकीकतीवरून हे रक्त आमाशयातूनच आलें असले पाहिजे हे निश्चित होते अर्थात् हा विकार ऊर्ध्वग रक्तपित्त असला पाहिजे असे अनुमान केले यावर प्रथम शोधनचिकित्सा—विरेचनात्मक—करणें जरूर होतें पण रोग्याचें अवलम्ब लक्षात घेता शमन उपायाचीच योजना करणे बरें असें वाटून रक्तस्तंभन आणि रसवृद्धि व पित्तशमन होण्याकरिता पुढील चिकित्सा केली

प्रवाळभस्म २ गुंजा + दगडीबेर २ गुंजा + गुळवेलसत्व ४ गुंजा, चार पुड्या दर दोन तासानी दूर्वांचा रस, तांदळाचे धुवण व खडीसाखर यातून केवळ दुग्धाहारावरच राहण्यास रोग्यास सांगितलें शेळीचे दूध रक्तपित्त शमविण्यास उपयुक्त खरे, पण तें रोग्यास आवडत नसल्यामुळे गाईचे दूध घेण्यास सांगितलें

दुसऱ्या दिवशीची हकीकत—चार पुड्या घेतल्यावर जरा बरें वाटलें पहिली पुडी घेतल्यावर वांति झालीच रात्री परसाकडेस काळीच झाली वांतीवाटे मात्र पाणीच पडलं हे तरी बरं झालं पुड्या घेतल्यावर थोडी झोप लागली, पण अद्याप आग मात्र होत होती अन् अशक्तता फार आली होती दुसऱ्या दिवशीहि वरील योगच दिला व जेष्ठमधसिद्ध दुग्ध, जीवनीय व बल्य म्हणून, रसायनकाली दिले

तिसऱ्या दिवशी परसाकडेस नेहमीप्रमाणे पिवळट झाली, तेव्हा कोठें रोग्याच्या जीवात जीव आला आगहि अल्प होती म्हणून चंदनकल्प ३ मासे + शर्करा १ तोळा + उदक १० तोळे घेण्यास सांगितलें यामुळे चौथ्या दिवशी आग पूर्णपणे शमली. दुग्धाहारामुळे शोधन अल्प प्रमाणात होत होते त्यामुळे पोटात गडगड होऊन तीनचार वेळा शौचास जावे लागत होतें तरी पण साफ झाल्यासारखे वाटत नव्हतें! अंगाची रसरस, नेहमी ज्वर असल्याप्रमाणे वाटणें हीहि लक्षणे थोड्या प्रमाणात शिल्लक राहिली अर्थात् ते रसधातूची वृद्धि झाल्याशिवाय कमी होणार नाही असें वाटलें व कालांतरानें ही झीज आपोआप भरून येईल असं वाटून चिकित्सा थांबविली

पुढें अकाली अभ्रे येण्यास सुरुवात झाल्यामुळे व अगोदरची दम्याची व्यथा, तशात मागाहून झालेला रक्तक्षय यामुळे दम्याचा उपद्रव फारच जाणवू लागला

व्याधेरुपरि यो व्याधिर्भवत्युत्तरकालजः।
उपक्रमाविघाती च स उपद्रव उच्यते ॥

अर्थात् ही स्वतंत्र विकार समजून त्यावर पूर्वीच्या अगदी उलट उष्ण उपचार करावे लागले. खोकल्याचा त्रास इतका होता की, सर्व रात्र थंडीमध्ये जागून काढावी लागत होती अशा वेळी *सूक्ष्मसमीरपन्नग २ गुंजा आल्याचा रस व मध यातून सर्व रात्रभर ( प्राणकाली व मुहुर्मुहु ) मधूनमधून चाटणास दिले. दोन दिवसात खोकला बराच कमी होऊन झोप येऊं लागली. चार दिवसात खोकल्याची एकादीच उबळ फारच जोराने येऊ लागली व कफ लवकर सुटेना यावरून समीरपन्नगाचे कार्य कफसशोषणात्मक होते हे सिद्ध झाले पुढे कफ सुटण्यास जेष्ठमध, बेहेडा व खडीसाखर ही तोंडात धरण्यास सांगितली हा तमकश्वास अभ्रकाळी होतोच, पण रक्तपित्त मात्र बरें झालें आहे

---

## (१६८) गुदकुष्ठ (ह) (अहिपूतना)

( लहान मुलास गुदाजवळ होणारे व्रण )

रोगी मुलगा वय ६ वर्षे, बहिरा व मुका ६ महिन्यापासून कुल्ल्यावर फोड होऊन व्रण झाले होते शिवाय एक व्रण बेंबीच्याजवळ डाव्या बाजूस झाला होता प्रत्येक व्रणाचा आकार साधारणत पावलीएवढा असेल व्रणाची एकदर संख्या १५–१६ होती व्रण लाल असून अतिशय खाजत

हा मुलगा खोड्या करतो, खेळतो, पण लवकर दमतो ( श्वास ), याला दिवसातून ३–४ वेळा फार घाम येतो, अशी तक्रार मुलाच्या वडिलानी सांगितली

**रोगाचा पूर्वेतिहास**—या मुलास जन्मल्यानंतर दुसऱ्याच महिन्यात सपाटून खरूज ( कुष्ठ ) झाली कोपरापासून पुढे हात, गुढघ्यापासून खाली पाय व डोके सर्व मडले होते हाताची बोटे गळून पडतील की काय असे वाटण्याइतकी ती मूळाशी कुचली होती. सहा महिने कोणत्याच औषधाचा गुण येईना म्हणून एक साहसी उपाय केला ऑईल एंजिनात घर्षणाचे जागी घर्षण जास्त होऊ नये म्हणून घातलेले व घर्षणानतर तेथेंच साडलेले मळकट तेल आणून (यात त्या धातूचा अंश येतो ) रोज रात्री सर्वांगास फासावयाचा क्रम ४ महिने चालू ठेवला तेव्हा ते कुष्ठ बरे झाले तथापि दरसाल उन्हाळ्यात ( ग्रीष्म ऋतूंत ) हे फोड उठण्यास व व्रण होण्यास प्रारभ होऊन हिवाळाअखेर ते कुष्ठ चालू असते त्यात खाज मनस्वी असते व सरकारी दवाखान्यात मिळणाऱ्या पिवळया ( गंधकाच्या ) मलमाने ते बरे होत नाही

---

* १ गुंज औषध व १० गुंजा दुग्धशर्करा ( Milk Sugar ) हे मिश्रण एकत्र चांगले खलून औषध सूक्ष्म करतात

औषधयोजना —ढुगण ( स्फिक् ) व पोट ( उदर ) ही मेदाची स्थाने होत ( अ हृ सू ११, १० ) या ठिकाणी झालेले कुष्ठ प्राय मेदोधातूच्या दुष्टीमुळेच असणार घाम हे लक्षण मेद व पित्त याची दुष्टि स्पष्टपणे दाखविते रोगाच्या इतिहासावरून मज्जादुष्टीचाहि बोध होतो म्हणून या मुलास मेदोगतज्वरयोगकल्प ( मेदोगतज्वरावर उपयुक्त अशा काडेचिराईत, गुळवेल, चदन व सुठ या वनस्पतीचे काढे करून, गाळून, त्यात साखर घालून प्रथम बराच वेळ चुलीवर व शेवटी थोडा वेळ उन्हात आटवून तयार केलेली औषधि साखर ) १ मासा+मज्जायोगकल्प ६ गुजा+ रसांजन २ गुजा या मिश्रणाच्या ३ पुड्या त्रिकाळ मधातून घेण्यास दिल्या रसाजन हे पित्तकफनाशक ( अ हृ. उत्तरस्थान २, ७१ ), प्रसिद्ध मेद.पाचक ( अ. हृ सू १४ २३ ) व मलाचे शोधन करणारे आहे

बाह्योपचार—पारागधकाची कज्जली १ गुज + चदनादिवटी १ गोळी + रसाजन ४ गुजा ही पूड साध्या मलमातून व्रणावर लावण्यास दिली

या ओपधानी १५ दिवसात सर्व व्रण नामशेष झाले, खाज गेली घाम येणे सपूर्णत नाहीसे झाले, श्वास कमी झाला, इतकेच नव्हे, तर दिवसभर खूप खेळून शिवाय साय-काळी दीड मैल फिरण्याइतकी ताकद आली

" दरसालच्या अनुभवावरून इतक्या लवकर हे व्रण जातील असे आपणास वाटले नव्हते," असे उद्गार मुलाच्या वडिलानी काढले.

या मुलाचा बहिरेपणा कमी होण्याकरिता काही वातकफनाशक वनस्पतीनी सिद्ध केलेल्या महास्नेहाचे कर्णपूरण व नस्य रोज करण्यात येत असून पूर्वीपेक्षा ऐकू येते असा घरातील मडळीचा अनुभव आहे

हा मुलगा मोठ्याने ओरडू शकतो, तथापि जीभ लुळी असल्यामुळे बोलता येत नाही म्हणून वाचा प्राप्त होण्याकरिता इतर औषधियोगासह कल्याणकघृत रोज प्रात.काळी घ्यावयास सागितले आहे

---

## (१६९-१७०-१७१) जीर्ण-शीतज्वराचे तीन रुग्ण

आमचेकडे हिवताप बऱ्याच प्रमाणात आढळतो त्यामुळे वर्ष-वर्ष दोन-दोन वर्षे हिवतापाने पीडलेले रोगी बरेच आढळतात मलेरियाचे sexual forms मारण्या-साठी plasmoquine ची चिकित्सा प्रसिद्ध आहे आवर्तक शीतज्वराची पीडा

असलेले बरेच रोगी चिकित्सेला येत असल्यानें plasmoquine सारखें एखादें निश्चित गुणदायी आयुर्वेदीय औषध मिळतें कां म्हणून प्रयत्न केला गेला पहिल्या रोग्याला गुण आला, पण औषधाचा गुण निश्चित करण्यासाठी ती औषधि आणखी १४-१५ रोग्यांवर वापरून पाहिली. त्यानांहि गुण आलेला पाहून तो योग प्रसिद्ध करण्याची इच्छा झाली

Plasmoquine हें औषध हिंदुस्थानात बऱ्याच प्रमाणात खपतें पुष्कळसे रोगी हिवतापांतून उठल्यावर पौष्टिक म्हणून व हिवताप पुन्हा उलटून येऊं नये म्हणून एखाद्या औषधाची नेहमी मागणी करतात त्या वेळी डॉक्टर लोक "ईस्टन्स् सायरप' किंवा "क्विनोहिमोग्लोबिन" सारखे एखादे औषध देतात आयुर्वेदियानांदेखील असल्याच एखाद्या देशी औषधाची आवश्यकता असते.

अनुभव प्रसिद्ध करण्याचा उद्देश इतकाच की, त्यामुळे योगाची गुणविषयक कसोटी अधिकाकडून पाहण्यात येईल आणि तो योग गुणदायी ठरला तर plasmoquine सारख्या औषधाच्या द्वारे जाणारा पैसा कदाचित् हिंदुस्थानातच राहील

औषधाचा काढा अत्यंत कडु होतो. त्यामुळें शहरी लोकांना तो त्रासदायक वाटतो. पण कषाय आटवून त्याची पूड (रसक्रिया) कपस्यूलमधून दिली तरी सारखाच गुण येतो

हिवताप हा आपणाला अगदी साधा रोग वाटतो पण एखादे वेळी तो इतका "भुतासारखा" पाठीमागे लागतो की, "केचित् भूताऽभिषङ्गोत्थं वदन्ति विषमज्वरम्।" या वाक्याची सत्यता पटूं लागते. हिंवतापावरची उपलब्ध देशीविदेशी औषधं घेऊनहि कित्येकाचा हा व्याधि लवकर वश होत नाही. पुढील चिकित्सा असल्याच हिंवतापानं त्रासलेल्या रोग्यावर अनुभव घेऊन यशस्वी झाली आहे

रोगी वय २५ वर्षें, उद्योग शेती. गेले दीड वर्ष हिवतापाच्या आवर्तनानें आजारी. प्रत्येक महिन्याच्या १२ ते १६ तारखेपैकी कोणत्या तरी दिवशी थंडी वाजून ताप यावयाचा आणि मग औषध घेतलं म्हणजे दोनतीन दिवसात बरे वाटून रोगी पूर्ववत् कामास लागावयाचा. गेलं दीड वर्ष एकहि महिना थंडीतापावांचून रिकामा गेला नाही असे रोगी सांगत असे. डॉक्टरकडून plasmoquine इ चिकित्सा घेतली, पण ती नीट न साधल्यामुळे किंवा नवीन संपर्क झाल्यामुळें ताप येण्याचे टळलें नाही. प्लास्मोक्विन घेणे झाल्यावर तीनचार महिन्यानी रोगी आयुर्वेदीय चिकित्सा घेण्यास आला रोग्याला ताप येण्यापूर्वी किंचित् मलावरोध, हातपाय दुखणे, बोटे मोडावीशी वाटणे, ग्लानि इ लक्षणे होत थंडीचे चोरकाटे येत प्लीहा वाढलेली नव्हती, कारण रोगी लवकरच उपचार करीत असे रोगी नेहमी रात्री मच्छरदाणी वापरी.

रोग्यास **कुटकी** ४ मासे + **काडेचिराईत** ४ मासे + **हिरडेदळ** २ मासे + **आवळकठी** २ मासे ताजा काढा करून देत असे. हा कषाय एक महिना देण्यात आला. दररोज

एक तोळा चूर्णाच्या काढ्याच्या तीन मात्रा—रसायन, अपान, अपान या काली देण्यात येत नवीन संपर्क होऊ नये म्हणून मच्छरदाणी वापरण्यास सांगितली. औषधि सुरु असता रोगी आपले व्यवहार पूर्ववत् करीत असे औषध घेतल्यानंतर तीन महिने झाले रोग्याचे ताप येणे अजिबात बंद झाले

रोगी, वय २९ वर्षे चार महिनेपर्यंत महिन्यातून एकदोनदा थंडीने आजारी पडा-वयाचा ताप आला म्हणजे क्वीनेल घेऊन बरे वाटत असे रोगी क्षीण झाला होता व "क्षय झाला" ह्या भीतीने चिकित्सेकरिता आला त्यासहि कुटकी ४ मासे+ काडेचिराईत ४ मासे + हिरडे २ मासे + आवळकंठी २ मासे हा कषाय देण्यात आला गेले पाच महिने रोग्यास थंडीतापाची पाळी आली नाही मनातील क्षयाची भीतिहि नाहीशी झाली

रोगी, वय ३६ खेडोपाडी वसुलीसाठी फिरावे लागत असे पूर्वी हिवताप पाठीमागे लागलेला होता त्याकरिता डॉक्टरकडून पूर्णपणे एक महिना अॅटेब्रिन, प्लास्मोक्विन सिम्प्लेक्स, प्लास्मोक्विन सिल्व्हर टॉनिक ही औषधे "बाकायदा" घेण्यात आली अपेक्षेप्रमाणे दोन महिनेपर्यंत हिवतापाची पाळी आली नाही, पण दोन महिन्यानी पुन्हा थंडीताप येऊ लागला ( हा नवीन संपर्क असण्याचा अधिक संभव ) नंतर कुतूहलाने रोगी आयुर्वेदीय चिकित्सा घेण्यास आला. त्यास पुढील कषाय १५ दिवस देण्यांत आला गेले दोन महिने त्यास थंडीताप आला नाही

कटुका ४ मासे + किराततिक्त ४ मासे + अभया २ मासे + धात्री २ मासे कषाय दररोज ताजा करून तो दिवसातून तीनदा रसायन, अपान, अपान काली पुरविला जात असे

याप्रमाणे आणखी १०-१२ रोग्यावर हा कषाय पद्धतशीर रीतीने अजमावलेला आहे

वरील कषायकल्पना पुढील ग्रंथोक्त श्लोकावरून सुचली किराततिक्तकं तिक्ता मुस्त पर्पटकोऽमृता । घ्नन्ति पीतानि चाभ्यामात्पुनरावर्तकम ज्वर ॥ ( चरक चि ३, ३४३ ) पटोल-कटुका-मुस्ता-प्राणदा-मधुकै कृता । त्रिचतु पचश क्वाथा विषमज्वरनाशना ॥ योजयेत्त्रिफला पथ्या गुडूची पिप्पली पृथक् । तैस्तैर्विधानै सगुडं भल्लातकमथापि वा ॥ ( अ हृ चि १, १५१-१५२ ) नीलिनीमजगन्धा वा त्रिवृता कटुरोहिणीम् । पिबे-ज्ज्वरस्यागमने स्नेहस्वेदोपपादित ॥ ( अ हृ चि १, १५८ )

श्लोकात उल्लेखिलेली काही द्रव्यें एकएकटी वापरून पाहिली त्याचा परिणाम पुढीलप्रमाणे आढळला —मुस्ता—काढा एक महिना घेऊन परिवर्तन टळले नाही. पर्पटक—एक महिना घेऊन परिवर्तन टळलें नाही अमृता—प्रसिद्ध दोन कारखान्याची अमृतारिष्टें वापरून पाहिली, पण परिवर्तन टळलें नाही अभया—केवळ एका रोग्याचे परिवर्तन टळलें कटुका—बऱ्याच रोग्यांचें परिवर्तन टळलें किराततिक्त—महासु-

दर्शन चूर्णाचा कांही रोग्यात समाधानकारक परिणाम दिसून आला त्यात किराततिक्त हेच प्रधान द्रव्य आहे.

याप्रमाणे वरील भेषज समुदायापैकी कटुका, किराततिक्त, अभया ही उपयुक्त वाटली धात्री हे वय:स्थापक " वयस. स्थापने धात्री .... ." ( अ. हृ उ. ४०।५६ ) शरीरातील सर्व चित्परमाणूंना बल देणारी असल्यामुळें तिचा स्वीकार केला. बऱ्याच रसायन योगात अभया व धात्री ही जोडी वापरलेली आहे, व त्या त्या ठिकाणी आयुर्वर्धक— चित्परमाणूंचे बल व आयुष्य वाढविणारी—म्हणून त्यांचे गुणपाठ आहेत. जीर्ण विषमज्वरात अबलत्व व पांडुता येते अभया व धात्री ह्या पांडुतानाशक व रसायनी आहेत

वरील कषाययोग एकटाच वापरला तर हिवतापाची पाळी लवकर टळत नाही. पाळी टाळण्यासाठी प्रथम "[1]सप्तपर्ण रसक्रिया" (सात्विणीच्या काढयाची आटवून सुकवून तयार केलेली पूड ) वापरावी लागते. आणि नंतर वरील भेषजचतुष्टयाचा कषाय सुरू करावा लागतो. वरील कषाय ज्वरपूर्व देत गेल्यास कधी कधी पहिलीच पाळी टळते, पण ते निश्चित नाही. हा काढा सारक आहे, त्यामुळे सुरुवातीला मुरडा येतो व बरेच वेळा शौचास जावे लागते.

या काढयाचा मला "प्लास्मोक्विन" सारखा उपयोग झालेला आढळला सूक्ष्मदर्शकाचे अभावी याने sexual forms मरतात की नाही हे निश्चित् सांगता येत नाही हा कषाय जर सिद्ध झाला, तर प्लास्मोक्विन न परवडणाऱ्या खेडयातील गरीब जनतेला एक स्वस्त किमतीची चिकित्सा लाभेल

---

## (१७२) गर्भिणीचा मलेरिया

रोगी स्त्री, ब्राह्मण, वय वर्षे ३५ पहिली ३ मुलें असून चौथ्या वेळेस ७ महिन्याची गरोदर

तापाची लक्षणे:—प्रथम प्रथम दर तिसऱ्या दिवशी साधारणत दुपारी २ वाजण्याच्यापुढे थंडी वाजावयास सुरुवात व्हावयाची थंडीचा जोर फारच असे. ४-५ पांघरुणे

[1] सात्वीणसाल, गुळवेल, काडेचिराईत, कुटकी, कडुपडवळीचा वेल, कडुनिंबाची अंतर्साल, कुडा, व नीलिनी (काळा दाणा) ही सर्व वनौषधे समभाग, याचा काढा करून, गाळून, वाफेवर सुकवून, ती पूड १ मासा प्रमाणाने थंडी-तापाच्या पाळीच्या ३ तास पूर्वी घेतल्यास पाळी टळते

अंगावर घालून वर मनुष्य बसला, तरी थंडीचे हिसके कमी होत नसत. हें सुमारे अर्धा तास चाले, नंतर जोरदार ताप भरे सपाटून डोकें दुखे व कोरडया वात्या सारख्या चालू राहात तहानहि भयंकर लागे तापानंतर सपाटून घाम येऊन ताप उतरे. घामानें अंगातील सर्व कपडे व अंथरूणहि भिजे. घाम येऊन गेल्यावर खूप थकवा, ग्लानि येत असे.

**पूर्वीचे उपचार** —यावर डॉक्टराचें औषध दिलें त्यानें थंडीचा जोर थोडा कमी पडला, पण ताप एक दिवसाआड येई. तो रोजच्या रोज येऊं लागला. क्विनिन दिलें तर गर्भपात होण्याचें भय म्हणून अॅटेब्रिनच्या गोळ्या दिल्या पण त्याचा विशेष उपयोग झाला नाही "थंडी—ताप—घाम" हा क्रम १ महिना चालू राहिला गर्भपात झाला तरी चालेल, पण हा रोजच्या थंडी-ताप-घामाचा त्रास नको असें त्या बाईंना व त्यांच्या घरातील मंडळीना वाटूं लागले तथापि क्विनिनचा उपयोग करण्यापूर्वी आयुर्वेदीय औषध देण्यात आलें

**निदान**—रोग्याची वरील सर्व लक्षणे हीं मेदोगत शीतपूर्वज्वराची होती व तो ज्वर पित्तानुबंधि वातदोषाचा होता "थंडी-ताप-घाम" अशा क्रमानें येणारा ताप, मग तो रोज येवो, एक दिवस आड येवो, अगर दोन दिवस आड येवो, तो मेदोगत दोषामुळेंच असतो इतर धातूंच्या बाबतीत "स्वेद" हे लक्षण संभवत नाही पाश्चात्य विचारसरणीनुसार थंडी, ताप, घाम क्रमानें येणे हें मलेरिया ज्वराचें स्पष्ट स्वरूप आहे

**चिकित्सा**.—रोगी गर्भिणी असल्यामुळे अगदी सौम्य उपाय करण्याचें ठरविलें व रोज एकदा, थंडी येण्यापूर्वी अदमासें ३ तास, १॥ मासा मेदोगत ज्वरयोगाचा कषाय करून घेण्याकरिता दिला १ तोळा मेदोयोगात ( काडेचिराईत+गुळवेल+पांढरा चंदन+मुठ, सर्व समभाग ) सर्व विकार आटोक्यात आला नंतर त्याच काढ्यात थोडें तूप टाकून घेण्यास दिल्यामुळें जीर्णज्वराचें ( वातदोषाचें) शमन होऊन क्विनिन घेण्याची आवश्यकता राहिली नाही

---

## (१७३) कुष्ठ ( विचर्चिका )

रोगी मुलगा, वय ६ वर्षें दोन्ही घोटे फोडांनी व्याप्त, चिघळलेले, फोडाच्या खपल्या जाड, दडस, पण खपली निघाल्यास वा काढल्यास मात्र एकसारखे चिकट पाणी वाही फोड घोट्याच्या सर्व बाजूंनीं आलेले असून विशेषत पोटरीच्या बाजूस पिंडिकेपर्यंत पसरलेले होते पुढच्या बाजूसहि दोन्ही पंजापर्यंत पसरलेले होते खाज बरीच

होती. त्यातल्यात्यात रात्री तर जास्तच ती एवढी की, झोपेत पायावर पाय तर घासीत असेच, पण हातानेंसुद्धां ते फोड सारखे खराखरा खाजवून ओरबाडी फोडांचा वर्ण कडेस पित्रळसर व मध्यंतरी किंचित् काळसर होता. स्राव श्वेतवर्णीय होता

तपासाती हे फोड गेल्या ३ महिन्यापासून असल्याचे कळले कारणांचा तपास काढता काचेचा तुकडा लागून मग फोड यावयास लागले असे रोग्याने सांगितले. परंतु रोगी लहान असल्यानें उत्पत्तीचा जास्त तपास लागूं शकला नाही प्रथम डाव्या घोटयावर फोडास सुरुवात होऊन नंतर ७-८ दिवसानी उजव्या घोटयावर फोड येऊं लागले व हळूहळू चरत जाऊन त्याची व्याप्ति वर निर्दिष्ट केलेल्या प्रमाणात झाली होती

यावर घरगुती सामान्य उपाय झाले पण विशेष फरक न पडता हळूहळू व्रणव्याप्ति जास्तच होत चालली.

**निदान.**—वरील उग्र कंडु, पिच्छिल स्राव, व्रणाच्या घन कडा इत्यादि लक्षणावरून, स्रावस्वभावावरून, कालदैर्घ्यावरून व क्रालानुपशयावरून **कफभूयिष्ठ दोष** अनुमित केले सधि हेहि स्थान कफाचे, त्यातलेत्यात अधोभागाचे सधि, हेहि त्या अनुमानास पोषक असेच होते. शिवाय दोष सधिगत म्हणून क्लेदहि जास्त **रस व रक्त ही दोन दूष्यें** ( अनुक्रमें १ दाट, चिकट व सारखा वाहणारा स्राव आणि कडु व २ फोडाच्या मध्यभागी काळसरपणा, यावरून) व्यक्त होत होती यातहि अशाश विकल्पना म्हणजे रक्तदुष्टि अधिक व रसदुष्टि अविकतर एकदर लक्षणावरून हे कुष्ठ **विचर्चिच** होतं ( सकण्डुपिडका श्यावा बहुस्रावा विचर्चिका । ) असं निदान करून रोगी पुढीलप्रमाणे चिकित्सिला.

**चिकित्सा.**—रोग्यास वस्तुत. प्रथम वमन देणे आवश्यक, परतु शक्य नव्हते. परतु शुद्धि मात्र आवश्यक. कफभूयिष्ठ दोष विरेकशोध्यहि आहेत म्हणून शुद्धि होण्याकरिता **त्रिवृत् + पिपळी** या द्रव्याचा काढा सकाळी देण्यात आला. याने तीन विरेक झाले. पहिल्या दिवशी एवढीच चिकित्सा दुसऱ्या दिवसापासून पोटातून कफ, रस, रक्त याच्या शुद्धि व पचनार्थ **रसयोग + रक्तयोग** १-१ मासा एकत्र करून त्याचा काढा देण्यास सुरुवात केली व्रण प्रथम गरम पाण्याने धुऊन, कोरडे करून नतर त्यावर **कुचला बी** पाण्यात उगाळून लावण्यास दिली

( **कुचला** हें द्रव्य जीर्ण कुष्ठावर, स्तब्ध व स्थगित व्रणावर घटकाना चालना देण्याकरिता व व्रणशुद्धीकरिता अतर्बाह्य उपयोगात आणता येते एवढेंच नव्हे, तर कोणत्याहि विकारात इतर औषधाचे कार्यकारित्व व्यक्त होत नसेल, तर मध्यतरी थोडया प्रमाणात कुचला दिल्यास ते व्यक्त होऊं लागते शिवाय कुचल्यातील कोथनाशकत्वहि प्रसिद्धच आहे. परंतु पोटातून देताना ज्याप्रमाणे कुचल्याच्या मात्रेचा विचार करावा लागतो, तसाच बाह्यत उपयोगितानाहि करावयास पाहिजे "कारस्करो मदकर कुष्ठरक्तविकारहा । कण्डुं कफं वातरोगं व्रणं ' जयेत् ॥ " अशा गुणधर्माच्या व

शिवाय तिक्त व कटु रसाच्या कुचल्याच्या जीर्णव्रणशुद्धिकारक, व्रणक्लेदनाशक व देहघटकसंचालक या त्रिविध दृष्टींनी फारच उत्कृष्ट उपयोग होतो. कुचला वी उगाळण्यास फारच कठीण असतें )

काही दिवसानी कुचल्याबरोबर त्वक्सावर्ण्यार्थ हरिद्राहि उगाळून लावण्यास सांगितली होती. यात एक गोष्ट लक्षात ठेवावयास पाहिजे की, कुचल्यासारख्या तीक्ष्ण वा विषद्रव्याचा कुष्ठावर लेप करताना त्या वेळी अगर तत्पूर्वी अंतःशोधन आवश्यक आहे तसें न करता केवळ तीक्ष्णद्रव्यलेप कुष्ठवर्धक होतो ( तीक्ष्णालेपोत्क्लिष्टं कुष्ठं हि विवृद्धिमेति मलिने देहे । वाग्भट चिकित्सा )

चिकित्साकाल एकूण २२ दिवसाचा झाला. नंतर फक्त व्रणवस्तुबलाकरिता तैलाभ्यंग करण्यास सांगितला

---

# (१७४) कफज अण्डवृद्धि

रोगी, वय ८० वर्षें पूर्वी ४५ व्या वर्षी हाच अण्डवृद्धीचा रोग डाव्या बाजूस झाला होता त्या वेळी पैशाला चुना, भिलावा लावून पायाच्या वसूच्या कल्पात आगठ्यावरच्या शिरेवर (tendon) व पोटरीच्या मध्यभागीं (इंद्रबस्तिजवळ ?) बांधला होता तेथें फोड येऊन पाणी निघून जाऊन तो रोग बरा झाला व हा उपचार एका वैद्यानें केला होता असें रोग्याचें म्हणणे. हल्ली रोग्याच्या पाठीवर उजव्या भागास भिलाव्याच्या तेलाच्या तीन उभ्या रेषा पिचडलेल्या दिसत होत्या वृद्धि डाव्या बाजूची होती हा प्रकार १५ दिवसापूर्वी घडून आला असें सांगण्यात आलें. वृद्धि कठीण असून जांघाड्यातून वृषणापर्यंत त्याच बाजूस कळा निघत होत्या आणि बसताना प्रथम वृषण सुस्थितीत ठेवून मग बसावें लागत होतें बैलगाडीतून ४२ मैल प्रवास झाल्यामुळें हा रोग पुन्हा उद्भवला असावा

जांघाड्यातून वृषणाकडे येणाऱ्या कळा या वायूची विगुणगति व "वृद्धि" रोगाची वाग्भटोक्त संप्राप्तिच सिद्ध करतात —

क्रुद्धो रुद्धगतिर्वायु शोफशूलकरश्चरन् । मुष्कौ वंक्षणत. प्राप्य फलकोशाभिवाहिनी ॥ प्रपीड्य धमनीर्वृद्धिं करोति फलकोशयो ॥२२॥

ह्या वृद्धीत काठिण्य प्रामुख्यानें असून शूल त्या खालोखाल होता शीतत्वाचा विशेष प्रत्यय आला नाही. तसेंच कडु हें लक्षण पुढें उत्पन्न झालें शौचास साफ होत नव्हतें

सर्व लक्षणे विचारात घेता हा रोग **कफज वृद्धि** आहे हें निश्चित करून नंतर'—**दारुहळदीचे चूर्ण गोमूत्रांतून** ( गोमूत्रेण पिबेत्कल्कं श्लैष्मिके पीतदारुजम् ॥ अ. हृ चि. १३, ३३ ) प्रातःकाली घेण्यास दिले आणि बाह्यत **शोथहर लेप** पाण्यात उगाळून कोमट करून लावण्यास व वेतानें (सोसवेल असे) शेकण्यास सांगितले वृद्धि बरीच कमी झाली. कळा थांबल्या. परंतु काठिण्य किंचित प्रमाणात कायम होते म्हणून शोथहर लेपाऐवजी **ग्रंथिभेदन लेप** (अ हृ चि १८, २६) लावण्यास दिला यामुळें प्रथम कडु उत्पन्न झाला व आग फार झाली म्हणून लेप धुऊन घृतालेपन (**तिक्तक धृताचें**) केले. याने दोन्ही वृषण समप्रमाणात आले

ही अण्डवृद्धि एक महिन्याच्या आतीलच होती म्हणून आठच दिवसात बरी होऊं शकली. ती पुष्कळ दिवसाची असल्यास जास्त वेळ लागेल हे उघड आहे

रोग्यास औषध घेतल्यानंतर गोमूत्राची चव कळते व त्यामुळें तोड फार वाईट होते. ही चव न कळण्यास निरनिराळ्या अर्कांचा उपयोग व विशेषत वातवैगुण्य नष्ट करणाऱ्या अर्काचा उपयोग केल्यास गोमूत्राची चव बदलून औषधात वैविध्य आणता येते

गोमूत्रामुळे प्रथम १–२ वेळा शौचास जावे लागले, पण ३ दिवसानंतर फक्त परसाकडे साफ झाली. विरेचन झाले नाही

**गोमूत्र** ७॥ तोळे+**दारुहळदीचे चूर्ण** (दार्वीकल्क) ½ तोळा+**वेदनाहर तैल** ४ थेंब एक वेळ सकाळी पिण्यास आणि **शोथहर लेप** ६ मासे+**गुग्गुळ** ६ मासे वरून लेप लावण्यास याप्रमाणें चिकित्सा केली होती आणि ती सफल झाली

---

## (१७५) सर्वांगशोफ

रोगी पुरुष, वय वर्षे ५७, लिंगायत

**लक्षणे.**—डोक्यापासून तळपायापर्यंत सर्वांगास सूज, लघ्वीचें प्रमाण कमी, लघ्वीतून अल्ब्युमिन जाणे, यकृतवृद्धि (किंचित्), अग्निमांद्य, डोळ्याच्या पापण्याभोवती व चेहेऱ्यावर विशेष सूज

रोगी सुजेची तक्रार घेऊन प्रथम आला रोग्याची लघ्वी तपासता त्यात अल्ब्युमिन सांपडले. यकृत् हें शिपलीच्या खालच्या बाजूस ( epigastric region मध्ये ), थोडेसे वाढलेलें होते

**चिकित्सा.**—रोग्यास दूध-ताकावर ठेवून त्याला रोज एका डब्यातील अननसाच्या फोडी ( सिंगापुराहून येणारे अननसाचे बंद डबे सर्वत्र विकत मिळतात ) खाण्यास

मागितलं. ७-८ दिवसांत रोग्याच्या पायाची व माड्याची सूज कमी झाली. हलके हलके सूज कमी होत जाऊन १५-२० दिवसात रोग्याची सर्व सूज नाहीशी झाली दूध व ताक घेण्याचे प्रमाण वाढले व शक्तीहि वाढूं लागली लघ्वीतील अल्ब्यूमिनचे-प्रमाण नाहीसें झाले. याप्रमाणे रोग्यास एक महिनाभर उपचार केला. याने रोगी पूर्ण बरा झाला.

अननसाच्या रासायनिक पृथक्करणात त्यात जवखार १९½ टक्के, चुन्याचा क्षार १२ टक्के व किंचित् लोहाचा अंश असल्याचे संशोधकास आढळून आले आहे.

अननसाचे या रोग्यात दृष्टोत्पत्तीस आलेले कार्य बहुधा त्यातील जवखाराचेच असावे कारण जवखार हा दीपक व मूत्रल आहे. त्याचे कार्य पित्तवहस्रोतसावर होऊन पित्तस्राव योग्य प्रमाणात होऊं लागतो. मूत्रपिंडाच्या विकृतीत मूत्र कमी निर्माण होते. अशा वेळी याचा मूत्रल म्हणून चागला उपयोग होतो आणि लोहामुळे व चुन्याच्या क्षारा-मुळे अग्निवर्धक व बल्य असा परिणाम दिसून येतो

सेंद्रिय द्रव्यातील रासायनिक द्रव्ये शरीरात लवकर शोषली जातात व त्याचे कार्य अनपायी असे होते

---

# (१७६) मृद्भक्षण पाण्डुरोग (कफज) व अपस्मार

रोगी मुलगा, वय १४ खेडेगावी राहणारा लहानपणीं काळी चिक्कण माती खाल्ल्या-मुळें पाण्डुरोग झाला होता व आतापर्यंत अनेक उपचार होऊनहि रोग कायम होता

लक्षणे---अंगावर थोडी सूज, पाढरेपणा, अग्निमांद्य, आळस ही होती. काळ्या मातीने कफप्रकोप होऊन ती निर्माण झाली होती

चिकित्सा.---( चिकित्साकाल शिशिरऋतु ) कफप्रकोपामुळे पोटात जंत झाले असतील असें गृहीत धरून प्रथम कृमिघ्न औषध दिले, त्यामुळे चार जंत पडले नंतर कफज पाण्डुनाशक अशी पुढील औषधे दिली ---

नवायस लोह ६ गुंजा + शुद्ध हिराकस २ गुंजा + कर्पूरक्षार* ३ गुंजा, २ पुड्या मधात, आठ दिवस ही औषधे दिल्यानंतर तीन दिवसपर्यंत रोज, पोटात गेलेली माती हे

---

* कर्पूरक्षाराची कृति ---उत्तम कापूर ⅓ तो + ओव्याचे फूल ⅓ तो + अस्मानतारा (पेपरमिंट फूल) ⅓ तो या एक तोळा मिश्रणात ४० तोळे साखर मिश्र करून त्याचा कोरडा खल करून ते औषध बूचबंद बाटलीत भरून ठेवावे.

या रोगाचें कारण नाहींसे करण्याकरिता, **मृद्विरेचन चूर्ण** ३ गुंजा (प्रत्येक पुडी) दिव-सातून तीन वेळ दुधातून दिलें त्यामुळे शौचास २-३ वेळ काळी व बरीच झाली

चौथ्या दिवशी दिलेल्या मृद्विरेचनाचा परिणाम अकल्पित असा झाला. सायंकाळी चार वाजल्यापासून चक्कर येऊं लागली, रात्री बेशुद्ध झाला, हातपाय आपटूं लागला व मधून मधून 'ये-ये-ये' असें ओरडूं लागला. सकाळी पाहता बेशुद्धि, तोंडास पाढरा फेंस, अंग थडगार व पोटात औषध अगर पाणी जात नाहीं अशी स्थिति आढळून आली रोग्यास पूर्वी कधीहि असा अपस्माराचा विकार झालेला नसल्यामुळे कृमि हेंच या विका-राचें कारण ठरवून **सँटोनाईन** १ गुंज + **शर्करा** ६ गुंजा याच्या तीन पुड्या करून पाण्यावरोबर दिल्या व त्यावर **वावडिंग, वचा, बाहवामगज** व **निशोत्तर** प्रत्येक ।- तोळा याचा काढा पाजण्यास सांगितले ते औषध अर्धवटच पोटात गेलें दुपारी बस्ति दिला, त्याचें पाणी आत गेलें नाही व रात्रीपर्यंत शौचासहि झाले नाही

त्या रात्री ही बेशुद्धि घालविण्याकरिता **तीक्ष्ण नस्याची** योजना केली **श्वासकुठार** मात्रेचें चूर्ण १ मासा कागदाच्या नळीनें रोग्याच्या नाकात फुंकलें. त्याने नाकातून डोळ्यातून पाणी आलें व १-२ शिंका आल्या रात्री अर्धवटच शुद्धीवर आला नंतर पोटातून घेण्याकरिता **सूक्ष्मसमीरपन्नग** ३ गुंजा + **पिंपळी** २ गुंजा या मिश्रणाच्या तीन पुड्या करून ऊन पाण्यावरोबर घेण्यास दिल्या याने बेशुद्धि नाहीशी झाली तेच औषध पोटातून आणखी दोन दिवस दिले दीर्घकाल बेशुद्धि, पाढरा फेंस इत्यादि कफज अपस्माराची लक्षणे पाहूनच वरील योजना केली होती

मागाहून चौकशी करता असें समजलें की, तत्पूर्वी रोगी दूध बरेंच प्याला होता दूध कफकारक, रोगाचा दोष, कफ व तो ऋतु कफसंचय करणारा, असें एकत्र जमून हा विकार बळावला

अपस्माराचा वेग गेल्यावर पुढे चार दिवस **सूक्ष्मसमीरपन्नगासह पूर्वीच पाण्डु-रोगप्रत्यनीक औषधीयोजना** चालू केली व रोज १ मासा **मृद्विरेचन चूर्णहि** चालू ठेवलें त्याचा परिणाम असा झाला की, चौथ्या दिवशी पुन अपस्माराचा झटका आला लक्षणे पूर्वीप्रमाणेच होती दोन्ही वेळ मृद्विरेचन चूर्णाच्या उपयोगानंतर झटका आला म्हणून त्याचा पाठ ( **मुरदाडशिंग २, वडिशेप ३, शुद्ध गंधक २, वेलची १ भा.ग** ) पाहता त्यात कफवर्धक द्रव्ये नाहीत असें आढळून आलें विचाराती तिर्यग्गत दोषाचें घाईनें शोधन केल्याचा हा परिणाम आहे हें लक्षात आलें

प्राय तिर्यग्गता. दोषा क्लेशयन्ति आतुरान् चिरम् ।
कुर्यात् न तेषु त्वरया देहाग्निबलवित् क्रियाम् ॥ (वा सू १३-२१।२२)

हा मुलगा ५-६ वर्षापासून आजारी होता व त्याच्या आतड्यास मातीची संचय झाली होती ती माती एकदम शोधन करून काढण्याच्या प्रयत्नामुळे त्याला हा अप-स्माराचा त्रास आला

या वेळी पूर्वीच्या नस्यादि उपायाने लवकर शुद्धि आली. नंतर पुन: पूर्वीची पाण्डुरोग-नाशक औषधे दिली  मात्र ४–६ दिवसानी मृद्विरेचन चूर्णाची पुडी देत असे

या औषधाने रोग्याचा पांडुरोग बरा झाला असून त्यास पूर्ण स्वास्थ्यलाभ झाला आहे

---

## (१७७) उन्माद ( Hysteria )

रोगी स्त्री, वय ३५, मारवाडी  डोके फार दुखते ही मुख्य तक्रार  एकंदर शरीर-प्रकृतीकडे पाहता व सांधे दुखण्याचीहि तक्रार होती हे लक्षात घेऊन आमवातजन्य शीर्षशूल असें निदान केले व त्या वेळी आमवातावरील व विशेषत गर्भाशयदुष्टी प्रधान म्हणून चंद्रप्रभावटी, उन्हाळयाचे औषध व अनंता याचें योग्य प्रमाणात मिश्रण करून ते सकाळ-सायंकाळ तांदुळाचे धुवण व साखर यातून देण्यास सुरुवात केली

सुमारे चार दिवस चिकित्साक्रम सुरू केल्यानंतरहि रोग्याचे डोके दुखणे थांबेना व एके दिवशी सकाळीच रोग्यास भ्रम झाला आहे म्हणून मला बोलावण्यात आले  मी जाण्याच्या पूर्वीच एका वैद्याने समीरपन्नग आल्याचे रसात उगाळून दिला परंतु रोग्याने ते चाटण फेकून दिले असे सांगण्यात आले

रोग्याची एकंदर स्थिति पाहता रोग्यास उन्माद झाला आहे अशाबद्दल माझी खात्री झाली व मी मागील इतिहास विचारला  तेव्हा अशा प्रकारचे झटके येण्याची सवय रोग्यास आहे, परंतु हा प्रकार पहिल्यापेक्षा भिन्न होय असें सांगण्यात आलें

रोग्यास बस्ति देणे शक्य नव्हतं  तेव्हा मुख्यत पक्वाशयस्थ वाताचे अनुलोमन व्हावे व त्यामुळे वाताचा विबंध कमी व्हावा म्हणून व वारंवार येणारे आक्षेपहि कमी यावेत याकरिता ताप्यादिलोह २ गु सकाळी, दुपारी व रात्री मधातून देण्यास सांगितले

आता हा शीर्षशूल कसला हे माझ्या ध्यानात आले व मी साहजिकच मानसिक संतापाबद्दल चौकशी केली  अर्थात् त्यावेळी या गोष्टीचा मला पत्ता लागला नाही  तसें "काही नाही," "काही नाही" असें सांगण्यात आले

आलेला उन्मादाचा वेग बराच मोठा असल्याने औषधाचे कार्य एकाच दिवसात दिसणे शक्य नव्हते, व रोगी जास्तच वेडावल्यासारखा करू लागला  तेव्हा ज्या वैद्याने समीरपन्नग दिला त्यानेच या रोग्याचे "तापाशिवाय सन्निपात" व ही सन्निपाताची बडबड वातवृद्धि आहे असें सांगून रोग्याच्या घरच्या मंडळीस घाबरून सोडले व त्यामुळे त्या रोग्यास एका मोठ्या शहरी नेण्यात आले व तेथे एका मोठ्या डॉक्टरचे औषधोपचार सुरू केले  सुमारे १५–१६ दिवसानंतरच्या औषधोपचारानंतर विशेष

फरक दिसेना, म्हणून रोग्यास परत गांवी आणण्यात आले व पुनरपि औषधाचा प्रश्न पडला. तेव्हां कलकत्याच्या प्रसिद्ध रॉयच्या गोळया ( Roy's specific pills for insanity ) सुरू करण्यात आल्या. रोज सकाळी चार गोळया व सायंकाळी चार असे सहा दिवसास एक बाटली याप्रमाणे चार बाटल्या चोवीस दिवस दिल्या या मुदतीतहि रोग्याच्या मन स्थितीत फरक दिसेना. म्हणून सदरहू रोगी पुनरपि मजकडे औषधोपचारासाठी आला या वेळी मात्र एक महिन्याची मुदत मागून घेऊन औषध सुरू केले

" उन्माद, अपस्मार स्मृतिनाश किंवा बुद्धिविभ्रम यातील एकंदर अवस्थेंत सर्व मानसिक यंत्राला एक प्रकारचा कमजोरपणा आलेला असतो त्याला पाहिजे असलेल्या पोषक पदार्थांचा भरपूर पुरवठा न मिळाल्यामुळें ही वस्तुस्थिति उत्पन्न झालेली असते ह्या विकारात मनोयंत्राचे पोषण करता आले तरच हे विकार बरे होण्याचा संभव असतो." ( औ. गु. ध. शास्त्र भाग पहिला ).

सदर रोग्याच्या उन्मादात पित्तदोष प्रधान असून वाताचा त्याला अनुबंध होता. गार पदार्थांची इच्छा, वारंवार घाम येणे, कपडा सहन न होणे, याबरोबरच मधून मधून इकडून तिकडून पडणे, मध्येंच स्वस्थ बसणे, मध्येंच बाहेर जाणे, पुन्हा येऊन बसणे ही वाताच्या विषम वेगाची लक्षणे होती औषधोपचार सुरू करावयाचा त्या वेळी उन्मादी रोग्याची स्थिति बरीच खालावली होती या वेळी उन्मादाची तीव्रावस्था नसून दोष लीन झाले होते त्यामुळें रोगी काही वेळ बरा, तर काही वेळ पुन. विकृत स्थितीत असे

मनोवह स्रोतसावर कार्यकारी, विशेषतः पित्तवातात्मक दोषावर कार्यकारी व मज्जा या दूष्याला शामक व पोषक म्हणून खालील कषाय सुरू केला

**जटामासी** -॥- तोळा + **वाळा** -॥- तोळा + **धमासा** -॥- तोळा + **रक्तचंदन** -॥- तोळा, पावशेर पाण्यात अष्टमाश काढा करून त्यात तीन मासे खडीसाखर टाकून तो रोज सकाळी देण्यास सुरुवात केली. याबरोबरच वरील दोषदूष्याना शामक व बल्य म्हणून **सुवर्णमाक्षिक** भस्म १ गुंज सकाळी व रात्री मोरावळ्यातून देण्यास सुरुवात केली कषाय सुरू केल्यापासून सुमारे ७ दिवसाचे आत रोग्याची लक्षणे कमी होऊं लागली चक्कर येणे थांबले पूर्ववत् बडबड होईनाशी झाली व रोगी स्वत चे काम साधारणपणे पाहूं लागला यानंतर पुढें नुसता कषायच सुरू ठेवला व सुमारे एक महिनाभर तो कषाय घेण्यात आला त्यानंतर रोग्याची मन स्थिति तद्वत् शारीरिक स्थिति सुधारली.

जास्त मानसिक श्रम झाल्यास केव्हा तरी डोकें दुखतें व थोडा त्रास होतो असें काही झाल्यास रोगी आपण होऊन वरील कषाय २-३ दिवस घेतो. त्यामुळें त्याला बरें वाटते.

---

## (१७८) अर्दित (तोंड वांकडें होणें)

एका रुग्णास अर्दित झाला त्याला कारण त्यानें थंडींत गळ्यावर राखणाकरितां जोपावें लागलें थंडीचा कडाकाहि खूप होता दोनतीन दिवस ह्याप्रमाणें झोपल्यावर एके दिवशीं सकाळी रुग्णास अर्दित झाल्याचें प्रत्ययास आलें. हें बाह्य, सन्निकृष्ट म्हणजे नजीकचें कारण घडलें

रुग्णाचीं लक्षणें व तपासणी —बद्धकोष्ठ पुष्कळ शेतीचा व्यवसाय असून व नेहमीं चागला व्यायाम घडत असून बद्धकोष्ठाचा आजार होता. शेतीचा व्यवसाय हल्लींचा परतु पूर्वीचा व्यवसाय बैठाच असल्यानें हा आजार हळूहळू वाढतच राहिला पोटांत गुबारा धरणें हेंहि लक्षण होतेंच

नाडी भरदार व थोडी जलद, अग्न्याभिनोदन वाटलेलें, डोळे लालसर, चेहरा फुगीर, सर्वांगावर थोडा फुगीरपणा, तोंडावरच्या—विशेषत कपाळावरच्या—शिरा फुगलेल्या, उजव्या बाजूचा तोंडाचा भाग वाकडा झालेला, दोन्ही ओंठ मिळविणें अशक्य, गुळणी वाकडी जाणें, बोलताना ओष्ठ्य वर्ण उच्चारता न येणे, तोंडातून लाळ गळणें, शिर शूल ही लक्षणें प्रामुख्यानें होतीं सदरच्या रुग्णास खालीलप्रमाणें औषधयोजना केली

औषधयोजना—शुद्ध शिलाजतु ½ गु + अनंतमूळ चूर्ण २ गु , सकाळी, दुपारीं तुपांत मिश्र करून पुडया २ व विजयामृत (चूर्ण) ३ मासे १ पुडी रात्रीं गरम पाण्यात या औषधयोजनेनें रुग्ण एक महिन्यात उत्तम सुधरला

---

## (१७९) हस्तपादशोथ व श्वास

प्रस्तुत रुग्ण औषधोपचारार्थ आला त्या वेळी पुढील स्वसंवेद्य व परसंवेद्य आकृतीनीं पीडित होता सकृत्दर्शनी हस्तपादशोथ व श्वास ही लक्षणे प्राधान्यानें व्यक्त होत होती जास्त तपास काढता मुखपाक व चालू लागलें की दम लागणे ही लक्षणे आढळून आली शोथ, श्वास व थकवा (विशेषत चालल्यानतर) या लक्षणसमुच्चयावरून उदरपूर्वरूपाचें अनुमान होऊन त्या दृष्टीनें केलेल्या परीक्षणात सौहित्यासहत्व, आध्मान व दुर्बलाग्नित्व ही लक्षणे ज्ञात झालीं या लक्षणानीं प्रथमच्या अनुमानास बळकटी आली अर्थात प्रस्तुत रुग्ण उदर-पूर्वरूप-पीडित होता

रोग्याचें वय सुमारे ६० वर्षांचें होतें मारवाडी, आहारात घृतप्रमाण अधिक प्रकृतीत मेद सचय त्यामुळें रोधप्रवृत्ति वर्ण गौर पित्तबाहुल्य व वृद्धावस्था याच्या

ऐकण्याने मेद शैथिल्य व्यक्त होण्याएवढें. व्याधिजन्मदेश साधारण बल, धातु-सहननत: क्षीण व सत्त्वतः मध्यम स्वरूपाचें होते

व्याधिसंप्राप्तिजन्मर्तु वर्षा व वृद्ध्यर्तु शरद दोन्ही काल पित्तप्रधान व्याधीच्या उत्पत्ति व वर्धनास अनुकूल. त्यातल्यात्यात वर्षाऋतूंतील परिस्थिति अग्निमांद्यास अनुकूल उदरांत अग्निमांद्य हे लक्षण अव्यभिचारानें पाहिजे (अग्निदोषान्मनुष्याणां मंदेऽग्नौ जनयत्युदरम्। उदराण्युपजायन्ते मंदाग्नीना विशेषत:। च चि अ. १३ श्लोक ७ ते १३) या रोग्यांतील त्या लक्षणाचे अस्तित्व पुढील प्रकाराने व्यक्त होत होते तें असे की, पित्तबाहुल्यानें आपण काही तरी खावें असें वाटावयाचे पण थोडेसे खाल्ले तरी बिलकूल पचत नसे. एवढेंच नव्हे, तर अल्पमात्रेनेंहि सौहित्य होऊन तें एवढें त्रासदायक होई की, बिलकूल खाल्ले नसते तर बरे असें वाटूं लागे

व्याधि त्या वेळी पूर्वरूपावस्थेंतच होता. रूपावस्थेस पोचला नव्हता चिकित्सेस आवस्थिक (पूर्वरूपावस्था) व कालिक (पित्तप्रशमस्वभावी हेमंतर्तु) आनुकूल्य असल्यानें उपचारसौलभ्य आले

शमनशोधन चिकित्सेपैकी शोधन व अग्निदीपनात्मक लघन उदराच्या साद्यन्त अवस्थेंत उपयुक्त होते उदर हा व्याधि अतर्मार्गोद्भूत असल्याने यात प्रथमपासून शोधन देता येतें यातील दुष्टीहि मध्यम अधर कोष्ठाची असल्यानें विरेकात्मक शोधन यात श्रेष्ठ मलनिहरण हे उदरचिकित्सेतील प्रधान तत्त्व त्या अनुरोधे प्रथितयश विरेकद्रव्य त्रिवृत्चूर्ण साखरपाण्यातून दिले. प्रथमचे दोन दिवस फक्त हीच योजना देऊन जठर व धात्वग्नबल देण्याकरिता व रोगनाशनाकरिता चंदनासव व पुनर्नवासव समानकाली आठपट पाणी घालून दिले (अग्निबल व रोधनाश या दोन्ही परिणामाकरिता समानकाल श्रेष्ठ.) मुखपाकावर स्थानिक कार्यकारी ताबडें औषध मधातून लावण्यास दिले

त्रिवृतानें झालेल्या कोष्ठशुद्धीने प्रथम सौहित्यासहत्व दूर झाले व अन्नपचनास सुरुवात होऊन धातूंना बलहि मिळूं लागलें चंदनासव व पुनर्नवासवाने धात्वग्निबलवृद्धि होऊन धातुबल मिळूं लागलें व क्रमश सर्व लक्षणे कमी होत चालली नंतर अग्निबलवर्धन व मलपाकाकरिता कामदुघा + कपर्दिकभस्म काही दिवस दिले मधूनमधून विरेक-द्रव्यहि देण्यात आले

या योजनेनें वरील सर्व लक्षणे नाहीशी होऊन बलहि सम्यक् प्राप्त झाले यावरून निष्कर्ष हा की, रूपावस्थेपेक्षा पूर्वरूपातील व्याधि लवकर बरा होऊं शकतो

---

# (१८०) अर्धांगवात

रोगी पुरुष, वय वर्षे ५२, ब्राह्मण सर्व आयुष्य सरकारी नोकरीत सुखात गेलेले प्रकृति अगाने फार स्थूल

रोगाची हकीगत--एक वर्षापूर्वी रोग्यास वाताचा झटका आला, डावी बाजू जड झाली व हातापायाची हालचाल करणेसुद्धा मुष्कील झाले बरेच आगल औषधोपचार केले पण उपयोग झाला नाही

लक्षणे—रोगी चिकित्सेकरिता आला त्या वेळीं त्याचा डावा हात व पाय हे ताठ करता येत नसत त्या भागास स्पर्शज्ञान चांगले होते, बोलणे व स्मृति यात कांहीं बिघाड नव्हता मात्र "मी पडेन कीं काय" अशी भीति त्यास वारंवार वाटे. नाडी चांगली (स्वाभाविक) होती लघ्वी कमी, गढूळ व दाट (गाढ) शौचास ग्रथित होई आहारात रसीजास्त-पणा नव्हता

चिकित्सा--रोग्याची कफमेद प्रकृति व विकाराचा वातदोष हेच प्रधान चिकित्स्य समजून औषधयोजना केली

सकाळी ६ वाजता रास्नादिकाढा + एरंडतेल + २ चमचे गोमूत्र सकाळीं ८ वाजता योगराजगुग्गुळ ३ बारीक गोळ्या मध-तुपात दुपारी जेवणानंतर लगेच दशमूलारिष्ट १। तोळा दुपारीं २ वाजता मृगशृंग भस्म २ गुंजा (एव्यास बल्य व कफदोषनाशक) + त्रिवंगभस्म १ गुंज (अतींद्रियास शक्तिदायक) + तूप-मध सायंकाळीं रास्नादिकाढा + एरंडतेल + सहचरतेल १ तोळा

आहारात--२ तोळे लसूण + ओले खोबरे याची चटणी

अभ्यंग व स्वेद--नारायणतेल + वाघाची चरबी याची मालीश व नंतर तापलेल्या वाळूच्या पुरचुंडीने शेक

ह्याप्रमाणे एक महिना उपचार केल्यानंतर रोग्याचा डावा पाय उत्तम सुधरला व रोगी चालू लागला डाव्या हाताने तो पुस्तक उचलू शकतो, परंतु तो हात जड वाटत असे म्हणून हीच योजना आणखी काही दिवस चालू ठेवली आहे

---

# (१८१) पुरीषज कृमि

रोगी पुरुष, वय वर्षे २८, वकील या गृहस्थाची अलीकडील १-२ महिन्याची रोजची तकार म्हणजे रोज दिवसातून ३-४ वेळ शौचास जावे लागणे, शौचास पातळ होणे व शौचाहून आल्यानंतर थकवा वाटणे ही होती.

विशेष चौकशी करतां रोग्यास पुढील लक्षणे होत असल्याचे आढळून आलें:—पोट फुगणे, हातपाय गळणें, गुदाच्या आंतील भागास कोरल्याप्रमाणे वाटणे, गुदमार्गात खाज सुटणे, शरीर कृश, त्वचा खरखरीत, डोळयाच्या पापणीभोवतालच्या भागावर अतिशय काळेपणा.

ही सर्व आंतडयांत कृमि झाले असल्याची लक्षणे आहेत हें जाणून (चरक, विमान, ७।१३) प्रथम ते कृमि काढून टाकण्याकरितां पुढील काढा सहा दिवसपर्यंत रोज दिला.

सुंठ, मिरे, पिंपळी, कडुनिंबाची, कुडचाची व खैराची साल, हिरडा, बेहेडा, आवळकांठी, निशोत्तर यांचा गोमूत्रात काढा तयार करून तो रोज सकाळी घेण्यांत येत असे. (या संयोगास निघंटरत्नाकरात "नियमनादि काढा" असे नाव आहे.)

कृमिरोगावर मुख्यतः उपचार दोन प्रकारचे—

(१) कृमि काढून टाकणे (अपकर्षण) व (२) पुन न निर्माण होतील अशा द्रव्याचा उपयोग (प्रकृतिविघात)

या काढयाने ही दोन्ही कार्ये साधली. यातील तिखट, कडु, तुरट व खारट द्रव्यामुळे प्रकृतिविघात झाला व त्यावरोबर दिलेल्या विरेचन द्रव्यामुळे कृमीचे अपकर्षणहि झाले. काढा सुरू केल्यापासून रोज काही लोकरीसारख पाढरे बारीक व लाब व काही आळयासारखे लहान कृमि पडत असत. आठ नऊ दिवसानतर कृमि पडणे बंद होऊन मलास स्वाभाविक बाधीवपणा आला व शौचास दिवसातून एक-दोन वेळच पण साफ होऊं लागले. इतर लक्षणे हळूहळू नाहीशी झाली.

कृमींची पुन॰ निर्मिति टाळण्याकरिता याच काढयातील निशोत्तर, गोमूत्र ही विरेचक औषधें बंद करून व त्रिफळयाचे प्रमाण कमी करून बाकीच्या द्रव्याचा काढा काही दिवस चालू ठेवला असता तरी चालले असतें. हेच कार्य विडगारिष्ट -।- तो.+कुटजारिष्ट -।- तो.+कृमिविकारावरील अर्क -॥- तोळा या मिश्रणाचे दोन भाग, दोन्ही वेळ जेवणानंतर, तापवून निवालेल्या दुप्पट पाण्यावरोबर ८-९ दिवस देऊन करण्यांत आलें या चिकित्सेने रोग्यास स्वास्थ्य प्राप्त झाले

---

# (१८२) भयंकर डोकेंदुखी

रोगी, वय वर्षे १३, ब्राह्मण. हया मुलास प्रथम न॰ रुग्णालयात डोलीत घालून आणलें त्याची मुख्य तक्रार डोके व पोट दुखणे, कंबर दुखणे, हातापायास थोडी सूज, ज्वर आणि बिलकूल हालचाल करता न येणे हालचाल केली की, सर्वांगात व कंबरेत भयंकर

ठणका व चमका निघत. त्यायोगे रुग्ण बेशुद्ध पडत असे. मधून मधून असे बेशुद्धीचे वारंवार झटके येत असत हैद्राबाद येथील मोठ्या हॉस्पिटलमध्ये सहा महिन्यापर्यंत निर-निराळ्या प्रकारच्या चिकित्सा करण्यांत आल्या होत्या. पोटावर विजेचे डाग दिले होते. इतरहि उपचार फार केले होते

रुग्णाच्या परीक्षणाचा वृत्तांत

डोके —वारंवार भयंकर दुखणे, ते इतकें की, डोकें दुखून दुखून रुग्ण बेशुद्ध होई रोज बहुतकरून सायंकाळी डोकें दुखत असे डोळे ठीक होते. कान ठीक होते नाका-तहि काही बिघाड नव्हता. डोकें खोल व टाळूच्या आतल्या बाजूस दुखत असे

घसा व गळा —ठीक होता गिलायु वगैरेहि ठीक होत्या

फुप्फुसें—ठीक होती ह्यात दोषदुष्टि नव्हती

यकृत् व प्लीहा—ठीक होती. यातहि दोष नव्हते

पक्वाशय व ग्रहणी.—ह्यातच विशेषत दोषदुष्टि होती. विशेषत वातदुष्टि असे वाताच्या काळी पोटात दुखे शौचास कधी साफ होई, कधी होत नसे कधी बस्ती दिला तर खडे पडत परंतु बस्तीनेसुद्धा आराम न होता पोटाचे दुखणे अधिकच होई पोट आर्ती झाल्यासारखे दुखे वारवार पोट दुखण्याचे वेग येत आन्त्रपुच्छ किंवा मूत्राशय यांच्या ठिकाणी दुखणे नसे. तो भागहि ठीक होता स्पर्शासहत्व किंवा इतर काही नसे मुख्य दुखण्याचे ठिकाण पक्वाशय व ग्रहणी, ह्यातहि शोथ नव्हता स्पर्श चागला खूप दाबले तरी सहन होत असे स्पर्शाने दुखणे वाढत नसे दुखावयास लागले म्हण-जेहि स्पर्श सहन होत असे मात्र पोट दुखू लागले म्हणजे ओरडूं लागे. गडबडा लोळे तोंडास फेंस येई इतका आरडे आणि अगाच एखाद्या वेळी सरासरी ८-१५ दिवसाच्या अंतराने झटके येत झटक्याच्या वेळी बेशुद्धि येई पुन्हा तास-दीड तासाने बेशुद्धि नष्ट होई, पोट दुखणे थाबे आणि रोगी पुन्हा पूर्ववत् वावरू लागे हा असा क्रम सुमारे दोन वर्षापासून चालू होता

मूत्रमार्ग व मूत्रपिंड —यात विकृति नव्हती मूत्रहि ठीक होते, यातहि दोष नव्हते, मल नव्हते

अस्थि.—विशेषत. त्रिकास्थीजवळ फार दुखत असे त्रिकास्थीच्यावर काही वृद्धि किंवा इतर काही दोष असे नव्हते, परंतु नितंब मणक्यापासून तो त्रिकास्थीच्या टोका-पर्यंत भयंकर वेदना होत मुळीच हालचाल होत नसे स्पर्श सहन होई, परंतु यत्किंचित् हाललें तरी अगदी प्राण कासावीस होई ह्या भागाचे "क्ष" किरण छायाचित्र घेतले होते त्यावरून अस्थीत कोठेंच काही बिघाड नव्हता परंतु वेदना मात्र भयंकर होत्या.

दोष व दूष्ये —ह्या रोग्यात वातदुष्टि फार होती विशेषत अपानदुष्टि अधिक. पक्वाशय ग्रहणी आणि नितंबत्रिक भाग यात वाताची दुष्टि जबरदस्त होती याहि

भागात स्थूल अवयवापेक्षा तत्रस्थ वातवाहिन्यातून वातदुष्टि अधिक होती. मासदुष्टि वातानेच झालेली होती

हृदय —धडधड फार असे छातीत, विशेषत हृदयाच्या बाजूस, वारंवार वेदना अधिक, तोडास व पायास सूज हृदयाचा कमकुवतपणा हें कारण असावें.

लक्षणे व संप्राप्ति —ह्या रोग्यास ज्वर, वेदना, सूज, झटके येणे, डोके दुखणे छाती, कंबर, पोट यांत भयंकर आर्ती ही विशेष लक्षणे होतीं ज्वर १९३६ च्या जानेवारी महिन्यापासून येऊं लागला. ज्वरोष्मा ९९ ते १०० पर्यंत असे थंडी वाजून ज्वर भरत नसे सर्व वर्षभर ज्वर रोज येतच असे. वेदना प्रथमपासून असत सूज मात्र पाच-सहा महिन्यानंतर आली झटके व कंबर वगैरे भागात आर्ती व झटके वेदनाच्या अतिरेकानें येऊं लागले

याकरिता मूत्रपरीक्षा केली यात काही दोष सापडला नाही मलाची परीक्षा केली, त्यातहि विशिष्ट प्रकारचे कृमि व इतर काही दोष आढळले नाहीत बाकीच्या अवयवसमूहातहि अवयवाची वृद्धि अगर क्षय, किंवा अवयवाच्या क्रियेंत दोष आढळले नाहीत रक्त तपासले, रक्तात उपदंशादि विषाराचे वास्तव्य सापडले नाही तसेंच क्षयादिकाचे जंतुहि नसावेत, असें अनुमानिक प्रमाणानें ठरवावे लागले स्पष्ट निदान असे की, अपान वायूच्या दुष्टीमुळें पक्वाशय व ग्रहणी, त्रिकास्थि व नितंबास्थि आणि त्याच्या जवळून निघणाऱ्या वातवाहिन्या यात दुष्टि उत्पन्न झाली आणि वेदना, झटके वगैरे सर्व लक्षणे याचपासून उत्पन्न झाली

औषधयोजना—(१) आरोग्यवर्धिनी १ गोळी + सु माक्षिक ½ गु सकाळीं व रात्री २ पुड्या मोरावळाच्या पाकात (२) शुद्धशिलाजतु ½ गु + मजिष्ठाकल्प १ गु + जटामांसीकल्प १ गु पुडी १ दुपारी (३) सारस्वतारिष्ट ३ मासे + विडंगारिष्ट ६ मासे + शुद्धोदक २ तोळे, २ भाग जेवण्याच्या अगोदर घेणे.

ह्याप्रमाणे औषधयोजना पधरा दिवसपर्यंत दिल्यानंतर झटके पुष्कळच कमी झाले बाकीचीं लक्षणे कमी झाली नाहीत नंतर खालीलप्रमाणे औषधात बदल केला

मृगशृंग १ गु + श्लक्ष्ण १ गु. + उन्हाळ्याचे औषध १ गु. + गुळवेलसत्व १ गु + शुद्ध शिलाजतु १ गु पुड्या ४, दर तीन तासानी तुपांत

हें औषध केवळ क्षोभनाशक व शामक म्हणून दिले होते यानंतर अर्जुनकल्पहि दिला होता.

ता २२–४–३८ रोजी खालील मिश्रण दिले आणि तेंच मिश्रण अद्यापपर्यंत सुरू आहे त्यानेंच रुग्णाच्या लक्षणाचे शमन झालें आहे.

शुद्ध शिलाजतु १ गु. + गुळवेलीचे सत्व २ गु + मजिष्ठाकल्प ८ गु, पुड्या ४ दर तीन तासानीं मोरावळ्याच्या पाकांत.

हें औषध ता २४-८-३८ पर्यंत चालू आहे ह्या योजनेत शुद्ध शिलाजतु हें मुख्य कार्मुक आहे. याचाच पहिल्या दिवसापासून आतापर्यंत उपयोग करण्यात आलेला आहे प्रथमत आरोग्यवर्धिनीत, नंतर मृगशृंगादिकाबरोबर व नंतर मंजिष्ठादि क्वाथा बरोबर असा शिलाजतु संयोग करून वापरला

या योजनेनंतरची रोग्याची स्थिति —वेदना अजिबात थांबल्या आहेत पोट दुखणे, कंबर दुखणे, डोकें दुखणे थांबले आहे. ज्वर गेल्या चार महिन्यात नाही रोगी आता स्वतः पायांनी चालू शकतो, हिंडतो, फिरतो झटके अजिबात नाहीत एकंदर आणखी एखाद्या महिन्याच्या उपचारानें रुग्ण अगदीं साफ बरा होऊन आपल्या गावी जाऊ शकेल असा भरवसा वाटूं लागला आहे

---

## (१८३) प्रवाहिका ( आमांश )

रोगी पुरुष, वय वर्षे २५ पूर्ववृत्तान्त—सदर रोगी १५ दिवसापासून आजारी होता ता. ७-८-३८ रोजी त्यास प्रथम २-३ वान्त्या व जुलाब झाले नंतर वान्त्या व जुलाब बंद होऊन शौचास दर ५-५ मिनिटानी थोडें थोडें, कुंथून कुंथून, चिकट व रक्तमिश्र होऊं लागलें असें १३-१४ दिवस चालू होतें आता रक्त पडणें थांबलें होतें. आतापावेतों कोणतेंच औषध घेतलेलें नव्हतें

रोग्यास जाऊन पाहता पुढील लक्षणे आढळलीं रोगी अस्थिपंजरवत् झाला होता त्याचे हातपाय हालविणें व तळमळ एकसारखी चालू होती हातास व पायास पेटके येत होते त्याची वाचा बंद होती ओळखीच्या मनुष्याकडे पाहून तो अश्रू ढाळी मधून मधून खोकल्यामुळें आलेला बेडका गालावर ओघळून येई तो आप्त पुसून घेत कारण थुंकण्याची ताकद नव्हती शरीराचें उष्णतामान ९९° होतें दर २-३ मिनिटानी उगाच थोडासा चिकट मल गुदावाटें बाहेर येई तोहि त्याचे आप्त फडक्यानें पुसून घेत व लंगोटी बदलीत रोगी जेव्हा बोलू शकत होता तेव्हा त्यानें आपणास गिळता येत नसल्याचें सांगितलें होतें असें नातलगाकडून कळलें वाचा बंद असल्यामुळें रोग्यास प्रश्न विचारून माहिती मिळविणें शक्य नव्हतें

निदान —कफकास व पिच्छिल मलाची सविबंध प्रवृत्ति ही लक्षणे कफवातात्मक होती कंठग्रह व वाग्ग्रह हे प्रबल उपद्रव जत्रूर्ध्व भागातील कफरक्तात्मक दुष्टीपासून झालेले कंठगत विकार वाढत गेल्यास श्वासोच्छ्वास बंद पडण्याची भीति असल्यामुळें प्रथम त्यावर उपाय करण्याचें ठरविलें

**चिकित्सा** —हरीतकी ही आमनाशक, दीपन, पाचन, वय स्थापन, रसायन, ग्रहणी-दोषनाशक व स्रोतोविबंधनाशक असून तिचा काढा मध घालून दिला असता कंठरोग नाहीसे होतात (वाग्भट उत्तरस्थान २२–२५) असें शास्त्रवचन असल्यामुळें व तिचा गुण टिकाऊ स्वरूपाचा असल्यामुळें ( वा. उ. ३९।१४८ ) हरीतकी भरडीच्या १-१ मासा वजनाच्या २ पुडया सकाळ-सायंकाळ काढा करून मध घालून कंठस्थानावर कार्य होण्याकरिता प्राणकाली (जेवताना मधून मधून) घेण्यास सांगितल्या रोगी अन्न खाऊं शकत नसल्यामुळें त्यास साबूदाण्याची पातळ खीर व चहा एवढाच आहार घेण्यास सांगितला होता.

काढयाचा परिणाम दुसऱ्या दिवशी स्पष्ट दिसला रोग्यास बोलता व गिळता येऊं लागले. दोन दिवसात गलग्रह पूर्णपणे नष्ट झाला शौचाच्या स्वरूपात कांही फरक पडला नाही हातापायातील पेटके कमी होण्याकरिता खाटेखाली विस्तव ठेवून शेकण्यास सांगितलें होतें. दोन दिवसांनंतर आमाशाची व खोकल्याची चिकित्सा सुरू केली आमाशाकरिता लघुगंगाधरचूर्ण (नागरमोथे, इंद्रजव, कोवळ्या बेलफळाचा गीर, लोध्र, मोचरस, धायटी यांचें समभाग चूर्ण) दिलें. हे चूर्ण अतिसार व आमाश (रक्तसहितसुद्धा) या विकारावर फारच चांगलें उपयोगी पडते या चूर्णाबरोबर वातघ्न, दीपक व जंतुनाशक अशी पुढील औषधें देण्यात आली होती.

**योजना**—**लघुगंगाधरचूर्ण ३ मासे + पुदिन्याचा (पेपरमिंट) अर्क ६ थेंब + बडीशेप अर्क ६ थेंब + दालचिनी तेल २ थेंब.** या मिश्रणाच्या सहा पुडया करून ३-३ तासानी १-१ पुडी कोमट पाण्याबरोबर घेण्याकरिता दिल्या दोन दिवसात ६ आणे गुण दिसून आला तेंच औषध आणखी २ दिवस चालू ठेवलें त्याच वेळी खोकला त्रासदायक वाटूं लागला. म्हणून कासावरील **आनंदभैरवाच्या** ६ गोळ्या दिवसभर मधून मधून तोंडात धरण्यास दिल्या.

चार दिवसात शौचाचा विकार पराच कमी होऊन रोग्यास बरे वाटूं लागलें फुफ्फुसे निर्दोष होऊन खोकला जावा एतदर्थ—

**टंकणलाही २ गुंजा + त्रिकटु २ मासे + पेपरमिंट १ गुंज, पुडया ८,** यांचें चाटण दर तीन तासानी मधात घेण्यासाठी दिलें

---

## (१८४) सर्वांगकंप (बालरोग)

**रुग्ण**—खेडेगावात राहणारा, १॥ वर्ष वयाचा लहान मुलगा

**रोगाचे स्वरूप**—या मुलाचे सर्व शरीर एकसारखें थरथर कापत असे हा कंप रोग्याच्या लहानमोठ्या एकूणएक अवयवात दीड महिन्यापासून रात्रंदिवस एकसारखा अखंड चालू होता रात्री झोप बहुधा नाहीच, कदाचित गुंगी आल्यासारखें झालें, तर

तेवढा वेळ कंप कमी होऊन स्पष्ट मुक्त राहात असे. एरवी अग हलणे केव्हाच बद नव्हते

रोगाचा पूर्वेतिहास —रोग्यास प्रथम २१ दिवसांचा आन्त्रिकसन्निपात (typhoid) ज्वर झाला त्यावर एका वैद्यराजानी दिलेल्या औषधाने ताप गेला व नंतर "कंप" हे लक्षण सुरू झाले सन्निपात ज्वरानंतर झालेला हा वातविकार असल्यामुळेच बहुधा त्या वैद्यानी "हा कंप बरा होणार नाही" असे सांगितले असावे अलोपथिक डॉक्टर व होमियोपथ यानी रोग्याच्या मेंदूंत विकृति झाली आहे असे निदान करून मेंदूस बलदायक (brain tonics) व विश्रांति (झोप) साठी गुणीची औषधे दिली अशा-प्रकारे दीड महिना उपचार करूनहि रोग्याच्या विकृतीत तिळमात्रहि फरक पडला नाही

रोगाचे निदान—प्रथम हा दतोद्भव वा स्नायदोषजन्य विकार नाही याविषयी खात्री करून घेतली नतर सर्वाङ्गकम्प. शिरसो वायुर्वेपथुसंज्ञक'। या वचनानुसार सर्व शरीरगामी व्यानवायूच्या दुष्टीमुळे झालेला हा कपविकार आहे असे निदान करून चिकित्सेस प्रारभ केला रोगाचा काल हा ऋतुसंधि म्हणजे ग्रीष्माचा शेवट व वर्षाचा आरभ अतएव वातदोषाची प्रकोपावस्था होय

चिकित्सा —वातस्य उपक्रम (१) स्नेह (२) स्वेद (३) सशोधन मृदु। या वचनानुसार सर्वांगगत वातशमनाकरिता रोज तिलतैलाचा अभ्यग (जराश्रमवातहा) व नतर उष्णोदक स्नान हे बाह्योपचार सुरू केले व पोटात ५ दिवसांच्या अंतराने १ तोळा एरडतेलाचे मृदुविरेचन दिले (कंप हा एक वाताचा—थंडीचा—प्रकार असल्यामुळे स्नानाने तो वाढेल या समजुतीने १॥ महिन्यात त्याच्या अंगास पाणीच लागू दिले नव्हते) नतर अखेरपर्यंत अभ्यगाकरिता निर्गुंडीसिद्धतैल दिले होते

विकाराचे तीव्र स्वरूप लक्षात घेऊन पोटातूनहि तीव्र वातशामक अशी औषधे देण्यात आली महावातविध्वस हे सर्व वातप्रधान सन्निपातावर ("सन्निपाते च सर्वे।"—योग-रत्नाकर) गुण देणारे सिद्धौषध सन्निपातानंतर उत्पन्न झालेल्या कंप या वातविकारावर खात्रीने गुण देईल या कल्पनेने -।- गुंज दुपारी व -।- गुंज रात्री आईच्या दुधातून दिले शिवाय सकाळी व सायंकाळी घेण्यासाठी अर्धा अर्धा तोळा दशमूलारिष्टाची योजना केली

चिकित्साफल—प्रथम दोन दिवस रोग्याच्या प्रकृतीत मुळीच फरक झालेला आढळून आला नाही पुढील चार दिवसात रात्री कंपरहित व स्पदरहित झोप लागू लागली व दिवसा कपाचा जोर कमीच राही आठ दिवसानी फक्त सायंकाळीच (म्हणजे अह कृत वातप्रकोपकाळी–प्रदोषे वार्षिकम्—सुश्रुतसूत्र अ १) कंप होत असे पुढील आठ दिवसाच्या औषधानतर १२ आणे गुण असल्याचे परिचारकाने सांगितले एकूण एक महिन्याच्या उपचाराने रोग्याचा कंपविकार पूर्ण नष्ट झाला त्यानंतर आज दोन महिने त्याची प्रकृति निकोप आहे

---

# (१८५) भ्रम ( पाण्डुरोगजन्य )

रोगी स्त्री, वय वर्षे ५०. मूलत च प्रकृतीत थोडी पाडुरोगाची लक्षणे. त्यांत तृतीयक ज्वर सुरू झाला. त्याकरिता घेतलेल्या औषधानें तो ताप थांबला, पण पुढील लक्षणे उद्भूत झाली.

**रोगाची लक्षणें**—रुग्णाची प्रकृति सायंकाळी ५ वाजेपर्यंत साधारणपणे ठीक राहात असे. परंतु त्यानंतर त्यास भ्रमिष्ठपणा येण्यास सुरुवात होई, तो भ्रम पहाटेस १-२ वाजेपर्यंत टिके. या कालांत रोग्यास काही प्रश्न विचारल्यास ते त्यास समजत; पण त्यांची उत्तरे देणे त्याला कठीण जाई उत्तरातील एखादा शब्द तो बोले पाडुरपणा पूर्वीपेक्षा खूप वाढला होता. सर्व अंगातून मुग्या चालल्यासारखें वाटे गारव्यात गेल्यास अंगास गारठा वगैरे काही समजत नसे. हा बधीरपणा हातापायास विशेष जाणवत असे रोग्याची भूक जवळजवळ नाहीशी झाली होती. शौचास होत नसल्याची तक्रार होती हिवताप गेल्यानतर एक महिनाभर औषधे घेऊनहि वरील लक्षणे कायमच होतो.

**चिकित्सा**—मूळचा पाडुरोग, त्यात हिवताप व नंतर उत्पन्न झालेली लक्षणे याचा विचार करून यावर वातनाशक, रक्तवर्धक व बल्य अशी पुढील औषधयोजना केली—

**समीरपन्नग** $\frac{1}{10}$ गुज+**माक्षिकमिश्रण** १ गु +**मंडूरभस्म** $\frac{1}{2}$ गु.+**प्रवाळभस्म** १ गु. या मिश्रणाच्या चार पुडया करून ४-४ तासानी दूधखडीसाखरेतून घेण्याकरिता दिल्या. शिवाय दोन्ही जेवणांनंतर विजयाकुमारी १। तोळा ( **विजयाकुमारी**—फक्त हिरडे, कोरफडीचा गीर व गूळ यांचेच आसवपद्धतीने तयार केलेले कुमारीआसव सर्वसामान्य कुमारीआसवापेक्षां हे अधिक सारक होते याने रक्तधातूंत सुधारणा घडून येत असल्यामुळे यकृत्वृद्धि, प्लीहावृद्धि हे विकार लवकर आटोक्यात येतात.) +**द्राक्षारिष्ट** १। तो. या मिश्रणाचे दोन भाग करून तितक्याच ऊन पाण्यांतून घेण्यास सागितले

या चिकित्सेचा परिणाम ३-४ दिवसांतच दिसूं लागला. ३ दिवसानंतर रोग्याची तंद्री बरीच कमी झाली. स्पर्शाचा बधिरपणा गेला व अंगातून चालणाऱ्या मुग्याहि हळूहळू कमी होऊं लागल्या औषधयोजनेंतील मंडूर, माक्षिकादि लोहकल्पामुळे शौचास साफ न होण्याची तक्रार मात्र चालूच राहिली, म्हणून विजयाकुमारीचे प्रमाण दुप्पट केले.

या चिकित्सेनें तीन आठवड्यात प्राकृतिक पाडुरपणाखेरीजची सर्व रोगलक्षणे नष्ट झाली आहेत.

---

## (१८६) आंत्रिक सान्निपात ( Typhoid Fever )

रोगी स्त्री, वय वर्षे १७, गुजराथी

**रोगाची हकीकत**—ताप येऊन २०-२२ दिवस झाले तरी ज्वराचे मान १०५° होते छातीची एक बाजू बिघडली होती ( न्युमोनिया ). रोग्यास प्रथमपासून डॉक्टरी उपचार चालू होते ४०-४५ दिवस होऊन गेले तरी तापमान कायमच राहिले. छातीतील दोन्ही बाजूची फुफ्फुसें दूषित झाली दिवसातून ७-८ जुलाब होऊं लागले रोग्याच्या अगात केवळ अस्थिचर्म शिल्लक राहिले होते डॉक्टरास आता तीव्रक्षयाची ( galloping thysis ) शंका येऊ लागली. अशा वेळी आयुर्वेदीय औषधोपचार करण्यात आला

**औषधोपचार**—आत्रगतविषार कमी होण्याकरिता रसपर्पटी १ गुंज + उरस्थ कफविकाराकरिता मृगशृंग ३ गुंजा + सितोपलादिचूर्ण ६ गुंजा + प्रवाळभस्म ३ गुंजा या मिश्रणाच्या ३ पुड्या करून ३ वेळ मधातून दिल्या हे मिश्रण ६ दिवस चालू होते एवढ्या अवधीत रोग्याचे परसाकडचे प्रमाण १-२ वेळावर आले, कफ सुटूं लागला, ज्वराचे प्रमाण १००° वर आले

**आहार**—रोगी पाण्याशिवाय काहीच घेत नसल्यामुळे यकवा जास्त येत चालला म्हणून साळीच्या लाह्याचे पाणी चालू केलें

सहा दिवसानतर रोग्याची नाडी अनियमित चालूं लागली, हातापायास गारवा येऊं लागला, ज्वरोष्मा ९७॥° पर्यंत आला. घशात थोडी घरघर चालूं लागली या वेळी मल्लसिंदूररसाची योजना आल्याचा रस व मध यावरोबर केली. १-२ तासात हातापायाचा गारवा कमी झाला कफाचें शोषण होऊन घरघर कमी झाली व नाडीचा वेग सुधरूं लागला हळूहळू रोग्यास आराम वाटला

तीन-चार दिवसानी रोगी सुधरला या समजुतीने शक्ती येण्याकरिता घरच्या मडळींनी थोडा शिरा खावयास घातला त्यामुळे पुन्हा ज्वर १०३° पर्यंत चढला. या वेळीहि लक्ष्मीनारायणरस व प्रथम दिलेली औषधें याच्या उपयोगाने रोगी पूर्ण बरा झाला

---

## (१८७) मांसग्रंथि

रोगी मुलगा, वय १२ वर्षं वयाच्या ९ व्या वर्षापासून या मुलास शरीराच्या निरनिराळ्या बाह्य भागावर लहान लहान मासग्रंथी होऊं लागल्या. प्रथम या ग्रंथींची उत्पत्ति व वाढ रोग्याच्या विशेष लक्षात आली नाही कारण या मासग्रंथी दुखत नसत.

यांपैकी एका ग्रंथीच्या मूळाशी एका तज्ज्ञ डॉक्टरांनी कॅर्बॉलिक अॅसिडच्या १५% सोल्युशनचे इंजेक्शन दिलें. पण त्या ठिकाणी necrosis ( जखम ) झाल्यामुळे तो उपद्रव नीट करतां करता मूळ रोगाची चिकित्सा बाजूस राहिली

सर्व शरीरावर मिळून १२ ठिकाणी लहान मोठया ग्रंथि होत्या उजव्या दंडावरील एक गाठ तर रानबोराएवढी मोठी होती ही ग्रंथि टणक असून त्यावर बारीक बारीक वेगवेगळालें उंचवटे ( lobules ) होते टोचून पाहिल्यास सुई बरीच आत गेल्यावर रक्त येत असे

**चिकित्साः**--मांसवृद्धिभवान् रोगान् शस्त्रक्षाराग्निकर्मभिः। या वचनाप्रमाणे प्रथम एक ग्रंथि शस्त्रकर्माने समूळ कापून काढली परंतु एक महिन्याच्या आत तेथें पुन्हा पूर्ववत् ग्रंथि निर्माण झाल्याचें आढळून आले म्हणून तो प्रयत्न सोडून पोटातून औषधि व वरून लेप लावण्यास प्रारंभ केला **अर्कक्षीरचूर्ण***[1] ४ गुंजा + ताम्रभस्म १ गुंज याप्रमाणे १-१ पुडी करून ६ मासे मधात दिवसातून तीन वेळ घेण्यास दिली रोज अशा ३ पुडया घेण्यात येत

**बाह्योपचारः**--ग्रंथीवर वरून लावण्याकरिता बचनागचूर्ण ३ मासे + वेखंडचूर्ण १ मासा + मोहरीचे चूर्ण १ मासा + कापूर ५ गुंजा या औषधाच्या मिश्रणाचा एकत्र खल करून त्यांत पुरेसा बाभळीचा डिंक ( गोंद ) मिसळून त्या प्रत्येक ग्रंथीवर लेप केला.

हे पोटात घेण्याचे व वरून लावण्याचे औषध रोग्यास १ महिनाभर चालू होते पुढे काही दिवस मधुकारिष्ट घेण्यास दिले. पहिल्या २० दिवसातच सर्व ग्रंथि पूर्ण नाहीशा झाल्या या चिकित्सेस एक वर्ष झाले, अद्याप त्या मुलाच्या अंगावर एकहि गाठ उठली नाही

**त्वक् सवर्णकर लेप**--ग्रंथीवर पूर्वी सांगितलेला लेप लावल्यामुळे ग्रंथि नाहीशा झाल्यानंतर त्वचेवर डाग राहिले होते ते जाण्याकरिता कापूरकचरी १ मासा+हळद २ मासे+हिरवी मेंदी १० तोळे + तीळ ५ तोळे हीं सर्व एकत्र वाटून त्या कल्पाचा लेप डागावर दिला व वर पट्टी बांधली ८ दिवस हा लेप लावण्याने डाग पार नाहीसे झाले व त्वचा स्वाभाविक झाली ह्या लेपाने शिबें (सिध्मकुष्ठ) हि जाते असा अनुभव आहे

---

[1] 'अर्कक्षीरचूर्ण --रुईची ताजी ओली दळदार पाने आणून ती हळूहळू चेचावीत म्हणजे त्यातून दूध ( पांढरा चीक ) निघते ते मलमलीच्या बोळयाने अगर संशोधक कापसाने टिपून घेऊन थोडया शुद्धोदकात ( distilled water ) पिळून जमवावे भांडे चिनीमातीचे अगर एनॅमलचे असावे. २॥ शेर ओल्या पानातून सुमारें १५ तोळे दूध निघते पाण्यात मिसळलेले ते दूध मंदाग्नीवर आटवावे म्हणजे चूर्ण तयार होते.

# (१८८) अपस्मार ( क्रिमिज )

रोगी स्त्री, वय ४५ वर्षे ८-१५ दिवसानी अपस्माराचा झटका येणे ही मुख्य तक्रार. कधी कधी लागोपाठ ७-८ दिवस रोज झटका येई रोगास प्रारंभ १ वर्षापूर्वी झाला प्रथम बद्धकोष्ठ सुरु झाले ५-५ दिवस शौचास होत नसे एक दोन दिवस आड कष्टाने थोडे शौचास होई त्यानतर गेल्या ४ महिन्यापासून गुदद्वारापासून खालचे सर्व पाय अत्यत खाजत खाजविता खाजविता हात थकून जात, मग दगड, खापरीचा तुकडा यानी खाजवावे लागे मात्र सालणारा भाग शेकून काढल्यास खाज बद पडे रात्री झोप येत नव्हती

रोगाचे स्वरूप—विशेषत ४-५ दिवस शौचास झाले नाही, व एखाद्या दिवशी श्रम अधिक झाले की खूप जीव घाबरून नतर बेशुद्धि येत असे. ज्या दिवशी उपवास (लघन) असेल त्या दिवशी सध्याकाळी बहुधा फिट येत असे बेशुद्धि येण्याच्या दिवशी सकाळपासून खूप जीव घाबरे व साधारणत तिसऱ्या प्रहरी उचकी लागत असे, मग एकामागून एक ढेकर येऊ लागत पोटात कालविल्यासारखे होऊन प्रत्येक ढेकराबरोबर ओजळभर बेचव फेसकट पाणी पडे असे फेसकट पाणी पडावयास लागले की, बेशुद्धि येणार असे नक्की अनुमान करता येत असे बाजेवर पडल्या पडल्याहि ढेकर सुरु असत, व छातीत भरकर दम कोडल्याप्रमाणे होत असे बेशुद्धीत डोळे अर्धे उघडलेले राहात १५-२० मिनिटानी मुठी वळत, हातपाय ताठ होत, श्वास बिलकूल बद झाल्यासारखा होई मग एकदम लहर आल्याप्रमाणे हात, पाय, मान जोरात ताठ होऊन उडावयास लागत मग रोगी २-३ मनुष्यासहि आवरत नसे १५-२० मिनिटानीं हे वाताचे झटके कमी होत, पण बेशुद्धि पुढे अर्धा तास तशीच चालू राही जीभ टाळयास चिकटलेली, तोड अत्यत कोरडे, श्वास अत्यत मद (नाहीसारखा) या स्थितीत तोडात काही (पाणीसुद्धा) घातले तरी ते बाहेर पडे गिळले जात नसे.

नतर थोडया वेळाने एकदम, दमेकरी जोराने श्वास घेतो त्याप्रमाणे, २-३ वेळ श्वास घेतला की जीभ सुटून पाणी घोटले जाई शुद्धीवर आल्यानतर अत्यत थकवा, ग्लानि, डोळयापुढे अधारी, चक्कर, खोल शब्द, कण्हणे व ८-५ तास तसेच पडून राहणे ही लक्षणे होत

रोग्याचे पोट तपासून पाहता स्पर्शास गाठळलेले भाग लागत व त्या जागी थोडे दाबले असताहि कळा निघत एकदर प्रकृतिमान लक्षात घेऊन रोग्यास येथील आयुर्वेदीय चिकित्सामदिरात राहून पचकर्म करून घेण्याविषयी सुचविले

स्नेहस्वेद —पहिल्या दिवशी सकाळी व दुपारी असे २ वेळ १० तोळे तिळतैल + २ तोळे नारायणतैल + २ तोळे माषसेधवतैल या मिश्रणाने अभ्यंग केला व रात्री निर्गुंडीच्या पाल्याच्या वाफेने घाम काढला

**वमन.**—दुसऱ्या दिवशी याचप्रमाणे स्नेहन व स्वेदन केल्यानंतर, तिसऱ्या दिवशी सकाळी वमन देण्यात आले प्रथम सैंधव मिश्रित ऊन पाणी २-३ लोटे पाजून नतर गेळफळ एक फळांतील बिया + जेष्ठमध १ मासा + सैंधव १ मासा वाटीभर पाण्यात कालवून पाजले. अर्ध्या तासानं जोरजोराने वात्या होऊन त्यात पुष्कळ क्रिमि पडले. त्यापैकी २ क्रिमि ३-३ इंच लांबीचे, काळसर व गांडुळासारखे दिसणारे असे होते

**विरेचन**—त्याच दिवशी आपोआप ( अर्थात् वमनाकरिता दिलेल्या सैंधवपाण्या-मुळेंच ) ५-६ जुलाब झाले त्यात असख्य लहान लहान क्रिमि होते. त्यानतर २-३ दिवसानी पूर्वीप्रमाणेच स्नेहस्वेद करून विरेचनार्थ ३ मासे निशोत्तर चूर्ण + पिंपळी २ गु + वावडिंग ४ गु याचा काढा पाजला, व शौचपात्रात ( bed pan ) शौचास बस-विले त्यात सर्व क्रिमीच क्रिमि होते काही वितीएवढे लांब तर काही पेन्सिली-एवढे जाड होते एकूण ७-८ वेळ शौचास झाले. प्रत्येक वेळी पुष्कळ क्रिमि पडत होते काही बारीक आळ्यासारखे, काही एक इंच दोऱ्यासारखे व काही तोंडातून पडले ते गांडुळासारखे होते

**निरूह बस्ति**—तीन दिवसानतर पुन स्नेहस्वेद करून पुढील द्रव्यांच्या काढयाचा बस्ति देण्यास सांगितले

वावडिंग ३ मासे + उंदिरकानी ३ मासे + कोवळ्या बेलफळाचा गीर २ मासे + बडिशेप १ मासा + ओवा १ मासा + नागरमोथा १ मासा + वेखंड १ मासा + कोष्ठ-कोलिंजन १ मासा + गेळफळ १ नग याचा २ शेर पाण्यात काढा करून त्यात ६ गुंजा पिंपळी व ६ गुंजा काळें मीठ घालून त्याचा बस्ति देण्यात आला

बस्तीमुळे मळाचे बरेच खडे पडले, त्याबरोबरहि पुष्कळ क्रिमि होते

**परिणाम**—आतांपर्यंतच्या शोधनामुळे रोग्याचें जीव घाबरणे कमी झालें शौचास रोज होऊं लागले पायाची खाज पुष्कळ कमी झाली व शरीराला मोकळेपणा वाटून हुषारी वाटूं लागली

**अनुवासन बस्ति**—निरूह बस्ति दिल्यानंतर ३ दिवसानी पुन स्नेहस्वेद करून वरील निरूहबस्तीच्या ओषधिद्रव्यांनी सिद्ध केलेल्या तिलतेलाचा स्नेहबस्ति देण्यात आला

**शिरोविरेचन**—वावडिंग व उंदिरकानी यानी सिद्ध केलेल्या तेलाचें नस्यहि दोन दिवस देण्यात आलें

**क्रिमि होण्याच्या कारणाविषयी** चौकशी करिता असे समजलें की, रोग्याची घरची स्थिति अत्यंत गरिबीची असल्यामुळे खाण्यास ज्वारी, गहूं, तांदूळ मिळत नसत शेतात उडदाचें पीक येत असल्यामुळें उडदाची भाकरी व उडदाचें वरण असा आहार रोगी बरेच दिवस घेत असे

पथ्यापथ्य —औषधोपचार चालू केल्यापासून दुपारी एकवेळ जेवण पोळी, भाकरी, तूप, दूध व साखर, पालेभाज्या, रात्री फक्त दूध, सकाळी १ कप दुधात १ चमचा तूप टाकून घेणे, सर्व डाळी वर्ज, असा आहार ठेवला होता

यानंतर पुढील औषधे व उपचार देण्यात आली

सुवर्णराजवगेश्वर ½ गुंज मोरावळयाच्या पाकात सकाळीं विडंगारिष्ट १ तोळा + सारस्वतारिष्ट १ तोळा समभाग पाण्यात दुपारी व रात्री ३-४ दिवसानी बस्ति

सध्याचे प्रकृतिमान —या बाई सध्या १ मैल फिरुन येतात, पण थकवा येत नाही वजन ६ पौंड वाढले आहे पायाची राज साफ नाहीशी झाली आहे जीव घाबरत नाही उचकी लागत नाही उत्साह वाढला आहे, मन प्रसन्न राहाते. रात्री उत्तम झोप येते औषध सुरु केल्यापासून एकदाहि अपस्माराचा झटका आला नाही.

---

# (१८९) जुनाट अतिसार

रोगी, ब्राह्मण, वय ३५, धंदा शिक्षकाचा, राहणार मोगलाईंत पुष्कळ दिवसापासून बद्धकोष्ठ व अपचन परतु पुढें पुढे बद्धकोष्ठ कमी कमी होत होत अतिसार सुरु झाला अपचनाचा प्रकार असे तोमुद्धा रसाजीर्णाचा होता नेहमी अन्नविद्वेप, मळमळ व पोटात जडपणा वाटणें ही लक्षणे असत पुढे पुढें तोंड येणे, जिभेच्या कडा लाल होणे आणि जीभ सोलल्यासारखी व तिच्यावरील लव गेलेली अशी लक्षणे सुरु झाली मोठमोठे, पातळ, कढत, पाण्यासारखे, पिवळट तर कधी कधी तांदुळाच्या धुवणासारखे जुलाब होत असत वजन घटले त्वचा फिकट, फिकुटल्यासारखी झाली केसाचा रग पिंगट झाला केस गळूं लागले ह्या प्रकारच्या एकदर स्थितीत रोग्यास खालील औषधयोजना सुरु केली

सुवर्णमाक्षिक १ गु + सूक्ष्मसुवर्णपर्पटी १ गु सकाळीं डाळिंबाचे रसात अतिसारघ्न (चिनीमाती Kaolin) ४ गु + कमळकाकडीचूर्ण १ गुं + प्रवाळ पचामृत १ गु + गुळवेलसत्व ४ गु पुड्या २ दुपारीं-रात्री डाळिंबाचे पाकात. पाचक गोळ्या २ दुपारी ४ वाजता मोसब्याच्या रसात मिश्रण करुन घेणे

सदरच्या औषधयोजनेने सुमारे महिना-सव्वा महिन्यात प्रकृतीस उत्तम आराम झाला खाण्यास दूध, ताक, फळांचा रस व क्वचित् प्रसगी साळीच्या लाह्या फक्त देत असूं आणि रुग्णास मोकळ्या हवेत ठेवून पूर्ण विश्रांति घेण्यास सांगितली होती मन स्वास्थ्य टिकावे आणि इतर व्यवसायाचा लकडा मागें नसावा म्हणून रजा घेऊन

अन्यत्र राहण्यास सांगितलें होतें. एवं च (१) पूर्ण मनःस्वास्थ्य, (२) शारीरिक विश्रांति, (३) पोटाला व पचनावयवांना पातळ अन्नामुळें विश्रांति, (४) पर्पटीतील सुवर्ण, प्रवालपंचामृत, कमळकाकडी वगैरे औषधें, (५) सूर्यप्रकाश, मोकळी हवा इतक्याचा संयुक्त परिणाम येथें दिसून आला

---

## (१९०) पक्षघात

रोगी, वय वर्षे अंदाज ५५ अगदी बिछानावद्ध स्थितींत होता रोग्याचा पूर्व इतिहास जुनाट संग्रहणीचा असून त्यामुळें अत्यंत क्षीणता आलेली होती रोगी पाहिला त्या वेळी शौचाची वगैरे विशेष तक्रार नव्हती पण उजवे सर्व अंगातील शक्ति मात्र अजिबात नष्ट झालेली होती रोग्यास उजव्या हातापायाची हालचाल बिलकूल करता येत नसे रोग्याचे तपमान मुळीच वाढलेले नव्हते रोग्याची तपासणी करता हृदय खूप मोठें झालेले दिसून आलें त्यामुळें रोग्यास खोकला होता व पातळ पाण्यासारखा बेडका पडे कित्येक वेळा उरःस्थानाच्या व एकंदर शारीरिक अशक्ततेमुळे बेडका खाकरून काढण्याची शक्ति नसल्याने रोग्यास अगदीं गुदमरल्यासारखे होई रोग्याच्या बोलण्यामध्यें मात्र मुळीच फरक झालेला नव्हता

सदर रोग्याच्या पक्षघातावर पारव्याच्या रक्तमांसाचा उपयोग करून पाहण्याचें ठरवून त्याप्रमाणे रोग्यास पारवे पैदा करण्यास सांगितले परंतु हा प्रयोग पूर्वी कधी स्वतः केला नसल्यानें थोडीशी साशंकता वाटत होती

यासाठीं एकंदर ८ पारवे उपयोगात आणण्यात आले पोटातून पक्षघाताचे दृष्टीनें कोणत्याहि प्रकारचें औषध या वेळी चालू नव्हतें रोज १ पारवा मारून त्याचें रक्त घात झालेल्या अंगास चोळलें जाई व मांसाचा वाफारा रोग्यास देण्यात येई रोगी मांसासक्त असल्याने त्यानें विचारल्यावरून मांस न खाता फक्त मांसरस, तूप, जिरें, मिरें, लसूण वगैरे द्रव्यांनी संस्कृत करून पिण्याची परवानगी दिली याशिवाय रोग्यास अन्न म्हणून फक्त भात, तूप व मुगाचें कढण खाण्यास देण्यांत आलें होतें

त्याच दिवशी सायंकाळी या चिकित्सेचा परिणाम दिसून येऊं लागल्याचें रोग्यानें दुसरे दिवशी सकाळी सांगितलें दुसऱ्या दिवशीं सकाळी रोग्यास पायाची हालचाल थोडी करता येऊं लागली होती. परंतु हाताच्या क्रियेबाबत थोडें हलके वाटण्यापेक्षा फारसा फरक दिसून आला नाही हीच चिकित्सा पुढे चालू ठेवण्यात आली तीन दिवसानी हाताचीहि हालचाल वरपर्यंत होऊं लागली, परंतु बोटें मात्र मुळीच हालत नसत.

नंतर रोग्यास या चिकित्सेबरोबर नारायण तैलाचा अभ्यंग त्या भागास करण्याची सूचना देण्यात आली याचा इष्ट तो परिणाम लवकरच दिसून येऊं लागला.

आठ पारव्याच्या उपयोगाने रोग्याचा पक्षहि सुधरला व पुढें नुसत्या नारायण तेलाच्या अभ्यंगाने ८-१० दिवसात हणास पाण्याचें भाडें वगैरे उचलता येऊ लागलें.

रोग्याच्या प्राकृतिक क्षीणतेशिवाय पक्षघाताचा कोणताहि दोष रोग्यात राहिला नाही

---

## (१९१) गति-वैकल्य ( क्रिमिज )

### ( सं. कलायखंज Ataxia )

रोगी, विद्यार्थी, वय २२ वर्षे, कृश प्रकृति

रोगाचे स्वरूप —(१) गुडघ्यापासून खाली दोनहि पाय बर्फाप्रमाणे गार राहात (२) उभे राहण्याची व चालण्याची पायातील ताकद नाहीशी झाली (३) पायाचे स्नायु लुळे पडल्यामुळें पाय मुद्दाम उचलून टाकल्याप्रमाणें कुलपत चालावे लागे

बाह्य निमित्तकारण —पायानाहि श्रम होतील असा लाठी फिरविण्याचा व्यायाम लागोपाठ तीन दिवस घेतला संचय नसता एकदम व्यायाम सुरु केला म्हणजे ज्याप्रमाणे अंग दुखते (आवंत) त्याप्रमाणे तगट्या दुखूं लागल्या, तरीसुद्धा तो व्यायाम चालूच ठेवला. त्यामुळे पायाचा त्रास वाढत जाऊन उभे राहिलें असता पडण्याची धास्ती वाटू लागली पुढें पावलाच्या चवड्यावर बिलकूल उभें राहता येईनासें झाले म्हणून औषधे पोटात घेण्यात आली व बाहेरूनहि लावली गेली.

केलेले एकदर उपचार —(१) अभ्यंग-रोशेल तेलाचा रोज, व वरून वडाची पानें ऊन करून बांधणे (२) पोटात महायोगराजगुग्गुळ तुपात (३) सहचर तेल+दूध याचें मिश्रण दुधात (४) Spigelia, Cina, Arnica ही होमिओपॅथिक औषधे (५) आहार—गव्हाचें अन्न व कागदी लिंबाचे सरबत

या उपचारापासून २ महिन्यात काहीच गुण दिसला नाही. म्हणून दुसऱ्या डॉक्टराचा सल्ला घेण्यात आला त्यापैकी एकाचें निदान subacute combined degeneration of the spinal cord असे होते F. R C S सिव्हिल सर्जन डॉक्टरास दाखविता त्यांनी रोग शस्त्रकर्मसाध्य नसल्यामुळे physician कडे जाण्यास सांगितलें

या कालांत भूक चांगली होती. वजन बरें होतें लघवीशौचासंबधीं काही तक्रार नव्हती. झोप चांगली येत नव्हती. फक्त पायाचे स्नायु शिथिल झाले असल्यामुळे चांगलें चालता येत नसे, knee-jerks नाहीशा झाल्या होत्या, पायाच्या स्पर्शज्ञानांत काही बिघाड नव्हता

केलेल्या सर्व उपचारापासून काडीइतका गुण नाही अशा निराश मन स्थितीत एक दिवस रुग्ण शौचास गेला असतां त्यास "जंत तर झाले नसतील ना ?" असा संशय आला व काही वर्षापूर्वी धाकट्या भावास क्रिमीपासून असाच विकार झाला असल्याचें स्मरलें. हें संभवनीय कारण लक्षात येताच जंताची पुडी ( santonine घेण्यात आली व जंत ( round worms ) पडले सूक्ष्मदर्शक यंत्राने मलपरीक्षा करता त्यातहि कृमि आढळून आले म्हणून ८ दिवसांनी पुन एक वेळ जताची पुडी घेतली. या कालातहि पायास तैलाभ्यंग चालू होताच आता मात्र पायाच्या स्थितीत थोडा थोडा स्पष्ट फरक दिसूं लागला. चवडयावर उभें राहता येऊं लागलें पंधरा दिवसानी पुन जताची पुडी घेतली व त्यानंतर चागलाच फरक पडला एक महिन्यात चागले चालताहि येऊं लागलें आतां धावता येते फक्त वजन मात्र कमी झाले आहे जंत पडून गेल्यानतर रोगी उत्तम रीतीने सुधरला

या स्नायुशैथिल्याला विप्रकृष्ट कारण जतच !

---

# (१९२) गर्भिणीचा मलेरिया

रोगी, स्त्री, वय वर्षें २३. बाई ६ महिन्याची गर्भवती खूप थंडी वाजून एक दिवसाआड ताप व थडी वाजत असता ओटीपोटांत फार वेदना ही मुख्य लक्षणे ओटीपोटातील वेदना वेणा आल्याप्रमाणे तीव्र असत व बाईस मूल आडवे आल्याप्रमाणे त्रास होई.

रोगाचा इतिहास—१५ दिवसापूर्वी रक्तातिसार झाला होता. त्याकरिता दुसरीकडून घेतलेल्या औषधाने तो थाबला व ५-६ दिवसानंतर हा थंडीताप सुरु झाला रक्तक्षीणता अतिशय होती व चक्कर येणे (विभ्रम) हे लक्षणहि होतें

रक्तातिसारावर घेतलेल्या औषधाने रक्तातील दोषाचें योग्य रीतीने पचन न झाल्यामुळें हा ताप आला असावा असे निदान करून पुढील वनस्पतीचा काढा दिला

कडु पडवळ+अनतमूळ+नागरमोथा+पहाडमूळ+काडेचिराईत+गुळवेल+आवळकंठी समभाग मिश्रण करून ३-३ मासे मिश्रणाच्या २ पुड्या काढा करून सकाळ-सायंकाळ घेण्यास दिल्या. हा काढा एक दिवस घेताच दुसऱ्या दिवशी, तो थंडी येण्याचा दिवस असूनहि, थंडी बिलकुल आली नाही फक्त अंग किंचित् गरम वाटलें त्याच काढ्याने थंडीताप पूर्णपणे गेला

---

# (१९३) रक्तधातुगत हिंवताप

रोगी पुरुष, वय २४ वर्षे अंगात स्वेटर व वरून चादर व ब्लँकेट पांघरलेला, तरी थंडीने कुडकुडत रोगी दवाखान्यात आला यास चार दिवसापासून रोज थंडीताप येत असे रोग्यास तापापेक्षा थंडीचा त्रास विशेष होत होता त्याबरोबर तहानहि फार लागत होती कितीहि पाणी प्याले तरी समाधान नसे रक्तगतदोषजन्य ज्वर असे निदान केले पण रक्तयोगाने थंडी कशी कमी होईल असा संशय वाटू लागला दोन दिवसापूर्वी एका वैद्यमित्राने मलेरियावर कोणत्याहि आयुर्वेदीय औषधाचा उपयोग होत नाही म्हणून आपण quinine चे injection देतो असा आपला अनुभव निवेदन केला असल्यामुळे वरील संशय जास्तच बळावला तथापि एक वेळ प्रयोग म्हणून रक्त-योगच देण्याचे ठरविले रोगी घरी काढा करण्यास तयार नव्हता व दवाखान्यात रक्त-योगकाढा नव्हती म्हणून रक्तयोगचूर्ण १ मासा + प्रवाळभस्म २ गु + गुळवेलसत्व ४ गुंजा या मिश्रणाच्या २ पुड्या करून त्या मोसंब्याच्या रसातून २ वेळ घेण्यास दिल्या रोग्यास अन्न जात नसल्यामुळे त्याने मोसंब्याचा रस हाच आहार ठेवला होता दुसऱ्या दिवशी साशंक मनाने रुग्णाची वाट पहात होतो इतक्यात फक्त एक शर्ट अंगात घालून तो आलेला दिसला रक्तयोगाने २-३ दिवसातच त्याचा थंडीताप गेला

---

# (१९४) मज्जागत जीर्णज्वर

रोगी, पुरुष, वय २२ वर्षे २॥-३ महिन्यापासून तापाने आजारी रोज सायंकाळी ४॥-५ वाजता थोडासा ताप येत असे डोळ्यासमोर अंधारी येणे (तम प्रवेश) हे लक्षण विशेष होते पुष्कळ औषधे घेऊन व पथ्य करून रोगी कंटाळला होता आल्या-बरोबर पथ्य काय करावे लागेल असा त्याने प्रश्न केला दूधभात, साखर खाण्यास हरकत नाही असे सांगताच, दूधभात खाणे तर दूरच, पण नुसते अन्नाचे ताट पुढे आले की ओकारी येते व एखादेवेळी काही खाल्ले की लगेच उलटी होऊन पडते असा अनुभव त्याने सांगितला हा मज्जागत ज्वर आहे असे निदान करून मज्जायोग (आवळकाठी, गुळवेल, नागरमोथा) चूर्ण १॥ मासा + प्रवाळ २ गुंजा + गुळवेलसत्व ४ गुंजा ह्या मिश्रणाच्या २ पुड्या करून मधात घेण्यास दिल्या या औषधाने दुसऱ्याच दिवशी तापमान कमी झाले व ओकारी येणे बंद झाले

---

# (१९५) वेड (उन्माद)

रोगी, पुरुष, ब्राह्मण, वय वर्षे २५. शरीरयष्टी वेताची, जुनाट बद्धकोष्ठी, परगावी शिक्षकाची नोकरी नुकतीच लागलेली अशा स्थितीत एके दिवशी सायंकाळी वेड लागले. यावर इतराकडून केले गेलेले नस्य, अंजन, भय, ताडन आदि प्रयोग उपकारक ठरले नाहीत. म्हणून शेवटी ठाण्याच्या मानसरुग्णालयात पाठविण्याच्या विचार चालू होता.

रोगोद्भव झाल्यापासून तिसरे महिनी रोगी मजकडे आणण्यांत आला. त्या वेळी चार जणानी धरून मग त्यास तपासले. त्या वेळी पुढील लक्षणे आढळली. बद्धकोष्ठ कमालींचे होते. अजनामुळे डोळे हिंगुळाप्रमाणे लाल दिसत होते एकंदर हालचाल व स्वभावावरून रोगी अच्छ पित्तप्रकृतीचा असावा असें वाटले अल्पसत्व असून हृदयाची गति नैसर्गिक गतीहून मंद होती. रडणे व प्रलाप फार होता. रोगी देहभानावर मुळीच नव्हता. निद्रानाश होताच फुप्फुसादि इतर शरीरावयव सुरळीतपणे आपापली कार्ये करीत होते.

**औषधयोजनाः**—या वेडास आतड्यातील दुष्टीच प्रामुख्याने कारण असल्यामुळे प्रथम विरेचन दिले. सौम्य जुलाबानें कार्य झाले नाही म्हणून **इच्छाभेदीरस** २ गोळ्या (१ गुज) दिल्या तरीहि उपयोग झाला नाही पुन दुसरे दिवशी ४ गोळ्या दिल्या, तेव्हा एक रेच सपाटून झाला झोपेकरिता रात्री **पारसिकयवानीचूर्ण** ४ गुजा + **माक्षिकमिश्रण** १½ गुज ही पुडी मोरावळयातून दिली

उन्मादविकारावर **माहेश्वरी** (छोटा चाद ऊर्फ सर्पगधा serpentina) ह्या वनस्पतीचे मूळ विशेष गुणकारी आहे व **ताप्यादिलोह** हे औषध वातवाहिन्याचा क्षोभ कमी करणारे आहे. म्हणून ही औषधे **प्रवाळभस्म** (चंद्रपुटी) मिश्र करून दिली. प्रत्येक पुडीत **माहेश्वरीचूर्ण** ४ गुजा + **ताप्यादिलोह** ½ गुज + **प्रवाळभस्म** (च पु) १ गुज, याप्रमाणें दिवसातून ४ पुड्या मोरावळयातून घेण्यास दिल्या याशिवाय दर दोन दिवसानी बाहव्याचा मगज पाण्यात कोळून त्यातून इच्छाभेदीच्या २ गोळ्या विरेचनार्थ देत असे. ही औषधें रोग्यास पाजण्यासाठी दोघातिघाचे साहाय्य लागे.

याप्रमाणे ८ दिवस वरील योजना चालू होती त्यामुळें रोगाचा जोर थोडा कमी झाला, पण झोप मात्र येत नव्हती; म्हणून वरील औषधाबरोबर **कामदुघा (मौक्तिकभस्मयुक्त)** १ गुज + **ताप्यादि लोह** ½ गुज, या मिश्रणाची १ पुडी स्वप्नकाली गुलकंदांतून देण्यास सुरुवात केली. त्याचा चागला परिणाम दिसून आला.

चिकित्सेस प्रारंभ केल्यापासून २१ दिवसांनी रोग्याचे वेड पूर्णपणें गेलें हे पाहून सर्वास मोठें नवल वाटलें.

हा रोग पुन: उद्भवूं नये व मानसिक स्वास्थ्य कायम राहावें म्हणून, बरे वाटल्या-नंतरसुद्धा रोज स्वप्नकाळी एक वेळ वरील कामदुघा, ताप्यादिलोह मिश्रण १ महिनाभर घेण्यास सांगितलें व ८ दिवसांनी एकदा आरग्वधहिम ( बाहव्याच्या मगजाचें पाणी ) घेण्यास बजाविलें.

या रोग्यास मौक्तिकभस्मयुक्त कामदुघा व माहेश्वरीचूर्ण या दोन औषधापासून विशेष फायदा झाला हे गृहस्थ परगावीं पुन: आपल्या नोकरीवर रुजू झाले असून शिक्षकाचें काम उत्तम रीतीनें करीत आहेत.

---

# (१९६) रजःक्षयकालज उन्माद

रोगी, स्त्री, वय ५५ वर्षे वर्ण सावळा, स्वभाव गंभीर, ममताळू, आस्तिक प्रकृति वातकफात्मक काही मानसिक, अध्यात्मिक आघाताचें निमित्त होऊन असंबद्ध प्रलाप सकाळी उठल्याबरोबर सुरू झाला अधिक चौकशी करता असें कळलें की, मासिक रजोदर्शन बंद झाल्यानंतर १-२ वर्षांनंतर पुन्हा त्याची प्रवृत्ति झाली आहे वास्तविक ४५ ते ५० वर्षे वयापर्यंत मासिक रज स्राव पूर्णपणे बंद झालेला आढळण्यांत येतो शास्त्रातहि तेच खरे आहे याति पंचाशत क्षयम्। (—अ. हृ शा १–७) पाश्चात्य वैद्यकातहि हाच काल दिलेला असून अपवादात्मक उदाहरणात ५५ वे वर्षहि सांगितलें आहे (Savill) यावेळी शरीरात घडामोडी होत असल्यामुळे पुष्कळांना त्रास होतो पाश्चात्य वैद्यकानें त्याचें बरेच वर्णन दिलें आहेः—"The mental condition of the individual is frequently very definitely affected, and all degrees—from a certain amount of irritability or depression to a condition closely allied to insanity—are to be observed" (Ten Teachers, Diseases of Women, P 53)

"The menopause is usually accompanied with great depression and other disturbances of a physical or mental nature"—(Halliburton's Physiology, P 903)

आयुर्वेदीय ग्रंथात ह्या कालाचें विशेष वर्णन केलेलें नाही. त्यामुळें चिकित्साहि दोषदूष्यतारतम्य कल्पनेनेंच बसवावी लागते स्वतंत्र रोगावस्था ग्रंथात दिलेली नाही.

मिथ्याहारविहार हें रोगोत्पत्तीचें सामान्य निदान झालें तसेंच चोरैर्नरेन्द्रपुरुषै-रभिभूयमाने गाढं क्षते मनसि च " जायते मनसो विकार. । इत्यादि

मनोदु खजन्य उन्मादाचें विप्रकृष्ट निदान भावप्रकाशकारानी केलें सूक्ष्मातुसूक्ष्मतर अवस्थांचा विचार करण्याची आयुर्वेदीयाची ख्याति आहे उन्मादनिदानात पूर्वाचार्यांनी रज:क्षयकालाचा उल्लेख करावयास पाहिजे होता दोपदूष्यतारतम्याने ह्या रोगाची चिकित्सा होऊं शकते. परतु अल्पबुद्धीच्या माणसास विस्तृत वर्णनाची जरूरी वाटते

" अरेतसि अप्रजसि वा देवोपहतचेतसि " कल्याणकघृत द्यावे असे सागितलें असलें, तरी तेवढ्यावरून रज क्षयकालाचा बोध होत नाही असो.

रोगी चिकित्सेस आला त्या वेळीं रोग्याची मन स्थिति पुढीलप्रमाणे होती —माझा घरोबा जास्त असल्यामुळे नाडी पाहावयास लागताच ' गोविंद, माझी प्रकृति उत्तम आहे माझा हात कशाला पाहातोस ?" असे म्हणून पुन्हा विचार करण्यास सुरुवात केली दोनतीन दिवसापासून झोप नसल्यामुळे चेहरा फारच मलूल झालेला होता डोळे तारवटलेले दातावर चिकटा व किट्ट फार जमलेलें विस्कटलेल्या केशरचनेवरूनहि त्यांच्या स्वभावाचें ज्ञान व मनोवृत्तीतील वदल तावडतोव ओळखता येत होता. जागरणामुळें आलेला थकवा, रूक्षता, मालिन्य, बेफिकीरवृत्ति इत्यादिमुळें त्याच्या निरोगी अवस्थेतील स्वभावात झालेला फरक सामान्य माणसासहि सहज कळून येत असे

चिकित्साक्रम —प्रथम मस्नेह मृदु शोधन दिल्यानंतर अगास लावण्याकरिता पुढील उटणे दिलें —**कचोरा** १ मासा + **हळद** १ मासा + **वेखड** २ मासे + **तीळ** ५ तोळे, हे उटणे लावल्यानंतर १ तासानें कोमट पाण्यानें डोक्यावरून स्नान असे आठ दिवस केलें

या स्नानानंतर थोडा वेळ थकवा येत असे व तो आपोआप नाहीसा होऊन भूक वाटत असे

आहार —जुन्या तांदळाचा भात, तूप, लोणी, पोळी, फळरस (तीन वाजता)

जेवणातच **कल्याणकघृताचा** उपयोग केला त्यामुळे ३-४ दिवसातच त्याचें अग्निसंदीपनकार्य प्रतीतीस आलें

विहार —वर लिहिलेले उटणे लहान मुलीचे गायन हास्यकारक गोष्टी पिण्यास वाळयाचे पाणी

औषध —(१) **सारस्वतारिष्ट** १ तो + **द्राक्षशर्करा** $\frac{1}{2}$ तो + **शुद्धोदक** २$\frac{1}{2}$ तो जेवणानंतर एक तासानें सकाळ-संध्याकाळ (२) **स्मृतिसागर** $\frac{1}{2}$ गु + **प्रवाळभस्म** १ गु + **महावातविध्वस** $\frac{1}{2}$ गु + **जटामांसीचूर्ण** १ मासा, तीन पुड्या

अनुपान—तीन वर्षाच्या जुन्या तुपात ( गाईचें तूप ) सकाळी ७, दुपारी ३ व संध्याकाळी ६ वाजता

( तुपाचा दर्प रोग्यास सहन होत नसे म्हणून त्यावर गुलाबाचे सरवत देत असू )

दोन्ही औषधें दोन महिने चालू होती आज दोन वर्षे झाली तरी प्रकृति निकोप आहे नुकताच पतिविरहाचा जबरदस्त धक्का वसूनहि मानसिक विकृति झाली नाही

---

## (१९७) क्रिमिज पाण्डु (पित्तविकृत)

रोगी, वय ५ वर्षे मुख्य तक्रार "कापूस खाणें, घोंगडी फाडफाडून खाणे. हे खाणे इतकें असे की सबंध दिवसांतून १५ ते २० तोळेपर्यंत कापूस-कावळे मिळून खात असे कापूस किंवा कावळे मिळू दिले नाही व रोग्यावर लक्ष ठेवलें तरीहि नजर चुकवून सवि सापडताच अंगातील सदराच फाडून चावून खाई ही स्थिति चार महिन्यापासून होती अन्नावर पूर्ण अनिच्छा घरची मंडळी आग्रह करकरून एक वेळ थोडेसे खाण्यास देत असत याशिवाय दररोज ताप येत असे खोकला कायमचा होता.

रोगीपरीक्षेत —पांडुता, कृशता, आध्मान, अतिशय प्लीहावृद्धि, यकृत् किंचित् वाटलेले, छाती आकुंचित. कफदोष भरपूर. कृमीची शंका असा तऱ्हेनें दोषस्थान सापडली

चिकित्सा —पहिले दोन दिवस–कृमिघ्न + विरेचन

याने इच्छित कार्य झाले विरेचन चांगले होऊन पांच-सहा जंत पडले

नंतर:—हिरडा १ तो. + वावडिंग ½ तो + कुटकी ½ तो. + कडुपडवळ १ तो एकूण २½ तोळे.

याचे तीन भाग करून एक भाग १२ तोळे पाण्यात उकळून ⅛ काढा करून दिवसातून तीन वेळ देण्यास सांगितले रोगी परगावचा असल्यामुळे पंधरा दिवसांचे औषध बरोबर दिलें

पंधरा दिवसानंतर रोगी आला त्या वेळी खोकला मुळींच नव्हता प्लीहा बरीच कमी झाली होती शौचास साफ होत होते व आध्मान नव्हते तापहि नव्हता आश्चर्याची गोष्ट ही की, औषध चालू केल्यापासून आठच दिवसात कापस व घोंगडी खाणे बंद झाले रोगी दिवसातून दोन वेळ भरपूर जेवूं लागला

उपशय दिसला म्हणून आणखी एक महिना हीच चिकित्सा चालू ठेविली रोगी पूर्ण बरा झाला असून गेले वर्षभर त्याला कोणत्याहि तऱ्हेचा विकार झालेला नाही

---

## (१९८) उन्माद (क्रिमिज ?)

रोगी, मुलगी, वय ४॥ वर्षे रोगी परगावी असल्यामुळे समक्ष पाहता आला नाही मुख्य तक्रार व लक्षणे विचारून औषधयोजना केली मुख्य तक्रार, डोक्यातील केस

उपटून त्यांचा, वास घेऊन फेंकून देई. हा क्रम सारखा चालू असे. त्यामुळे रोग्याच्या डोक्यावर केसच नाहीसे झाले होते एकांतप्रियता---आईबाप किंवा इतर कोणाकडेहि जात नसे. एका कोपऱ्यात एकांतपणे बसून केस उपटून हुंगून टाकी हा रोग जडल्यापासून मुलीची चलाखीहि कमी झाली. पुढें वेडयाप्रमाणे काहीतरी चाळे करूं लागली अन्नावर मुळीच इच्छा नव्हती. झोप कमी.

चिकित्सा ---हिरडा चूर्ण १ तो. + वावडिंग $\frac{1}{4}$ तो. + कुटकी चूर्ण $\frac{1}{2}$ तो एकूण १$\frac{3}{4}$ तो. याचे तीन भाग करून तीन वेळ काढा घेणे

याप्रमाणे १५ दिवसाचें औषध दिलें पंधरा दिवसानंतर सर्व लक्षणे कमी झाली म्हणून पुन्हा आणखी पंधरा दिवस तीच औषधें दिली. त्यानें चांगली सुधारणा झाली

---

# (१९९) म्हातारा च्यवन

रोगी, पुरुष, वय ५३. श्रीमंत, स्वभावानें दिलदार पण अल्पसत्व (कमी धीराचा), बव्हपत्य ( विपुल संतति असलेला )

पूर्वेतिहास ---इ स १९२० साली सकाळच्या प्रहरी धावत्या आगगाडीच्या खिडकीतून बाहेर पाहण्याचे निमित्त झालें व तेव्हापासून पडसे व खोकला येण्यास सुरुवात झाली. सिंकोना पिल्स किंवा चिरेटा पिल्स घेतल्यावर तितक्यापुरते बरे वाटत असे ह्या गोळ्या रोग्यानें बऱ्याच प्रमाणात घेतल्या होत्या "वेलदोडा खाल्ला किंवा दाराचे फटीतून थंड वारा अंगास झोंबला की, पडसेखोकला सुरू होई," इतकी प्रकृति हळवी झाली होती रोगी हिवाळ्यात व पावसाळ्यात महिनामहिना स्नान करीत नसे याप्रमाणे सुमारें १०-१२ वर्षे हा पडशाचा क्रम सुरू राहिला नंतर काहीहि विशेष औषधि न घेता पडसें बंद झाले ज्या कालात पडसे सुरू होते त्याच सुमारास दात हळूहळू पडण्यास सुरुवात झाली व १९२७ चे सुमारास सर्व दात पडून कृत्रिम दात बसवावे लागले

याच सुमारास कानाच्या मागे एक गळू होऊन त्यावर शस्त्रक्रिया करावी लागली पडसें थांबल्यावर दोन्ही डोळयात क्रमानें मोतिबिंदु होऊन ऑगस्ट १९३१ मध्यें ते काढावे लागले शल्यविधि संपल्यानंतर १३-१४ दिवसानी एका मित्राने "शस्त्रक्रिया तर नीट पार पडली ना !" म्हणून सहज विचारलें या प्रश्नानंतर खरोखरच शस्त्रक्रिया नीट झाली किंवा काही चुकले म्हणून मनांत संशय निर्माण झाला व नंतर एक-दोन दिवसाचे आतच डाव्या डोळ्यासमोर एक कुंडी व त्या कुंडींत एक झाड असे अस्फुट

दृश्य नेहमीसाठी दिसूं लागले डोळे मिटले तरच तीं कुठीं दिसेनाशीं व्हावयाचीं. रोगी अगदीं त्रासून गेला

पुढें पुढें तर सडकेवर घातलेले डांबर, स्वयंपाकघरातील वास, नाकातोंडात, डोळ्यात, कानांत, पोटात जात आहे असे वाटू लागे एखाद्या रंगलेल्या इमारतीकडे पाहिले किंवा स्वयंपाकघरातील तिजटाच्या डब्याकडे पाहिले किंवा कंदिलाचा उजेड दिसला तर तो रंग, ते तिखट अगर कंदिलातील रॉकेल तेल डोळ्यातून, नाकातून पोटात जात आहे असे वाटून रोगी व्याकुळ होत असे कंदिलाच्या त्रासाने रोगी अंधार करून झोपत असे उदबत्तीचा वास देखील सहन होईना ( मात्र मंद सुगंधी द्रव्यानां त्रास होत नसे ) क्रमाक्रमानें हा त्रास वाढतच गेला व १९३४ चे सुमारास रोग्यास व्यवायाऽक्षमत्व ( क्लैब्य ) आले व ते १९३७ चे सुमारास पराकाष्ठेला पोहोंचले आपण चालतो कसे, जेवतो कसे, याची देखील भ्रांति पडूं लागली ' माझ्या कमरेचा विळखा सुटला " असे रोगी वारवार सांगत असे रोग्याची स्थिति उन्मादासारखी नसून तो विमनस्क असे त्याचे इतर व्यवहार पूर्ण शुद्धीतले असत या दीड वर्षात मात्र त्यास शौचास नेहमी पातळ होत असे

पूर्वी झालेले उपचार —अनेक प्रसिद्ध डॉक्टराना व वैद्याना प्रकृति दाखविली व शेवटीं वर्तमानपत्रात जाहिरातहि दिली. डॉक्टर न्युरस्थेनिया निदान करून चिकित्सा करीत होते सूक्ष्म चंद्रकला, माहेश्वरी, स्मृतिसागर, सारस्वतारिष्ट कल्याणसर्पि सुवर्ण, डोक्याला अभ्यंग इ याप्रमाणे वैद्याची प्रमुख औषधे होती व्यवायाक्षमत्व नाहीसें होण्यासाठीं ओकासा, हारमो ग्लॅंड्स्, रिज्युव्हेवक्टोटॉल इ औषधे घेतली पण या वृष्य औषधानी तितक्यापुरतीच चेतना येत असे, तीहि अर्धा एक मिनिटच एका ज्यू डॉक्टराने इलेक्ट्रिक ट्रीटमेन्ट घेऊन पाहा पण त्याने व्यवायाक्षमत्व निश्चयाने येईलच असें सांगता येत नाही म्हणून सल्ला दिला होता

चिकित्सेस प्रारंभ —ता २१।५।३७ ला रोगी चिकित्सेला आला त्या वेळी व्यवायाक्षमत्व प्रथम कमी करा अशी रोग्याची मागणी होती रोग्याला कोणताच जननेंद्रियासंबधीं विकार नव्हता उत्थापन देखील होत नसे, इतकेच नव्हे तर मनातून तसली संवेदना देखील होईना.

वंगभस्म ( जननेंद्रिय बलाकरिता ) + सुवर्णमाक्षिकभस्म ( मेंदूला शांतता मिळावी म्हणून ) हे मिश्रण रसायन काली ( सकाळी ), अपानकाली ( दुपारी ) जेवणापूर्वी व स्वप्नकाली ( रात्री झोपण्यापूर्वी ) मधात देण्यास सुरुवात केली साधारणत: एक महिना झाला, काहीच परिणाम झाला नाही

पुढे केवळ शुद्ध कुचला ४ गु पुटी, रसायनकाली व दोनहि अपानकाली पाणी ह्या अनुपानाबरोबर देण्यास सुरुवात केली २०-२२ दिवस झाल्यावर रात्री लघ्वीच्या

आधी इंद्रियोत्थापन होऊं लागले पण लघ्वी होऊन जाताच पुन इंद्रिय पूर्ववत् म्लान होत असे मध्यंतरी दोन बस्ताडाचा १० दिवस पुरेल असा साखरेत पाक करून दिला, पण रुग्णस्थितीत सुधारणा झाली नाही रोगी सनातनी असल्यामुळे पुढे त्याने वस्ताड घेण्याचे नाकारले.

रोगी असाध्य आहे या समजुतीने मी त्यास टाळण्याचा प्रयत्न करूं लागलो; पण रोगी भिषग्वश्य व आढ्य असल्यामुळे आणखी एक प्रयोग करून पाहण्याचे ठरविले:

दिवसेदिवस वाढती दुर्दशा होत असलेली पाहून आपण लवकरच मरणार अशी रोग्यास भीति वाटत होती. च्यवनप्राश हे आयुर्वेदातील बरेच विख्यात असे वातातपिक रसायन आहे "आपण हे औषध घ्याल तर निश्चयाने कमीत कमी २५ वर्षे जगाल," असे आश्वासन देऊन ता. २६।७।३७ पासून **च्यवनप्राश** घेण्यास सुरुवात करविली. एक तोळा रसायनकाली ( सकाळी ) व एक तोळा स्वप्नकाली ( रात्री झोपण्यापूर्वी ) दुधाबरोबर घेण्यास सांगून एकभुक्त राहून रात्रीस केवळ दूध पिण्यास सांगितले व रोग्यानेहि आपण २६।७।६२ चे सायान्हापर्यंत जीवंत राहणार या आशेने च्यवनप्राश नियमाने घेण्यास सुरुवात केली

च्यवनप्राश सुरू करून ५ महिने झाले, पण व्यवायक्षमत्वाचे ( क्लैब्य नाहींसे होण्याच्या ) दृष्टीने काहीं फायदा झाला नाही रोगी कटाळूं लागला, पण पुन्हा त्यास २६।७।६२ ची आठवण करून दिली च्यवनप्राश सुरु करून ६ महिने झाल्यावर अजून व्यवायक्षमत्व ( पौरुष ) येत नाही हे पाहून पुन्हा मुंबईची वारी करण्याचे रोग्याने ठरविले, पण मुंबईला पोहोचण्याचे अगोदर गाडीतच रोग्यास अनंगाचे बोथट बाण बोचूं लागले रोग्याने मुंबईहून आल्यावर झालेली सर्व हकीकत सांगितली त्यास बरोबर आणलेल्या ल्युटोकल व फिस्टॉल ह्या औषधि न घेता च्यवनप्राशच सुरू ठेवण्यास सांगितले व रोग्यानेंहि पूर्वीचाच क्रम सुरु ठेवला

च्यवनप्राश सुरू झाल्यापासून साधारणत. आठ महिन्यानी रोग्यास आपण व्यवायसमर्थ आहोत याची पूर्ण जाणीव झाली तरीहि च्यवनप्राश चालू ठेवण्यासच सांगितले

रोगी अजूनहि च्यवनप्राश सकाळी एकदा रसायनकाली घेत असतो रोग्याचे चित्तास बरीच शांतता आली आहे पूर्वीचा वावळटपणा जवळजवळ नाहीसा झाला आहे ( पण अजून उदबत्तीचा उग्रगंध सहन होत नाही ). आता इमारतीचा रंग पोटात जात नाही, डोळ्यासमोरील कुंडी दिसणे हे लक्षण नष्ट झालें आहे

च्यवनप्राशाचे गुणधर्म पाहता त्यातील प्रमुख घटक--आवळ्याचा शुक्रग्रंथी व ओजोग्रंथींना उत्तेजक व बलकर असाच परिणाम प्राधान्याने आढळून येतो

"जराजर्जरितोऽप्यासीन्नारीनयननन्दन· ।
मूत्रशुक्राश्रयान् दोषान् · · व्यपोहति ॥

मेधाम् स्मृतिम् आयु.प्रकर्षम् ..... ।
स्त्रीषु प्रहर्षम् बलमिंद्रियाणाम् ।
कुर्यात् ॥ अष्टांगहृदय उत्तरस्थान अध्याय ३९ श्लोक ४०।४२

या यशाचें श्रेय मला नसून आयुर्वेदाच्या ऋषींना आहे

या ठिकाणीं एक गोष्ट मात्र सांगावीशी वाटते तो म्हणजे आयुर्वेदीय औषधांचे गुणधर्म ठरविताना कालपरिमाणाचाहि विचार करावा लागेल च्यवनप्राश सुरू करून ५ महिने झाल्यावर जर तो बंद केला गेला असता, तर त्याचे गुण आढळले नसते व च्यवनप्राशाचें गुणपाठावरील विश्वास उडाला असता कांहीं औषधि अशा असू शकतील कीं ज्याचा त्वरित परिणाम न दिसता कालांतराने तो दिसत असावा.

---

# (२००) आंत्रशोथज्वर

रोगी पुरुष, वय १८ वर्षे, विद्यार्थी

दर्शनपरीक्षा.—रोगी अत्यंत दीन व मलूल असा दिसत होता. त्यास उठून बसण्या इतकी शक्ति नसल्यामुळे तो अंथरुणावरच पडून होता त्याची छाती व पोट हीं जेव्हां दुरूनच बघण्यात आलीं, तेव्हां दर श्वासोच्छ्वासाबरोबर फक्त छातीचीच हालचाल होत आहे असें दिसून आलें जिभेवर पांढरा थर असून ती गुळगुळीत दिसत होती।

स्पर्शनपरीक्षा.—रोग्याचा ताप १०१° फ असून नाडीचा वेग दर मिनिटास १०८ असा होता

रोग्याचे पोटाची परीक्षा केली त्या वेळी तें अत्यंत कडक असें लागलें पोटाचा (abdomen) सर्वच भाग—विशेषत बेंबी जवळील भाग—अत्यंत कडक होता व सर्व पोटास फारच दुखरेपणा (tenderness) आला होता (हें, पोट तपासताना त्याच्या जोराने कण्हण्यावरून व पोटाचे स्नायु जास्तच आवळून घेण्यावरून अनुमित झालें)

प्रश्नपरीक्षा.—रोग्याच्या आप्तास विचारलेल्या हकीकतीवरून असें समजलें कीं, रोगी ता २५ जूनपासून तापानें आजारी असून त्यास तासातासानें जुलाब होतात व मधूनमधून वांत्याहि होतात तसेंच पोट फार दुखत आहे तापामध्ये थोडा फार चढउतार होतो, परंतु ताप अजिबात उतरल्याचें त्यानीं सांगितले नाहीं रोगी पूर्वी बराच सशक्त होता, परंतु आता फारच गळून गेला आहे तहान फार होती

**अनुमानः**—पांच सहा दिवसाच्या अशा प्रकारच्या तापावरून आत्रिक, कृमिजज्वर, विषमज्वर व आन्त्रशोथज्वर ह्या विकाराची कल्पना आली

आत्रिकामध्यें रोग्याची जिव्हा विशिष्ट तऱ्हेची (वरच्या बाजूस पांढरा, पिवळा किंवा काळा थर असून बाजूच्या कडा लाल ) असते. तसेच नाडीचे प्रमाण ज्वरोष्म्याच्या मानानें कमी असते अशी परिस्थिति ह्या ज्वरामध्ये नव्हती

कृमिज ज्वरात पूर्वीचा कृमीचा इतिहास असतो तसेच कृमीची इतर लक्षणे म्हणजे नाक खाजविणे, गुदकंडू, झोपेंत दचकणे, इ लक्षणे असतात तसली लक्षणे ह्या ठिकाणी नव्हती

विषमज्वरामध्यें दोषाच्या अल्पत्वामुळे ताप हा एकसारखा असत नाही. परंतु ह्या विकारात एकसारखा ताप असल्यामुळें त्याचीहि शक्यता नव्हती

रोग्याचे पोटास फारच कडकपणा होता व रोगी पोटास हात लावूं देत नसे इतका दुखरेपणा तेथे होता जेव्हा जेव्हा आतड्याची सूज असते तेव्हा तेव्हा त्या भागाचे संरक्षण करण्याकरिता त्यावरील स्नायु हे अगदी कडक बनतात त्याच-प्रमाणे जेथे सूज असते तेथे दुखरेपणा असतो, ह्या न्यायाप्रमाणे आतड्याची सूज आहे हे ठरविले तसेच त्यावरोवरची लक्षणे म्हणजे ताप, वात्या, जुलाब, गुळगुळीत पांढरी जीभ व अत्यंत ग्लानी ही लक्षणे असता तो आन्त्रशोथज्वर आहे असे ठरविले.

ज्वरवेग, छर्दि, अतिसार, तृष्णा ही लक्षणे लक्षात घेता त्या ठिकाणी पित्ताचा सर आणि तीक्ष्ण धर्म वाढलेला आहे (वेगस्तीक्ष्णोऽतिसारश्च निद्राल्पत्वं तथा वमि ।··· · तृषा · पित्तजज्वर) यावरून पित्तप्रधान दोष आहे असे ठरविले

पित्ताचे सरत्व आणि तीक्ष्णत्व हे गुण कमी करणारे आणि आन्त्रशोथज्वरावर प्रभावाने कार्य करणारे (योग्य साधनाच्या अभावी ह्या बाबतीत प्रभाव म्हणण्याची पाळी आली आहे कदाचित् योग्य प्रयोगाती ह्याच्या रसवीर्य विपाकादिकानी ह्या ठिकाणी होणाऱ्या कार्याची उपपत्ति लागेल ) असे **जसदभस्म** देण्याचे ठरविले (आयु-र्वेदीय औषधिगुणधर्मशास्त्र भाग १ ला–जसदभस्म) व केवळ ह्याच औषधाची प्रचीति घेण्याकरिता पुढीलप्रमाणे औषध दिले

**जसदभस्म १ गुंज + शर्करा ६ गुंजा** ६ पुड्या दिवसातून सहा वेळा दुधात

दुसरे दिवशीच रोग्याच्या वात्या व जुलाब ही बरीच कमी झाली पूर्वी तासातासानें होणाऱ्या जुलाबाचे प्रमाण सबंध २४ तासात ५-६ वेळावर आले. ह्या वेळी पूर्वीप्रमाणेच औषध देऊन स्थानिक उपचार म्हणून शोथनाशक असा लेप पोटावर घालण्यास दिला. तीन चार दिवस असे औषध दिल्यानंतर रोग्याची सर्व लक्षणे नाहीशी झाली

---

अस्थ्ना भवति दार्ढ्य च आमवातश्च शाम्यति ॥
भैरवेण समाख्यातो रसोऽय भैरवाभिधः ॥ ( भै र )

वरील पाठ भैषज्यरत्नावलीतला आहे. आयुर्वेदीय पद्धतीने शुद्ध केलेला पारा मजजवळ नव्हता म्हणून विलायती विशुद्ध पारा ( double refined pure mercury, London ) १०० गुजा घेतला. त्यात ३०० गुजा भावनगरी साखर टाकून लिबाच्या दाडयाने लोखडी खलात चागले मर्दन करविले दोन तीन तासानीं त्यात १०० गुजा पाढरा कात टाकून आणखी चार तास खल केला हा खल लोखंडी वत्यानेच केला. कज्जलीसारखे चूर्ण तयार झाल्यावर त्यात पाणी टाकून ( पाण्याचे ऐवजी मध घेतला तरी चालेल ) २० गोळ्या तयार केल्या

भैषज्यरत्नावली वाचीत असताना पहिल्या वाचनातच हा योग मी लक्षात ठेवला होता. आणि ग्रंथात त्या ठिकाणी " कार्य " असे लिहूनहि ठेवले होते परतु पुष्कळ वेळपर्यंत त्याचा प्रयोग करण्यास हिमत होत नव्हती आणि प्रयोगाकरिता योग्य असा रोगीहि आला नव्हता

ता २०–१०–३८ रोजी हासोटचा राहणारा, परतु हल्ली अंकलेश्वराजवळ गडखोल-देवी येथे पूजा करीत असलेला व तेथेंच राहणारा एक तपोधन जातीचा रोगी माझ्याकडे आला. ह्या रुग्णास मी पूर्वी दोन वेळा निओसाल्व्हारसन ( 45 gms. ) दिले होते याच्या आधी त्याने दुसऱ्या डॉक्टराकडून एक इजेक्शन घेतले होते ह्यावरून त्या रुग्णाला सिफिलिसचा रोग होता हे मला माहीत होते ह्या रोग्याची स्त्री व्यभिचारिणी होती व ती एका गोसाव्याबरोबर पळून गेली होती त्या बाईमुळेच ह्याला हा विकार जडला होता

रोग्याचे वय हल्ली ४५ वर्षांचे होते शरीराचा बाधा एकदरीत ठीक होता तीन इजेक्शन्स घेतल्यामुळे त्या वेळीं रोग पुढे वाढला नव्हता. परंतु ह्या वेळी मात्र त्याला अगदी चालवत नव्हते म्हणून तो हासोट येथे आला, तेव्हा त्याचे घरी जाऊन त्याला पाहावे लागले रोग्याची एकदर अवस्था पाहून मी तर एकदम दचकलोच, आणि माझ्या अंगावर शहारे उभे राहिले रोग्याची सर्व कातडी उलून गेली होती कपाळ, हात, पाय, पोट यावरील कातडी तर एकत्र होऊन जणू काय गळून पडेल असे वाटत होते दुर्गंधी तर इतकी होती की, रोग्याजवळ उभे राहवतच नव्हते पण खोलीत देखील थोडा वेळ उभे राहू नये असे वाटत होते. नाडी पाहण्याचा सुद्धा धीर होत नव्हता शरीरावरील सर्व चिरण्यातून चिकट पाणी बाहेर येत होते रोग्याच्या अवस्थेची कल्पना पूर्णपणे येण्यास एक गोष्ट सागाविशी वाटते की, रोग्यास स्नान घालण्याकरिता कोणी विगारीसुद्धा मिळत नसे अर्थात् स्नानाशिवाय रोगी बरेच दिवस खाटेवर पडून होता माशाहि पुष्कळ होत्या थुकी चिकट आणि पिवळी पुवासारखी असे सर्व शरीराची आग आग होत होती जीभ लालभडक झाली होती काहीहि खाववत नसे शौचा-सहि साफ होत नसे

ह्या मिश्रीकरण कोणास वाटत होतें कीं, पारा हा मारला नाहीं. मलाहि [illegible] नक्की वाटलें. शुद्धीच्या अभावीं आणि पोषणाच्या अभावीं हा रोगी दगावणार असें मी रोग्याच्या नातलगास सांगितलें. तरीहि रोगी असाच मरेल, तर प्रयत्न करून पाहण्यासाठीं देण्यास त्यांनीं कबूल केलें. मीहि केवळ " मृतवत् " म्हणून औषध सुरू केलें.

निर्जीवावस्थेत देण्यासाठीं रसौषध [illegible] नव्हतें. म्हणून पोटांत औषध देणें जरूर होतें. महामंजिष्ठादिकषायाचा पाठ लिहून दिला व रोग्याच्या नातलगानें तो तयार करून देण्यास सुरुवातहि केली. त्यास [illegible] "भैरवरसाच्या [illegible] आठरा गोळ्या व [illegible] अभ्यास [illegible] असलेल्या शिष्यांना मी [illegible]. [illegible] गोळ्या तयार केल्या. पहिल्या दिवशीं तीन गोळ्या, मध, दुधार, [illegible] ... प्रमाणें शिष्यांत असलेल्या करून ( शिष्यानें [illegible] ) देण्यास [illegible] व रोग्यानें त्याप्रमाणें गोळ्या गिळल्या. भैरवरसाचें पथ्य कडक असल्यानें त्यांनीं जाणीव [illegible] नातलगास सुरुवात करून दिली. जलपान आणि उष्णस्पर्श असणें वाढ, पिण्यास [illegible] रस. शौचास जातानाहि गरम पाणी [illegible]. [illegible] बाहेर येण्यास [illegible] गोळ्याबरोबर पांच तोळे महामंजिष्ठादि काढा देण्यास आला. [illegible] केवळ दूधभात, [illegible] तर सुरूं करून दिलें. औषधामुळें, आधींच आलेलें तोंड आणखी लाल झालें. पुष्कळ व चिकट लाळ तोंडातून पडत असे. त्याकरितां पंचवल्कलकषाय दिवसातून [illegible] वेळां गुळण्या करण्यास दिला.

रोग्यानें पथ्य बरोबर संभाळलें. उन्हाळ्याचे दिवस असूनहि पाण्यासाठीं तळमळत रोग्यानें पाण्याशिवाय दिवस काढले. ढेंगाचा स्पर्शहि मिळत नव्हता. तो गुरुतून मागवावा लागला. वीस गोळ्या पूर्ण झाल्यावरहि पथ्य चालूच ठेवलें. महामंजिष्ठादि-कषायामुळें दोन-तीन वेळ शौचास साफ होत असे. प्रयोगाच्या दहाव्या दिवसापासून रोग्यामध्यें फरक दिसूं लागला. दाह कमी झाला, झोप येऊं लागली. पण तोंड येणें मात्र अधिकच वाटलें. लाळ वाहातच असे. जुईचें पान चघळण्याकरितां दिलें. शिवाय पंचवल्कलकषायाच्या गुळण्या चालूच होत्या.

प्रयोगाचे शेवटीं ( चौदा दिवसानंतर ) रोग्यास पाणी पिण्याची व स्नानाची परवानगी दिली. भूक चांगली होती म्हणून दूध, भात, भाकरी व मुगाचें पाणी देण्यात आलें. भैरवरसाच्या वीस गोळ्या संपल्यानंतर महामंजिष्ठादिकषायाबरोबर " आरोग्य-वर्धिनी गोळया " सकाळ-संध्याकाळ तीन-तीन देण्यात येत होत्या.

एक महिन्यात रोगी हिंडूं फिरूं लागला व अंगावरची सर्व कातडी नवीन आली. एकूण १०० गुंजा पारा रोग्यानें घेतला, व एवढ्यात कार्य झाल्याचें पाहून मी चकित झालों.

वरील रोग्याशिवाय दुसऱ्या एका सिफिलिसच्या रोग्याकरितां मी हा रस वापरण्याचा सल्ला दिला आहे. परंतु त्याचे परिणाम मला अजून कळले नाहीत. सिफिलिसच्या

शेवटच्या अवस्थेमध्यें जेथें निओसाल्व्हरसनचा उपयोग होत नाहीं तेथें मी हा रस वापरण्याची वैद्यांना खास विनंति करतो. परतु हल्लीं इतके कडक पथ्य पाळण्यास कोणी तयार होत नाही, म्हणून त्याचा सरसहा उपयोग करता येणे कठीण आहे निओसाल्व्हरसन फार महाग आहे. गरिबाच्या आवाक्याबाहेर त्याची किंमत आहे इतकेशिवाय त्यामुळे कधी कधी विषबाधेची लक्षणे दिसतात त्याचेऐवजी ह्या औषधाचा अनुभव घेण्यास हरकत नाही ह्या औषधामुळें काही वाईट परिणाम दिसून आल्यास त्याचीहि नोंद ठेवणे जरूर आहे. पथ्य बरोबर पाळल्यास कोणत्याहि प्रकारचे दुष्परिणाम होणार नाहीत अशी मला खात्री आहे. पुष्कळशा रोग्यावर प्रयोग करून पाहिल्याशिवाय ह्या औषधाची योग्यता सिद्ध होणार नाही इतक्या सोप्या व स्वस्त औषधाकडे वैद्यवर्गांचे लक्ष वेधण्याकरिता मी ही रुग्णचिकित्सा सविस्तर दिली आहे

---

# (२०२) संततज्वर

( पित्तभूयिष्ठ, वातानुबंधी, रक्तधातुगत वैकृतज्वर )

रोगी पुरुष, शेतकरी, वय ३० वर्षे. रोगकाल-वर्षाऋतु (सम्यक्योग)

रोगपरीक्षा —ज्वर आल्यापासून तिसऱ्या दिवशी रोगी पाहण्यात आला दर्शन (inspection) परीक्षेत रोग्याचा चेहरा लाल झालेला व त्रासल्यासारखा दिसला. श्वासोच्छ्वास जोराने चालला होता, पण छातीच्या संकोचविकासामध्ये अस्वाभाविकता आढळली नाही जिभेवर फिकट पांढरी बुरशी होती स्पर्शन ( palpation ) परीक्षेत ज्वराचा तीक्ष्णवेग, नाडीवेग तीव्र, पोटात बेंबीखाली दाबले असता दुखणे, पैकी डाव्या बाजूचा भाग जास्त दुखणारा होता पोटात गुडगुडत नव्हते सांघ्य आघाताने ( percussion) छातीवर स्वाभाविक शब्द निर्माण होत होता पण पोटावर निघणारा आवाज आध्मानबोधक होता. श्रवणयन्त्राने तपासता फुप्फुसे स्वाभाविक पण हृत्स्पंद तीव्र व जलद होत असलेले आढळून आले प्रश्न विचारता—रोज अखंड ताप १०२° ते १०४° पर्यंत, तीव्र शीर्षशूल, वारंवार वांत्या (हिरवट कडू पित्त पडते). हृल्लास ( nausea ), अत्यंत तहान, शीतोदकाची इच्छा, बडबड, ताप चढला की बेशुद्धि (मोह), लाल लघवी, झोप नाही ही लक्षणे होत असल्याचे समजलें

निदानः –कृमिजज्वर व आन्त्रिकसन्निपात याची अव्यभिचारी लक्षणे आढळून न आल्यामुळें लक्षणानुरोधानें वर्षाऋतूंत आलेला पित्तभूयिष्ठ (म्हणजेच वैकृत) वातानुबंधी रक्तधातुगत, संततज्वर असे निदान केलें. वैकृत असल्यामुळे दु साध्यता होतीच.

चिकित्सा---त्याच ( ३ ऱ्या ) दिवशीं दुपारीं प्रवाळभस्म ( चंद्रपुटी ) १ गुंज + गुळवेलसत्व १ गुंज अशा ३ पुड्या लागोपाठ २-२ तासानी मधातून घेण्यास दिल्या यानें वात्या व शीर्षशूल कमी झाला.

त्याच रात्री ज्वर कमी होण्याकरिता लक्ष्मीनारायण १॥ गुंज + प्रवाळभस्म ( चंद्रपुटी ) १ गुंज+गुळवेलसत्व १ गुंज अशी एक पुडी मधात दिली त्यानें रात्री घाम येऊन ताप दुसऱ्या दिवशी सकाळी ९८° झाला परंतु हा तापातील उतार अस्वाभाविक होता संततज्वरातील दोषपचन व शमन ( ज्वरमोक्ष ) ठराविक मुदतीने बहुधा होतात

वातपित्तकफैः सप्तदशद्वादशवासरान् ।
प्रायोऽनुयाति मर्यादा मोक्षाय च वधाय च ॥--अ. हृ. ज्वरनिदान

याच कारणामुळें लक्ष्मीनारायणातील वचनागादि स्वेदल द्रव्यामुळे उतरलेला तो ताप लगेच दोनतीन तासानंतर पुन्हा १०२° पर्यंत चढला व पूर्ववत् वात्या व डोकेंदुखी ही लक्षणें सुरू झाली म्हणून ताप उतरविण्याच्या भानगडीत न पडता पित्तदोष, वांति व शीर्षशूल ही त्रासदायक लक्षणें कमी करण्याकरिता दिवसभर तासातासानें चाटण्याकरिता सुवर्णसूतशेखर १ गुंज + प्रवाळभस्म ( चंद्रपुटी ) २ गुंजा + गुळवेलसत्व २ गुंजा यांच्या मिश्रणाची रोज एक पुडी दोन दिवस मधातून दिली याने वात्या व डोकें दुखणें कमी झालें, पण ज्वरवेग व इतर लक्षणे कायमच राहिली

ताप येऊन आता ५ दिवस होऊन गेले होते या वेळी ज्वरकृत् पित्तदोषाचें रक्त-धातुगतत्व लक्षात घेऊन उपळसरी ३ गुंजा + नागरमोथा २ गुंजा + कुटकी ३ गुंजा + काटेचिराईत २ गुंजा + धमासा २ गुंजा या कडु औषधांचा काढा खडीसाखर घालून सकाळीं घेण्यास दिला व पुनः त्याचप्रमाणें काढा करून सायंकाळीं घेण्यास सांगितलें प्रवाळ-गुळवेलसत्वहि चालू होतेंच

या काढ्यानें शौचास साफ होऊं लागलें लघवीचा तांबडेपणा कमी होऊं लागला पोटांत दाबलें असतां दुखणें अजिबात नाहीसें झालें तहान कमी झाली व रोगाचीं इतर लक्षणें कमी होऊं लागलीं म्हणून दहाव्या दिवसापर्यंत हेंच औषध चालू ठेविलें

दहाव्या दिवशीं रात्रीं पुष्कळ घाम येऊन ताप उतरला ( ९६.५° ) तथापि पुढें दोन दिवस पित्तकाळीं थोडा ताप चढून उतरत असे पण दोन दिवसानंतर ताप पूर्णपणे थांबला मात्र अशक्तता बरीच आली होती जीर्णज्वरावरील बल्य उपचारानें ८-१० दिवसांत रोगी हिंडू फिरूं लागला

---

## (२०३) नारू (स्नायुक, तन्तुकीट) Guinea Worm

रोगी स्त्री, वय वर्षे ३०. या बाईस ४-५ महिन्यापासून पायातून नारू निघत असत निघण्यापूर्वी सूज, ठणका मनस्वी होई. बरीच औषधें व लेप करून ती कटाळली. डॉक्टर, वैद्य कोणीच त्यावर योग्य उपाय सांगेनात सौम्य औषधाचा परिणाम होत नाही असें पाहून मी बिब्याचा प्रयोग करण्याचे ठरविलें विब्याचे गुण पाहता तें वातकफात्मक कुष्ठ, कृमि, व्रण याचे नाशक असे आहेत असें आढळून आलें (भल्लातक कषायोष्ण. शुक्लो मधुरो लघु. । वातश्लेष्मोदरानाहकुष्ठार्शोग्रहणीगदान् ॥ हन्ति, गुल्मज्वरश्वित्रवन्हिमांद्यकृमिव्रणान् ।

**बिबा देण्याची रीत**—रोज सकाळी प्रथम नारळाचे १० तोळे खोबरे खाऊन, मग एक ते दोन बिब्याचे चूर्ण गुळात मिश्रण करून खावयाचे व त्यानतर पुन १० तोळे खोबरे खावयाचे मग दिवसभर अन्नपाणी काहीहि घ्यावयाचे नाही भूक तहान लागली तर आणखी खोबरेंच खावयाचें. १२ तासानंतर रात्री दूध, भात, पोळी, भाखर असे ( मीठ, तेल, तिखटविरहित ) अन्न सेवन करावयाचे. असा क्रम सुरू केला. बिबा हा उष्ण असल्यामुळे तो पित्तप्रकृति, पित्तकाल, पित्तदोष यावर जपून वापरावा लागतो. अशा वेळी हे औषध एक दिवस आड व अल्प द्यावे.

नारू नवीनच झाला असल्यास २-३ दिवसात या औषधाने बरे वाटते तीन चार नारू निघाले असतील व बरेच दिवस रोग चालू असेल तर ९-१० दिवस तरी रोज वरील औषध द्यावे लागते याने काही नारू बाहेर पडतात, काही आतल्या आत नष्ट होतात व व्रण भरून येतो.

नारूच्या सुजेवर स्थानिक उपचार म्हणून कडुनिंबाचा पाला वाटून बांधावा व शेकावे या उपचाराने वरील रुग्ण ५-६ दिवसातच रोगमुक्त झाला

---

## (२०४) अन्त्रपुच्छ–शोथ (Appendicitis)

रोगी पुरुष, वय ७० वर्षे. धंदा लाकडाचे दुकानदार.

**रोगाचा पूर्वेतिहास**—प्रथम पोटांत दुखूं लागले व एकदोन दिवसात उजव्या जांघेच्या वरचा पोटाचा भाग वर उचलून आला. शौचास होत नव्हती म्हणून त्यानें जुलाब घेतला. त्यामुळे १-२ जुलाब झाले, पण शूल अधिकच वाढला. पोटावरील फुगवटी पण कायमच राहिली. पोटांतूनहि काही औषधे घेतली होती, पण त्याचा उपयोग झाला नाहीं.

रोगी पाहिला तेव्हा पुढील लक्षणे होती --

लक्षणे (symptoms) --वारवार पोटात अत्यंत तीव्र स्वरूपाची कळ निघत होती व ढेंकराहि वरचेवर येत होत्या. प्रत्येक ढेकरानतर जीव जातो की काय असे वाटण्याइतका तीव्र शूल होत होता. ओकारी होईल असें वाटे (हल्लास), पण होत नसे पाच-सहा दिवसापासून विड्‌विबंध झाला होता ताप मुळीच नव्हता. Mac Burney's Point वर दावले असता असह्य अशा वेदना होत

चिन्हे (signs)—उजव्या जाघेची वरील बाजू बरीच वर उचलून आलेली होती. तो भाग स्पर्शाला शीत व कठीण ( boardlike rigidity ) लागत होता श्वासोछ्वासात पोट फारसे हालतच नव्हते (costo-abdominal)

' निदान--वरील सर्व लक्षणावरून हा अन्त्रपुच्छ शोथ आहे अशी खात्री झाली या शोथाला निमित्तकारणें निरनिराळ्या प्रकारची असली, तरी समवायी कारण दोषप्रकोप हेच आहे या आयुर्वेदीय सिद्धातानुसार या विकाराच्या दोषाचें परीक्षण केले. यात ज्वर दाह, उष्णस्पर्शादि पित्ताचे एकहि लक्षण नव्हते विकारातील वेदना वातप्राधान्य दर्शवीत होत्या व शोथाचा शीत, कठीण स्पर्श कफानुबंध व्यक्त करीत होता रोग तीव्र स्वरुपाचा असल्यामुळे कदाचित् civil hospital मध्ये जाऊन शस्त्रकर्म करावे लागेल, त्याच्या तयारीत राहा असा रोग्याच्या नातेवाईकास इषारा देऊन, दोषप्रत्यनीक उपशय पाहण्याचे ठरविले

औषधोपचार--प्रथम दिवसातून ५ वेळ दर २-२ तासानी अग्नितुंडीरस* या ओषधाच्या ½-½ गुंजेची १-१ पुडी ऊन पाण्यातून घेण्यास दिली व जाघेवरील सुजलेल्या भागावर हळद, पाढऱ्या वसूची मुळी, गुग्गूळ व सावरशिंग ही औषधें पाण्यात उगाळून, ऊन करून, साजमकाळ लेप घालण्यात आला आणि सहन होईल असा शेक वरुन करण्यास सागितले

या ओषधोपचाराने दुसऱ्याच दिवशी थोडा गुण वाटला वेदनाची तीव्रता कमी झाली ढेकर उशीरा येऊ लागले व पोटावरील सूजहि एक आणा कमी आहे असे उपचारकाने सागितले याच दिवशी रात्रीं शौचावाटे १ जाड जत्त पडला

दुसऱ्या व तिसऱ्या दिवशी अग्नितुडीच्या ½-½ गुंजेच्या ३ पुडया रोज सकाळी, दुपारी, सायकाळी दिल्या व पूर्वीचा लेप चालू ठेवला याने ढेंकर अजिबात बद झाले वेदनाची तीव्रता पुष्कळच कमी झाली मात्र त्या दोनहि दिवशी रोज ६ वेळ पातळ

---

*अग्नितुडीरसाची कृति --शुद्ध पारा, शुद्ध गधक, शुद्ध वचनाग, सुठ, मिरे, पिपळी, हिरडा, वेहेडा, आवळकाठी, चित्रक, वावडिंग, जिरे, शहाजिरें, जवखार, सज्जीखार, सैंधव, काळे मीठ, समुद्र मीठ सर्व १-१ भाग व शुद्ध कुचला १८ भाग (सर्व समान) घेऊन झावराच्या रसात खल करावा

शौचास झाले म्हणून चौथ्या दिवशी अग्नितुंडीच्या ½-½ गुंजेच्या फक्त २ पुड्या व संजीवनी गुटीच्या १-१ गुंजेच्या दोन पुड्या आलटून पालटून ३-३ तासानी ऊन पाण्याबरोबर घेण्यास दिल्या लेप चालू होताच. ही योजना आणखी २ दिवस चालू ठेवली. त्याने रोगाची सर्व लक्षणे नाहीशी झाली एकूण ६ दिवसांत रोगी पूर्ण बरा झाला

पथ्य आहार—पेय, दूध, कॉफी, चहा याखेरीज अन्य आहार वर्ज केला होता.

---

## (२०५) गोवर ( रोमांतिका—Measles )

हा लहान मुलाना येणारा एक सासर्गिक ( infectious ) विस्फोटक ज्वर आहे. याच्या साथी येतात. हा रोग होण्याचा काल व या रोगात होणारी लक्षणे यावरून हा रक्तधातुगत वातपित्तात्मक ज्वर आहे असे म्हणण्यास हरकत नाही ( या रोगातील दुष्टि सान्निपातिक स्वरूपाची असते व अन्य धातूहि याने दुष्ट होतात )

शुगर फॅक्टरीवर यंदा गोवराची साथ ग्रीष्म व वर्षा या ऋतूंच्या संधिकालात उत्पन्न झाली व वर्षाऋतूंत पाऊस न पडल्यामुळे तशीच चालू राहिली भाद्रपद महिन्यात पाऊस पडून हवामानात फरक पडल्यामुळे ती थोडी मंदावली होती परंतु आश्विन ( ऑक्टोबर ) महिना ( शरद्‌ऋतु ) सुरू झाला आणि योग्य ( रक्तप्रकोप ) काल मिळाल्याबरोबर ती साथ अधिकच फैलावली. या साथीत २० रोग्याची चिकित्सा करण्याची संधि मला मिळाली. त्यात आढळून येणाऱ्या गोष्टी पुढें नमूद केल्या आहेत

वयोमर्यादा—या वीस रोग्यात ३ महिन्याच्या वयापासून ८ वर्षाच्या वयापर्यंतची मुलें व मुली होत्या. (३ वर्षाच्या खालील १२ व ३ ते ८ वर्षाचे दरम्यानची ८ मुलें.)

पूर्वरूप व लक्षणे—बहुतेक सर्व रोग्यामध्यें सर्दी, पडशापासून सुरुवात झाली. खोकला ढांशीचा, ताप, डोळे उमरून येणे, जीभ पांढरी, भुरकट, बुरसलेली असणे ही लक्षणे पहिल्या तीन दिवस असत. काही रोग्यामध्यें सर्दी, पडसें अगोदरचे असून पुढें ताप येई. यांना तीन दिवसांपेक्षा जास्त दिवस झालेले असत चौथे दिवशीं विशेषतः डोकें, मान यावर पुरळ दिसूं लागे. हा पुरळ पाचवे दिवशी बहुतेक सर्व अंगावर उठे. या दिवशी तापाचे प्रमाण फार वाढत असे ( १०३°–१०४° ) दोन रोग्याचा ताप तर १०५° वर गेला होता. सहावे दिवशी संध्याकाळपर्यंत ( पुरळ येऊन तिसरा दिवस ) केव्हांतरी हा ताप उतरून जाई या अवधीत काही रोग्यानां हिरवट, घाण, पातळ रेच होण्यास सुरुवात होई. खोकलाहि बराच त्रासदायक होई या विकारात पहिल्यापासूनच रोग्यात फार अस्वस्थता दिसून येते काहीं रोग्याचे डोळे अगदी आल्यासारखे होऊन त्याम उजेडाचा त्रास होणे, शिंका येणे, हीं लक्षणे चांगलीच जाणवत

अंगावर गोवर उठण्यापूर्वी १-२ रोग्याच्या तोंडांत पुरळ दिसून आला. या रोग्याच्या गोवराचें स्वरूप बरेंच तीव्र होते. त्यापैकी एकाला पुढें श्वसनक (pneumonia) झाला व ताप १०५° च्या वर गेला. दुसऱ्या एका रोग्याचा तोंडावर एक दिवस गोवर दिसला, तो दुसरे दिवशीं मावळला ; पण त्या दिवशीं त्याच्या अगात १०२° ताप असतानाहि त्यास झटके (convulsions) आले तिसरे दिवशी पोटातील ओपधाने गोवर बाहेर पडला व योग्य काळी तो रोगी सुधरला

बहुतेक सर्व ठिकाणी एका मुलाला गोवर निघाला की घरातील दुसऱ्या सर्व मुलाना त्याची बाधा होते असे आढळून आले

उपद्रव—या २० रोग्यापैकी साताना अतिसार, नऊ जणाना खोकला, एकास श्वसनक व एकास पूयकर्ण (कान फुटणे) असे उपद्रव झाले

तीन मुलाना अगोदर कांजण्या येऊन नंतर पुनः गोवर निघाला. अतिसारी रोग्यापैकी तिघास आवरक्त (dysentry) व बाकीच्या चौघास हिरवट, घाणकट जुलाब झाले

**चिकित्साक्रम**—पाश्चात्य पद्धतीप्रमाणे या रोगावर स्वतंत्र अशी चिकित्सा नाही सर्व चिकित्सा लाक्षणिक पद्धतीने केली जाते मुख्यतः ताप खूप चढूं न देण्यासाठी हृद्य व स्वेदल औषधें दिली जातात त्याचप्रमाणे खोकला, अतिसार या उपद्रवावर त्या त्या विकाराची औषधे देतात.

आयुर्वेदीय पद्धतीनुसार गोवर बाहेर पडण्यासाठी **गोरोचन** चूर्ण (bile-stone in the gall bladder) इतर औषधावरोबर देतात देवी, गोवर, कांजिण्या याच्या विषाराची शरीरास विशेष बाधा न पोहोचता ते विषार पिडकारूपानें बाहेर पडून जाण्याकरिता परिपाठादिकषाय देण्याची पद्धत आहे.

वरील गोवराच्या रोग्यास मी पुढील ओपधयोजना केली होती. वयाच्या मानाने याच्या प्रमाणात फरक करण्यात येत होता.

१ लक्ष्मीनारायण १ गुंज + गोरोचन मिश्रण १ गुंज + सितोपला चूर्ण २ गुंज + शृंग भस्म १ गुंज गाईच्या दुधातून ३ पुड्या दिवसातून ३ वेळ देणें

२ परिपाठादिकषाय १॥ तोळा + शुद्धोदक १॥ तोळा ४ भाग करून ३-३ तासानीं १-१ भाग देणें.

खोकला फारच त्रासदायक असल्यास वरील पातळ औषधांवरोबर १ ते १॥ ड्राम (-।- तोळा) द्राक्षारिष्ट देत असे अतिसाराचा उपद्रव फार असल्यास मौक्तिकभस्म व अतिसारचूर्ण याचा पुड्यातील ओपधावरोबर उपयोग करण्यांत येई. या योजनेनें बहुतेक सर्व रोग्याना बरं वाटलें फक्त एकच रोग्यास श्वसनक सन्निपात झाला.

---

## (२०६) पित्तज परिणामशूल (Duodenal Ulcer)

रोगी पुरुष, वय ३० वर्षे. धंदा—रोग होण्यापूर्वी रोगी मुबईस मिलमध्यें काम करीत असे.

सध्याची त्याची मुख्य तक्रार म्हणजे पोट दुखणे व वात्या होणे ही होती

**रोगाचे स्वरूप**—रोग्यास वरील लक्षणाचा सहा वर्षापासून त्रास होत असे. पोटात व छातीत आग होत असून जेवणानंतर ३-४ तासांनी वांति होई अन्नाचे पचन होत नसे. वांत्या इतक्या आंबट असत की, त्यामुळे दातसुद्धां आंबट पडत शौचास साफ होत नसे. तहान फार लागत असे उजव्या अंगावर झोपल्याने वात्या जास्त होतात अशी रोग्याची तक्रार असे. वांति झाल्यावर साधारण बरें वाटत असे

पोटास हात लावून पाहिला असता, बेंबीच्या वरच्या बाजूस थोडें उजवीकडे दाबलें असता दुखत असे जीभ साधारण लालसर व डोळे किंचित् पिवळसर असत बऱ्याच दिवसाच्या विकारामुळे रोग्यास थोडीशी पाडुता आली होती. रोग्याची शरीरयष्टि मात्र बरी होती

**रोग्याचा पूर्वेतिहास**—रोग्यास व्यायाम करण्याची पूर्वीपासून सवय असे. मिलमध्यें काम करावयास लागल्यापासून व्यायामामध्ये अनियमितपणा झाला आणि मिलमध्ये पुष्कळ शारीरिक श्रम पडूं लागले. मिलपासून रोगी बराच दूर राहात असल्यामुळे पुष्कळ वेळा मिलची वेळ झाल्यास रोग्यास अर्धपोटीच कामास जावे लागे. त्याच्या खाण्यामध्यें रोज तिखट पुष्कळ प्रमाणात येई.

असा त्याचा कार्यक्रम चालू असता, पुढे काही दिवसानी दररोज जेवणानतर साधारणतः तीन तासानी त्याचे पोट दुखणे सुरू झालें. काही दिवस नुसतेच पोट दुखत असे, पण पुढें पुढें पोट दुखून वांति होऊं लागली त्यानंतर हा क्रम इतका नियमित झाला कीं. जेवणानंतर तीनचार तासानी पोट दुखणं व वांति होणे हे जणू ठरलेलेंच ह्या लक्षणाचा त्यास इतका त्रास झाला की, त्यामुळे त्यास त्याचा धंदा सोडून द्यावा लागला.

**निदानः**—अन्नद्रवाख्यशूल हा जेवणापूर्वी, जेवणानतर व जेवण जिरल्यानंतर सारखा चालू असतो. परंतु हा शूल फक्त जेवणानंतर काही वेळाने सुरू होत असे, म्हणून हा अन्नद्रवाख्यशूल नाही असें ठरविलें "भुक्ते जीर्यति यच्छूलं तदेव परिणामजम्।' या वचनाप्रमाणे हा परिणामशूल आहे असें ठरविले व त्यातल्या त्यांत आंबट वात्या, तहान व उष्ण पदार्थाचा अनुपशय ह्या लक्षणावरून पित्तज परिणामशूल आहे असें ठरविलें.

**चिकित्साः**—ह्या ठिकाणी कोष्ठामध्यें पित्ताची वृद्धि अत्यंत प्रमाणांत झालेली होती पित्ताचे अम्लत्व, तीक्ष्णत्व आणि उष्णत्व हे धर्म वाढलेले होते. ह्यामुळें लहान आतड्यात व्रणसुद्धा पडलेले असावेत. कारण व्रणाशिवाय इतका त्रास होणे शक्य नसतें.

त्यामुळें ह्या ठिकाणी चिकित्सा करावयाची म्हणजे तेथें पित्ताचे वाढलेले धर्म कमी करणे व त्याकरिता तेथें माधुर्योत्पादक द्रव्य देणे, तसेच व्रणाचे रोपण करणारी द्रव्यें देणे, ह्याचबरोबर इतके दिवसाच्या विकाराने अशक्त झालेल्या रोग्यास बल्यचिकित्सेचीहि जरुरी होती

सुवर्ण हे बऱ्याच वरच्या दर्जाचे माधुर्योत्पादक ( घृतहेमगुडाक्षोड ' " " द्राक्षा-दिर्मधुरो गण. ।-वा सू. १०) व बल्य असे औषध असल्यामुळें त्याचा एखादा कल्प देण्याचे ठरविलें. कोष्ठामध्ये कार्य करणारा असा सुवर्णकल्प म्हणून सुवर्णपर्पटीची योजना केली सूक्ष्म सुवर्णपर्पटी (१.१००) अशी दोन गुंजा प्रमाणाने देऊन त्याबरोबर पित्ताचे वरील धर्म कमी करणारे ओषध म्हणून कामदुघा २ गुंजा त्याबरोबर दिलें " रोपणे श्लक्ष्ण. " या नियमाप्रमाणे व्रणाचे रोपण करण्याकरिता श्लक्ष्ण गुणाच्या द्रव्याची आवश्यकता असते शुद्ध व्रण हा श्लक्ष्ण असावयास सांगितले आहे (" जिव्हा-प्रभोमदुश्लक्ष्ण व्रण.शुद्धोऽनुपद्रव । " वा. उ २५), तेव्हा त्याकरिता शखजीरक हे त्याचबरोबर ४ गुंजा प्रमाणाने दिलें. दिवसातून दोन वेळा हे मिश्रण दोन्ही समान-काली ( समाने मध्य इष्यते । वा सू. १३) मोरावळा पाकातून दिले. शौचास साफ होण्याकरिता पित्तशामक व शोधक असे स्वादिष्टविरेचन चूर्ण ३ मासे प्रमाणे दररोज रात्री घेण्यास दिलें

अन्न म्हणून त्यास साबुदाण्याची खीर, दूधभात व दूधभाकरी हे खावयास सांगितले पुढे पुढे त्याच्या आर्थिक परिस्थितीनुसार त्यास हाच आहार घेता आला नाही. तथापि त्यास शक्य तो अगदी साधा आहार घेण्यास सांगितले. पोटास जास्त ताण पडेल असा कोणताहि विहार करूं नका असे त्यास सांगितले

वरील औषध १।। महिना चालू होते तितक्या अवधीत हळूहळू सर्व लक्षणे कमी होत चालली प्रथम काहीं दिवसात वात्या होण्याचें बद झालें. परतु पोट दुखणे थोडे असेच मध्यंतरीं त्यास पोटात वात धरण्याचा थोडा त्रास होत असे. ह्याकरिता वरील मिश्रणाबरोबरच काळीमात्रा ( साध्या कोळशाची बारीक व मऊ पूड ) ४ गुंजा दिली त्याने पुढें तो त्रास बद झाला व काहीं दिवसानीं पोट दुखणे बंद झाले. शौचास साफ व्हावयास लागल्यानंतर स्वादिष्ट विरेचन चूर्णाचें प्रमाण कमी करीत करीत पुढें ते बद केलें, तरी शौचास साफ होत असे अशा रीतीने रोग्याच्या सर्व तक्रारी नाहींशा झाल्या औषध सोडण्याचे वेळी " पधरा आणे गुण आला " असे रोगी म्हणाला

पुष्कळ वेळा रोग केवळ ओषधसाध्य असूनहि ह्यावर ऑपरेशन करण्यात येते, तेव्हा औषधसाध्य रोगामध्यें शक्यतो ऑपरेशन टाळता आलें तर बघावें.

---

# (२०७) आंत्रिकानंतरचा उदर

रोगी मुलगा, वय ७. तीन दिवसापासून सारखा ताप. ज्वरोष्मा १०२° व नाडीवेग १०० होता आन्त्रिकाची इतर लक्षणेहि होती.

रोगी अत्यंत गरीब असल्याकारणाने तो एका लहानशा खोलीत चार पाच माणसासह राहात असे व तेथेंच तो निजतहि पण असे. आईबाप मजुरी सोडून त्याच्याजवळ बसतील तर त्या दिवशी खाण्यास मिळण्याची मुद्दा पंचाईत. अशा स्थितीत रोग्याच्या शुश्रूषेकरिता म्हणून त्याची एक म्हातारी आजी मात्र नेहमी जवळ असे. भूत, प्रेत, मंत्र, तत्र इत्यादिकावर घरच्या लोकाचा अत्यंत विश्वास असल्यामुळे ते आन्त्रिकात रोग्यास प्रलाप, तद्रा, ग्रीवाहुडन इत्यादि वातप्रधान लक्षणे पाहून, त्यास भूतबाधा झाली आहे असे समजून त्यावर मला न कळत मंत्र, तंत्र इत्यादि उपचारहि करीत असत. याकरिता एकदोन दिवस ज्वरामध्यें औषधहि बंद करण्यात आले होते. मंत्रतंत्रानीं कांही फायदा होत नाही असें वाटल्याबरोबर पुन्हा औषधाकरिता दवाखान्यात आले व औषधास न येण्याचे दुसरें काहीतरी कारण सागितलें आन्त्रिकाची बहुतेक सर्व लक्षणं अगोदरपासून होती व तेव्हापासून आन्त्रिकाकरिता लक्ष्मीनारायण, सूतशेखर, प्रवाळ, सितोपलादिचूर्ण, गळबेलसत्व इत्यादि ओषधे अवस्थानुसार देण्यात आली पुढे लाप, तद्रा, ग्रीवाहुडन, कास, श्वसनक व कर्णमूलशोथ, इ उपद्रव झाले अगोदर कांही दिवस बद्धकोष्ठ होता, त्या वेळी मात्राबस्ति देण्यात येत असे परंतु शेवटीं अतिसारहि रोग्यास झाला व पधराव्या दिवसाच्या सुमारास नाडीहि अत्यत क्षीण झाली होती. प्लीहा थोड्या प्रमाणांत वाढलेली होती वरील ओषधोपचार व दूध, मोसबीरस, चहा, कॉफी या आहारावर रोगी ठेवण्यात आला एकंदर रोग कष्टसाध्य होता. अठराव्या दिवशी रात्री हृदय अत्यंत क्षीण होऊन, घरच्या लोकानी रोग्याची जवळजवळ आशा सोडली होती तरी काही वेळाने हृदयाची क्रिया सुधरली व बाविसाव्या दिवशी ताप उतरला. जाता जाता एकदोन गोष्टीबद्दल निर्देश केल्यास अप्रासगिक होणार नाही जरी आन्त्रिक सन्निपाताकरिता औषध नाही असें म्हटलें जाते, तरी आन्त्रिकात काही आयुर्वेदीय औषधाचा उपयोग उत्तम रीतीने होतो ही गोष्ट निर्विवाद आहे या रोग्याच्या बाबतीत हृद्य म्हणून लक्ष्मीविलास गुटी, प्रलाप, ग्रीवाहुंडन इत्यादि वातप्रधान लक्षणाकरितां महावातविध्वंसाचा अत्यत उपयोग झाला. सदर रोग्यास दुसऱ्या आठवड्यापासूनच लक्ष्मीविलास गुटी द्यावयास पाहिजे होती तसे करण्यात आलें नाहीं म्हणून हृदयाची क्षीणता व श्वसनाचा जोर अत्यंत वाढला. लक्ष्मीविलास गुटी सुरू केल्याबरोबर हृदयाची क्रिया ताब्यात आली कर्णमूलशोथ, ताप उतरल्यानंतरहि चारपाच दिवसापर्यंत होता बाविसाव्या दिवसानंतर ज्वर संपूर्ण उतरला, तरी रात्री बारीक ताप येत असे व असा क्रम दहाबारा दिवसपर्यंत चालू होता आन्त्रिकानंतर असा जीर्णज्वर काही रोग्यामध्ये आढळून येतो त्याकरिता

प्रवाळ, मृगशृंग, सितोपलादिचूर्ण, नंतर लघुमालिनीवसंत व त्यानंतर मधुमालिनीवसंत इत्यादि औषधें अवस्थानुसार देण्यांत आलीं व नंतर यामुळें ताप आला नाहीं

एक महिन्यांत रोगी अत्यंत क्षीण झाला होता. सामान्यतः आत्रिकातील अल्पाहारादि उपक्रम, अतिसार वगैरे उपद्रव, इत्यादि कारणामुळे रोग्याची स्थिति संगोपनानंतरच्या परिस्थितिप्रमाणे झालेली असते असें म्हटल्यास फारसें वावगें होणार नाहीं अग्नि अत्यंत मंद झालेला असतो, म्हणून त्यानंतर सासर्गिक क्रम ठेवावयास पाहिजे विशेषतः आहार क्रमानें वाढवावयास पाहिजे परंतु हा क्रम पुष्कळ वेळा पाळला जात नाहीं व त्याचा परिणाम म्हणून त्यानंतर अग्निमांद्य, अतिसार, ज्वर इ. विकार होतात या रोगाच्या बाबतीतसुद्धा असाच प्रकार घडला या वेळीं रोग्यास दूध व भाताची कजी देण्यास सांगितलें होतें परंतु यापूर्वीच्या उपक्रमांत झालेला खर्च त्याच्या आर्थिक परिस्थितीच्या मानानें जास्त असल्याकारणानें या वेळीं दूध देणें त्यांना अशक्य वाटून ते केवळ अनुपानाकरितां मात्र दूध घेऊं लागले रोग्यास या वेळीं खा खा सुटल्यामुळें तो मधून मधून चोरून कांहीतरी खात असे रोग्यास पाहण्याकरितां आलेले शेजारचे लोक रोग्याची अत्यंत क्षीण स्थिति पाहून कांहीं पौष्टिक आहार देण्यास उपदेश करीत असत घरच्या लोकांनीहि अन्नपमास पौष्टिक म्हणून पुष्कळ वेळां त्यास दिलें या सर्व गोष्टींचा, ज्या वेळीं रोग्यास उदर होऊन त्याची स्थिति घरच्या माणसांना अत्यंत चिंताजनक वाटूं लागली, तेव्हां सगळा उलगडा झाला तोंपर्यंत घरचे लोक पथ्य सांभाळीत आहोंत असेंच सांगत असत वरील औषधोपक्रम चालू असतांना सुद्धा रोगी कां सुधरत नाहीं याबद्दल नेहमीं शंका येत असे अशा रीतीनें आहारनियंत्रण जसें पाहिजे होतें तसें न केल्यानें त्याचा जो परिणाम व्हावयाचा होता तो झालाच अगोदर अग्निमांद्य होत होत लवकरच अतिसारहि सुरू झाला मग अतिसाराकरितां बिल्व मुस्ता, कुटज इत्यादि पाचक औषधांचा काढा देण्यात आला यामुळें पांचसहा दिवसांत अतिसार बंद झाला खरा, परंतु त्यानंतर मलावरोध होऊं लागला बद्धकोष्ठ दिवसेंदिवस वाढत चालल्यामुळें अष्टांगलवण, नवक्षार, यवानीचूर्ण, पिंपळी, प्लीहोदरारिचूर्ण इत्यादि पाचक, दीपक व अनुलोमक औषधें देण्यात आलीं परंतु त्यापासून कांहीं फायदा होईना अतिसार नुकताच होऊन गेल्याकारणानें विरेचन देणेंहि इष्ट नव्हतें म्हणून कांहीं दिवस वरील औषध चालू ठेवलें पण बद्धकोष्ठ दिवसेंदिवस वाढत जाऊन त्याबरोबर पोट वाढत चाललें व तोंडावर हळूहळू सूजहि दिसूं लागली तेव्हां व्याधीचें उदरामध्यें रूपांतर होऊं लागलें ही गोष्ट लक्षात घेऊन वरील दीपक व अनुलोमक औषधाशिवाय वरचेवर विरेचन देण्यास सुरुवात केली कारण--

दोषातिमात्रोपचयात् स्रोतोमार्गनिरोधनात् ।
सम्भवत्युदरं तस्मान्नित्यमेव विरेचयेत् ॥ च. चि. १३, ६१

विरेचनाकरितां कफनाशकगुटी व नंतर इच्छाभेदी मोठ्या प्रमाणांत देऊनसुद्धा कांहीं होईना मग एरंडेल ५ तोळे देण्यात आलें व त्यामुळें एकदां साधारण शौचास झालें

या रीतीनं विरेचनाच्या उपक्रमात दहावारा दिवस होऊन गेले, परतु त्यापासून काही इष्ट परिणाम होईना याहिपेक्षां मोठी विरेचक औषधे मोठया प्रमाणात देणे इष्ट नव्हतें या अवधीत रोगी अत्यत दुर्बल, हातपाय काडयासारखे झालेले, तोडावर सूज, पोट इतके फुगलेले की, त्यापासून श्वासोच्छ्वासास त्रास होत असे. पोटावरील शिरा स्पष्ट दिसत होत्या व त्यापासून उदराचे लवकरच जलोदरात रूपातर होईल असे वाटूं लागले —

शुष्कवक्त्राः कृशैर्गात्रैराध्मातोदरकुक्षयः ।
प्रनष्टाग्निबलाहाराः सर्वचेष्टास्वनीश्वराः दीनाः ॥

असे वरील चरकातील वर्णन स्पष्टपणे दिसून येत असे परंतु शुष्कवक्त्राच्याऐवजी उपक्लिन्न मुख दिसत असे दोपाच्या दृष्टीनें उदर हा रोग त्रिदोषात्मक आहे या रोग्याच्या बाबतीत कफभूयिष्ठ लक्षणे विशेपत्वाने दिसत होती वर सागितल्याप्रमाणे तेलकटपणा व गुरुत्व इत्यादि लक्षणे स्पष्ट दिसत होती आनूपमास वगैरे कफकारक कारण घडले होते. विरेचनाचा उपयोग न झाल्याने व तो चालू ठेवणे इष्ट नसल्याने शामक चिकित्सा करण्याचे ठरविले. मग उदरावरील व विशेपत कफोदरावरील उपक्रमाबद्दलचे—

(१) दोषै कुक्षौ हि सपूर्णे वह्निर्मन्दत्वमृच्छति ।
तस्माद्योज्यानि भोज्यानि दीपनानि लघूनि च ।। च चि १३–९६

(२) स्निग्ध स्विन्नं विशुद्ध तु कफोदरिणमातुरम ।
संसर्जयेत्कटुक्षारयुक्तैरन्नै कफापहै. । च चि १३–७२

(३) गोमूत्रारिष्टपानैश्च चूर्णायस्कृतिभिस्तथा ।
सक्षारैस्तैलपानैश्च शमयेत्तु कफोदरम ॥ च चि १३–७३

(४) गोमूत्रेणाभया वा प्रयोजयेत ।

(५) शिलाजतुविधानेन गुग्गुलु वा प्रयोजयेत् ॥ च. चि १५३

वरील सूत्रे लक्षात घेऊन खालीलप्रमाणे औपधियोजना केली —

सकाळी—यवानी चूर्ण ६ गुजा + विश्वभेषज ६ गुजा + सैंधव ४ गुजा, एक पुडी दोन तोळे गोमूत्रातून

रात्री—आरोग्यवर्धिनी २ गुंजा ( कोष्ठावर कार्य करणारा गुग्गुलुशिलाजतुकल्प ) + गोमूत्रभावित हरीतकी ४ गुजा + नवक्षार २ गुजा, एक पुडी गरम पाण्यातून आहार केवळ ताकभात

अशी चिकित्सा केल्यानंतर दुसऱ्या दिवसापासूनच रोज तीनचार जुलाब होऊं लागले अगोदर मोठमोठया विरेचक औषधानी जें साध्य झाले नाही ते वरील योगामुळे साधले

गेले यात विशेषत विश्वभेषज व गोमूत्र यांचा संयोग विरेक करून दोष बाहेर काढून टाकण्याच्या दृष्टीने अत्यंत प्रभावी ठरला. ही गोष्ट येथें नमूद करण्यासारखी आहे. अगोदर दोनतीन दिवस इतर औषधांबरोबर गोमूत्र दिलें असतानासुद्धा इष्ट परिणाम घडून आला नाहीं.

वरील योजनेनें हळूहळू रोग्याच्या पोटाची फुगवटी व तोंडावरील सूज कमी होऊन त्यास अगदि हलके वाटूं लागलें दोषांचें निर्हरण योग्य रीतीनें होऊं लागलें व भूक पूर्वीप्रमाणें बरोबर लागूं लागली पंधरा दिवसांत सर्व लक्षणें कमी होऊन रोगी पूर्ण बरा झाला सध्या कोणतीहि तक्रार नाहीं.

---

# (२०८) क्षतविसर्प

( जखमेमुळें उत्पन्न झालेली धावरी सूज Erysipelas )

रोगी स्त्री, वय ३२ वर्षे उजव्या कानाच्या मागल्या बाजूस विद्रधि होऊन पिकून तो फुटला नंतर चेहेऱ्याच्या उजव्या बाजूवर लालसर सूज वाढूं लागली. दोन-तीन दिवसांनी व्रणाजवळच आणखी एक विद्रधि उत्पन्न झाला. त्यामुळें थंडीताप येऊं लागला. त्याबरोबर टोंचे दुखणें हें विशेष लक्षण होतें सुजेस स्पर्शगम्य कठीणपणा होता व त्यावर विस्फोट होते पाश्चात्य निदान पद्धतीनुसार हा Erysipelas होता.

औषधोपचार—यावर रक्तगत दोषाचे शमनाकरिता प्रथम दारुहळद ६ मासे + त्रिफळा ६ मासे + निंबसाल ६ मासे + पटोल पंचांग ६ मासे + मुस्ता ६ मासे याचा काढा देण्यात आला व पुढे शोधनार्थ त्यास त्रायमाण ३ मासे, कुटकी २ मासे व यष्टिमधु २ मासे याची जोड देण्यात आली यामुळें शौचास २-३ वेळ साफ झालें

याशिवाय, सुवर्णराजवंगेश्वर १ गुंज + प्रवाळभस्म ( चंद्रपुटी ) १ गुंज + गुळवेलसत्व २ गुंजा, २ पुड्या सकाळ-सायंकाळ मधातून देण्यात येत होत्या.

तथापि या उपचारानें विसर्पात विशेष फरक पडला नाही या वेळेपर्यंत विसर्पानें चेहेऱ्याचा डावा भागहि व्यापला होता. म्हणून अभ्यंतर औषधियोजना चालू ठेवून शिवाय रक्तमोक्षण करण्याचे ठरविलें व कपाळावर व गालावर ४ जळवा लावल्या त्यानें सुजेवर बराच परिणाम झालेला दिसून आला, म्हणून पुनः तिसरे दिवशी ५ जळवा लावल्या शिवाय रोग्यास लंघन करण्यास सांगितलें ( आदौ एव विसर्पेषु हितं लंघन-रूक्षणम् ) पोटातून वरील कषाय चालू होताच या सर्वांचा इष्ट परिणाम होऊन विसर्प साफ बरा झाला व एकतः सर्व कर्माणि रक्तमोक्षणमेकतः। हे विसर्पचिकित्सेतील तत्त्व स्पष्टपणें अनुभवास आलें

---

## (२०९) जेवतां जेवतां वांति ( Hysteria [1] )

रोगी, स्त्री, वय वर्षे २० प्रकृति सुदृढ रोगाचा पूर्वेतिहास—एक वर्षापूर्वी मासिक ऋतुकाली पोट दुखूं लागले. पोटात अन्न ठरेनासे झाले काही खाल्ले, नव्हे खाता खाताच वांति होई व पुन काही खाण्याची इच्छाच होत नसे. दोन-दोन दिवस खाऊं नयेसे वाटे ओटीपोट, कबर, माडया यांचे दुखणे चालूच त्यावर सूतशेखर, सुवर्ण-माक्षिक, कामदुधा, चंद्रप्रभा आदि अनेक काही वातगमन व काही वातिहरण औषधे दिली गेली तज्ज्ञ पदवीधर डॉक्टराचाहि औषधोपचार करविण्यात आला त्यानी दूध, मोसंबीरस या आहारावर ठेवले ग्लूकोज घ्यावयास सांगितला. इंग्रजी औषधापैकीं Cal-Bis-Ma या औषधाने काही दिवस थोडें बरे वाटले. पण पुन त्या औषधासहि दुखणे दाद देईनासे झाले. काय दुखणे आहे कळत नाही असे त्यांचे मत पडले

दोन महिने असा काल लोटल्यानंतर श्रावणात बाई एका मोठ्या शहरी राहावयास गेल्या तेथें तीन अनुभविक तज्ज्ञ डॉक्टराना प्रकृति दाखविली व त्यानी दिलेली औषधें तीन महिने घेतली, पण काही उपयोग झाला नाही या रोगाचे नाव त्यानी हिस्टेरिया ( Hysteria [2] ) ठेवले व आपोआप हे दुखणे कालांतराने जाईल, तिकडे लक्ष देण्याचें कारण नाही असे शेवटी सांगितले

विकाराची तीन लक्षणे —पोट, कबर दुखणे, जेवतां जेवतां वांति या दोन लक्षणाबरोबरच असलेले तिसरें लक्षण म्हणजे सबंध रात्रभर खोकला या खोकल्या-मुळें बसून राहावे लागले अल्पहि बेडका पडत नसे खोकल्याच्या स्वरूपावरून हा " वातज " असावा असे वाटे.

गेल्या दिपवाळीत रोगी पाहण्यात आला, त्या वेळी वरील तीनहि लक्षणे चालू होती विकाराचे स्वरूप लक्षपूर्वक पाहण्यासारखे होते रोगी जेवावयास बसला की थोडा वेळ जेवण नीट चाले, पण एकदम वांतीचा वेग आला की उठून मोरींत पळावे लागे पोट वगैरे काही न दुखता व वांतीच्या वेगाचा विशेष आवाज, त्रास वगैरे काहीच न होता अगदी सहज वांति होऊन सर्व अन्न आंबट अगर पिवळे न होता तसेच पडून जाई व पुन दोन-दोन दिवस खाण्यावर वासना होत नसे पोटात काही घेतले नाही, तर वांति बिलकूल होत नसे खोकला दिवसा थोडा असे, पण रात्र झाली की सुरू होइ तो सकाळपर्यंत चाले एकदाहि कफ पडत नसे. सर्व रात्र जागून व बसून काढावी लागे खोकल्याचा आवाज फार दूरवर ऐकूं येत असे

चिकित्सा —आतापर्यंत बऱ्याच डॉक्टर, वैद्याची औषधे रोग्याने घेतली असल्यामुळें या विकारावरील नित्याची औषधें न देता

परिशुष्कं प्रियं सात्म्यं अन्नं लघु च शस्यते ।

या छर्दि चिकित्सेतील वचनाचा अवलंब करण्याचे ठरविले व दूध, मोसंबीरस वगैरे सर्व

द्रव आहार, इतकेच नव्हे, तर आर्द्र आहारसुद्धा बंद केला. रोग्यास गव्हाचें सात्म्य होतें म्हणून खाकऱ्या* करून खाण्यास सांगितलें व रोग्याचें पाणी पिणेंहि कांही दिवस बंद केलें (तर्प्णलंघन). पुढे पुढे त्यास तिखटाचा पदार्थ खाण्याची इच्छा होऊं लागली म्हणून फुलविलेल्या पोह्यांचा तिखट-खारट चिवडा तयार करून तो खाण्यास दिला.

या परिशुष्क, प्रिय, सात्म्य, लघु आहारानें रोग्याची वांति होण्याचें थांबलें व अन्नपचन होऊं लागलें. यामुळें रोग्याचा विकार शरीरांत साठणाऱ्या द्रवांश( कफा )पासून असावा हें लक्षांत आलें. वांतीचें एकंदर स्वरूप, काल यावरूनहि हा विकार "कफज" होता असेंच प्रत्ययास आलें.

रोग्याच्या खोकल्याकरिता ( व वांतीकरितासुद्धा ) मोराचे ५० पख अर्धवट जाळून त्याची तयार केलेली काळी राख ( मषी ) प्रत्येक वेळीं १ मासा या प्रमाणांत दिवसा-तून ३ वेळ मधांत चाटण्यास दिली. वरील आहार व हें औषध या उपायांनीं १५ दिवसांत खोकला, वांति हे विकार नाहींसे झाले व पोट दुखण्याचा त्रास कमी झाला.

मोराच्या पिसाच्या काळ्या राखेचा हा गुण अष्टांगहृदयांत कफकास-चिकित्सेंत वर्णिलेला आहे. ( शिखिकुक्कुटपिच्छानां मषी ... मधुद्रवाः कफकासहरा लेहा त्रय ।) मोराच्या पिसाऐवजी कोंबड्याचीं पिसें सुद्धा या कामीं चालतात. या राखेनें सूक्ष्म स्रोतोगत कफ नाहींसा होऊन खोकला जातो. खोकल्याच्या कोरडेपणामुळें वातज कासाप्रमाणें वाटणारा वरील रोग्याचा खोकला "कफज"च होता असें यावरून सिद्ध होतें.

जेवतां जेवतां होणाऱ्या वांतीसारखीच एक अवस्था श्रीमत् वाग्भटाचार्यांनीं उत्तर-स्थानांत बालरोग-प्रतिषेध अध्यायांत ( अ. हृ. उत्तर अ. २।६८ ) निवेदन केली आहे. "लहान मूल दूध पितां पितां ओकतें (पीतं पीतं वमति यः स्तन्यं ) त्यावर उपाय या ठिकाणीं सांगितले आहेत. या सर्व त्रिकटु ( सुंठ, मिरें, पिंपळी ), पंचकोल, वावडिंग, पंचलवण, इत्यादि तिखट, खारट औषधांचा उपयोग पाहतां हा विकार कफज असल्याची खात्री पटते. तेथेंहि या वांतीवर मोराच्या चर्माच्या या पिसाच्या काळ्या राखेचें (मषी) चाटण देण्यास सांगण्यांत आलें आहे.

मोराच्या पिसाचें आधुनिक रासायनिक दृष्ट्या परीक्षण केलें असतां त्यांत लोह, खट (कॅल्शियम), पोटॅशियम, सोडियम्, मॅग्नेशियम् तसेंच क्लोराईड्स्, सल्फेट्स्, कार्बोनेट्स्, फास्फेट्स् व मोठ्या प्रमाणांत सल्फाइड्स् आहेत असें कळतें. त्यांत ताम्र

* प्रथम कणिकेचे पातळ फुलके करावयाचे व त्या फुलक्याचा एक गठ्ठा तापलेल्या तव्यावर घासून घासून त्यांतील सर्व जलांश निघून जाईल इतकें खरपूस भाजावयाचे. या प्रकाराला गुजराथी लोक खाकरी असें म्हणतात. अशा प्रकारें तयार करून ठेवलेली कुरकुरीत पोळी १०-१५ दिवस (महिनाभरसुद्धां) चांगली टिकते व नुसतीसुद्धा खाण्यास चांगली लागते.

आहे की नाही याविषयी संशय आहे. त्यामुळे या मपीतील कोणत्या द्रव्यामुळें हें कार्य घडून येते हे सागणे आज कठीण आहे.

जवळ जवळ एक महिनाभर रोग्याने हें पथ्य केले. तहान लागेपर्यंत द्रव द्रव्य दिलेच नाही व प्रथम प्रथम ताकाची आले घातलेली पातळ कढीच पिण्यास दिली. पुढें तापविलेले व त्यांत त्रिकटू चूर्ण (अत्यंत थोडें) टाकलेले पाणी दिले रोजचा आहार सुरु करण्यापूर्वी दोन आठवडे पाणी फोडणीस टाकून तिखट घालून ( खिचडी-प्रमाणे ) शिजविलेला भात खाण्यास दिला कोणताहि केवळ मधुर पदार्थ खाण्याचे टाळण्यास सागितलें

थोडक्यात सागावयाचे म्हणजे या विकाराच्या औषधांची विशेष चिकित्सा न करता युक्तिपूर्वक खानपानाची कफनाशक योजना केली व त्यामुळें चिकित्सेत यश आले

---

## (२१०) नेत्रव्रण (ल्यूकोमा)

रोगी पुरुष, वय वर्षे २५, मराठा पूर्वेतिहास—धंदा शेतीचा. एके दिवशी बैलास चाबुक मारीत असता चुकून तो त्याच्या उजव्या डोळयास लागला त्यामुळे डोळयास लाली आली.

**लक्षणे.**—रोगी डोळयास कमी दिसूं लागले म्हणून उपचारार्थ आला उजव्या डोळयात लाली, पाणी गळणे, बाहुलीच्यावर पाढरा डाग, उजव्या डोळयास कमी दिसणे ही लक्षणे होती.

**उपचार**—रोज तीन वेळा ( सकाळी, दुपारी, सध्याकाळी ) दुधीच्या दुधाचे थेंब डोळयात घालण्यास रोग्यास सागितले सात-आठ दिवसात डोळयातील लाली व पाणी गळणे बंद झाले पण दृष्टीत काही फरक झाला नाही. पुढील पंधरा दिवसात बुब्बुला-वरील पाढरा डाग कमी कमी होत जाऊन रोग्यास चागले दिसूं लागले

---

## (२११) उन्माद्

रोगी स्त्री, वय वर्षे २०, ब्राह्मण

**कारण**—बाळतपणानंतर मुलाची प्रकृति बिघडल्यामुळे मनावर परिणाम होऊन एकदम पुढील लक्षणास सुरुवात झाली

**लक्षणे**:—सारखी वडबड, एकाएकी रडणे, भिणे ही लक्षणे प्रथम सुरु झाली. यावर उपचार चालू होते दोन-तीन महिन्यांनी ही सर्व लक्षणे कमी झाली, पण बोलणे अजिबात बंद झाले प्रश्न केल्यास उत्तर मानेच्या हालचालीवरून देत असे. अशक्तपणा फार आलेला होता हातापायास किंचित् कंप, चेहरा निस्तेज, उदास, सारखी अनिमेष दृष्टि, पापण्याची हालचाल कमी, जेवण्यास जबरीने बसवावे लागत होते व दुसऱ्यानी जेवू घालावे लागत असे.

**चिकित्सा**:—वातदोषावर शामक अशी चिकित्सा करणे अवश्य आहे बृहण चिकित्सेने वाताचे शमन होते ( बृहण शमनं त्वेव वायो पित्तानिलस्य च ) म्हणून रौप्य भस्माची योजना केली. रौप्यभस्म प्रत्येक वेळी ½ गुंज प्रमाणाने दिवसातून तीन वेळा घेण्यास दिले त्याचा परिणाम होऊन पंधरा दिवसानंतर रोग्याच्या तोंडून एखादे वेळी काहीं शब्द बाहेर पडूं लागले, म्हणून हीच योजना चालू ठेवली पुन्हा पंधरा दिवसानी रोग्याने आपलें नाव लिहून दाखविले. या वेळी हातास कंप आला नाही. घरच्या मंडळीनी विचारलेल्या प्रश्नाची उत्तरेहि रोग्याकडून येऊ लागली चेहऱ्यावरील फिकटपणा व उदासीनता कमी झाली होती नतर रौप्यभस्माचे प्रमाण एक वेळच ¼ गुंज केले व तेहि सकाळी एकच वेळ दिले

याच्याच जोडीला आयुर्वेदातील प्रसिद्ध बुद्धिवर्धक, स्मृतिप्रद अशी ब्राम्ही ही वनस्पति देण्यास सुरुवात केली सायरप ब्राह्मी हा कल्प ½ चमचा व पाणी ४ चमचे घालून घेण्यास दिले हे दुपारी एक वेळ व संध्याकाळी एक वेळ याप्रमाणे एक महिना चालू आहे यानी रोग्याच्या बोलण्यास सुरुवात झाली ती जेवण स्वत करूं लागली परगावाहून भेटीस आलेल्या पाहुण्याना तिकडील क्षेम-समाचाराची चौकशी करूं लागली परंतु थोड्या कारणानी राग येऊन बोलणे मधून मधून बंद करीत असे व हातापायास कंप येत असे म्हणून औषधियोजना हीच २-३ महिने चालू ठेवली. हल्ली मात्र हंसणे, बोलणे वगैरे सर्व स्वस्थ स्थितीतील कार्यक्रम चालू आहेत व प्रकृतीहि चांगली सुधरली आहे

---

## (२१२) आंत्रिकोत्तर उन्माद (वेडा मधुरा ?)

रोगी, मुलगा, ब्राह्मण, विद्यार्थी वय १२ वर्षे पित्तविकृति, रोगकाल वर्षाऋतु, गावात आंत्रिक सन्निपाताची साथ चालू

**रोगाचा इतिहास**—ज्वर आल्यानतर द्रवाहार, पूर्ण विश्रांति, काळजीपूर्वक शुश्रूषा व सुवर्णसूतशेखर, लक्ष्मीविलासगुटी इत्यादि योग्य औषधे यानी २१ व्या दिवशी ताप

उतरला त्यानंतर दुसरे दिवशी दुपारी बारा वाजता रोग्याची प्रकृति एकदम बिघडली रोग्यानें कांही विशिष्ट खाद्य ( दूध, भात वगैरे ) पदार्थाबद्दल हट्ट धरून किचाळया मारण्यास सुरुवात केली.

अंगात ज्वर नव्हता रोगी पूर्ण शुद्धीवर असून त्याला मनुष्याची ओळख पटत होती. रोग्याचा हट्ट लक्षांत घेऊन त्यानें मागितलेले सर्व पदार्थ त्याला आणून दिले परंतु त्यांपैकी एकहि पदार्थ न खाता व त्याच्यासमोर ते पदार्थ असता पुन पुनः त्याच पदार्थाच्या नावानें किचाळून रडण्यास प्रारंभ केला काही केल्या समजूत पटेना.

पुन. तिसरे दिवशी दुपारी १२ वाजता किंचाळी मारून हट्ट धरला रोगी पाहता त्यास ज्वर नव्हता, बेशुद्धि नव्हती परंतु तगमग, डोळे व चेहरा लाल, कासावीस ( घबराट ), सर्वांगास घाम, पोटास किंचित् फुगारा ही लक्षणें होती किंचाळया फोडणें चालूच होते रोग्यास रोज मलमूत्रप्रवृत्ति सम्यक् होत होती.

वरील बहुतेक सर्व लक्षणे पित्तवृद्धिनिदर्शक, रोग्याची मलप्रकृति पित्तज, रोगोद्भव काल ( दुपारचा ) हाहि पित्तप्रकोपाचा, यामुळे हा विकार केवळ पित्तदोषज आहे हे स्पष्ट झालें असलें, तरी असंबद्ध किंचाळया मारणे हे लक्षण वातदोषाचा संसर्ग दर्शविणारें होतें. अशा प्रकारे सर्व लक्षणाची व रोगकारक कालाची दोषाच्या कोष्टकात व्यवस्था लावल्यामुळें चिकित्सा करणे सोईचे झालें

**चिकित्सा**—रक्तधातुगत पित्तवृद्धि कमी करण्याच्या दृष्टीनें प्रभावी* असे "चन्द्रकला' हे औषध या ठिकाणी देण्याचें ठरविले व त्याला वातशामक अनुपान म्हणून माक्याच्या रसाची योजना केली. माका ही वनस्पति कोष्ठस्थ सेंद्रिय विषारनाशक अशी आहे

वरील औषध १–२ तास चाटण स्वरूपांत देताच दुपारी ३ वाजेपर्यंत सर्व लक्षणे कमी होऊन रोगी आनंदांत दिसूं लागला.

दुसरे दिवशी हेंच औषध पित्तकालापूर्वीच ( सकाळी ८ वाजता ) दिलें सूक्ष्म चन्द्रकला २ गुंजा + माक्याचा रस $\frac{1}{2}$ तोळा + मोरावळयाचा पाक $\frac{1}{2}$ तोळा एकत्र करून ११ वाजेपर्यंत वारंवार चाटविण्यास सांगितलें

गेल्या दोन दिवसाप्रमाणे आजहि १२ वाजता त्रास होतो की काय अशी धास्ती घरातील मंडळीस वाटत होती, पण तीन वाजून गेले तरी कोणतेच लक्षण उद्भवलें नाही दोषप्रकोपकालाच्या आधीच औषधयोजना झाल्यामुळे पुढील सर्व आपत्ति टळली व रोगी रोगमुक्त झाला

---

*सर्वपित्तगदध्वंसी वातपित्तगदापह । 
अंतर्बाह्यमहादाहवि-वसनमहाघन ।

## (२१३) चातुर्थिक मूर्च्छा ( Hysteria )

रोगी, स्त्री, ब्राह्मण, वय १७ वर्षे, साधारण स्थूल प्रकृति ६ महिन्यापूर्वी लग्न श्रावण महिन्यापासून मूर्च्छेचे वेग ( fits ) २ महिने सुरु वेग येण्यापूर्वी रोग्यास कळे प्रथम अग जड पडे, हंसणे, बडबडणें सुरू होई, मात्र तोंडास फेंस येणे व झटके येणे नसे नतर दातखिळी बसे. अमोनिया हुंगल्याने अगर दातास गुळाचा चटका दिल्याने शुद्धीवर येई, तथापि त्यानतर सुद्धा २-३ तास अग जड असे व झोप लागल्याप्रमाणे रोगी पडून राही मलावरोधाची विशेष तकार, शौचास दोन दिवस आड साधारण होई पोट दुखे, हातापायास मुग्या, मूर्च्छेचा वेग ५ तास टिके, ज्वर नसे, सर्वांग दुखे. स्मृतिसागर, महावातविध्वस, इच्छाभेदी, कृमिकुठार, विडगवस्ति याचा उपशय झाला नाहीं

रोगाचा विशेष—चातुर्थिक ज्वराप्रमाणे हा मूर्च्छेचा वेग न चुकता दर चौथ्या दिवशीं (म्हणजे आज वेग आल्यास मध्ये दोन दिवस चागले जाऊन पुन तिसऱ्या दिवशी वेग यावयाचा) ठराविक वेळी (दुपारी १२॥ वाजता) येई एक वर्षापूर्वी २१ दिवसाचा सततज्वर (त्यात तीव्र मलावरोध होताच), नतर १५ दिवस तृतीयक ज्वर आला होता माहेर साखर-कारखान्याचे गावीं होतें ( ऊसलागवटीमुळे हिंवतापाचा सभव अधिक ) सासरी अगर माहेरी मानसदुष्टि होण्यासारखे कांहीच कारण घडलें नव्हते दोष शारीर ( आगन्तु ? ) होते

निदान—या मूर्च्छेला हिंवतापज शेषदोष कारण असावा व मलावरोधाने त्याला अधिक बल मिळत असावे असे निदान करून (१) अमृतारिष्ट २-२ तोळे दोनहि वेळा जेवणानंतर, (२) हिंवतापगुटी (यात कोयनेल असते) २-२ गोळया जेवणापूर्वी अर्धा तास, (३) अश्वकचुकी २ गोळया रात्री झोपताना गरम पाण्याबरोबर, (४) बाभळीच्या पाल्याचा वास दिवसभर मधून मधून अशी योजना केली यानें पहिलीच पाळी टळली ७ व्या दिवशी किंचित् अग जड पडलें एक महिन्यात विकार नाहींसा झाला

पुढे पंधरा दिवस मलावरोध दूर करण्याकरिता अभयारिष्ट २-२ तोळे अपानकाली व मज्जागत ज्वरदोषहरणाकरिता व मज्जेस बल देण्याकरिता गुळवेल, आवळकाठी, २-३ मासे व बदाम बिया २ ( वाटून ) याचा हिम सकाळी घेण्याकरिता दिला व मलावरोधाची संवय घालविण्याकरिता एरंडमूळ, बहावा, पटोल व गुळवेल याचा सतैल बस्ति एक दिवस आड घेण्यास सांगितलें

---

# (२१४) मूत्रशर्करा, मानसदुष्टि व कंपवात

दवाखान्यात आल्यावरोबर " डॉक्टरसाहेब, माझे डोकें फिरलें आहे हो, काही औषध द्या," असे रोगी म्हणूं लागला

" फिरलेल्या डोक्यावर कांही औषध नाही, तुम्ही आपली हकीकत नीट सांगत असाल तर काही उपचार करता येईल," असें सांगताच रोग्यानें पुढील हकीकत सागण्यास सुरुवात केली

" डॉक्टरसाहेब, माझे पोट फुगले आहे बघा, माझ्या हातापायात बिलकूल जीव नाही भाडेंदेखील उचलता येत नाही " तो असें बोलतो न बोलतो तोच खुर्चीवर बसल्याबसल्याच **त्याची एक मांडी थरथर कापू लागली** " हे पाहा, डॉक्टरसाहेब, जरा बसले की माड्या अशा कापूं लागतात त्यामुळे मला बसणे अगर चालणें देखील कठीण जाते "

रोगी दिसावयास धट्टाकट्टा दिसत असून त्याची ही अवस्था पाहून पूर्व इतिहास विचारला, तेव्हा तो म्हणाला—

" १२ वर्षापूर्वी मी चांगला २-३ महिने इस्पितळात पडून होतो त्या वेळी असेच पोट फुगे, **लघ्वींतून दाळीएवढे** वाळूसारखे खडे पडत. पुढे ते बंद झाले डॉक्टर आणखी २-३ महिने राहा म्हणाले. परतु मी निघून आलो पुढे माझी एक एकुलतीच मुलगी वारली मधून मधून मला तिची आठवण होते व आपोआप डोळ्यातून पाणी गळूं लागते नंतर मग हातापायांतील जीव नाहीसा होतो व डोके नुसते फिरून जाते काही सुचत नाही अगदी वेड्यासारखें होतें आतांहि तसेच होत आहे दोन-तीन दिवस झाले पोट फुगलें आहे मला तर वाटतें पूर्वीसारखें खडे पडतात की काय देव जाणे "

रोग्याची एकंदर हकीकत ऐकता, मनोदोष व त्यापासून जडलेला वातविकार, शिवाय मूत्रशर्करेचा इतिहास व अपानावरोधाने फुगलेले पोट याचा विचार करून (१) **माष-सैंधव सिद्ध तैल** अंगास, विशेषत हातापायास चोळून गरम पाण्याने स्नान करण्यास सागितले व (२) पोटातून **हिंगाष्टक चूर्ण** १ मासा २ पुड्या दोन्ही वेळा अपानकाली (भोजनापूर्वी) घेण्यासाठी. (३) **गोक्षुरादि गुग्गुळ** ३ गुंजा ३ पुड्या सकाळी, दुपारी, रात्री पुढील पातळ औषधाबरोवर (४) **गोखरूचा अर्क** -।॥- तोळा, दशमूलारिष्ट १। तोळा, **शुद्धोदक** ८ तोळे, ३ वेळा पुडीनतर घेण्यासाठी अशी योजना केली. औषध ३ दिवसाचें दिलें असूनहि रोगी दुसरे दिवशीच संध्याकाळी आला **लघ्वींतून बारीक डाळीएवढे तुरीएवढे जवळ जवळ १०-१५ खडे पडलेले तो घेऊन आला होता.** त्यागिवाय आणखी पुष्कळ बारीक रेती पडल्याचे त्याने सागितले

त्याला तेंच औषध चालू ठेवण्यास सागितले तिसरे दिवशी **लहान बोराच्या बीएवढा आणखी एक खडा बाहेर आला** तो मात्र चिमट्याने ओढून काढावा लागला

दशमुळें, स्नेह, स्वेद व गुग्गुळ यामुळें वातलक्षणेहि हळूहळू कमी होऊं लागलीं होती हातात भाडें वगैरे धरता येऊं लागलें टोंकेंहि ताळयावर आलें

यानतर गोक्षुरादि गुग्गुळास, उन्हाळ्याचे औषध १ गुंज + सारिवा चूर्ण ४ गु. + चंद्रप्रभा २ गु याची जोड दिली व पूर्वीचें पातळ औषधहि चालू होतेंच हीं सर्व औषधें १५ दिवस दिलीं यानें सर्व वातलक्षणें कमी झालीं व रोग्याम वरं वाटूं लागलं

रोग्याची मूत्रशर्करानिर्माणप्रवृत्ति कमी व्हावी व वातावरहि अनुकूल कार्य व्हावें यासाठी पाषाणभेद, गोखरूं, सारिवा, गुळवेळ प्रत्येकी ३-३ मासे याचा काढा, तूप, चंद्रप्रभा व उन्हाळ्याचें औषध १-१ गुंज घालून सकाळी घेण्यास सांगितले आहे शिवाय दोन्ही वेळ जेवणानतर दशमूलारिष्ट व रास्नादि काढा याचें ½ तोळा मिश्रण घेण्याकरिता दिले आहे

तैलाभ्यंग व उष्णोदक स्नान चालू आहेच सदर रोग्याची वातलक्षणें, मानसलक्षणें व सिकतालक्षणे स्वतत्र असतांहि त्या सर्वावर एकच औषधियोजना उपयोगीं पडली

---

## (२१५) बालक—स्तनशोथ

एक लहान बालक वय १ महिना जन्मल्यानतर ५ व्या दिवसापासून त्याचे दोन्ही स्तन गाठाळले व ते दावले असता त्यातून चिकट पदार्थ निघे. तो पदार्थ निघून गेल्यामुळें स्तन जरा लहान होत, म्हणून दर २-३ दिवसानी ते पिळण्यात येत मुलाचे वडील डॉक्टर असल्यामुळे त्यांनी त्यावर बेलाडोनाच्या पट्या व इतर काही इंग्रजी औषधें लावून पाहिली, पण त्याचा काहीच उपयोग झाला नाही त्या स्तनशोथामुळें मुलास ताप येत असे व त्याकरिता पोटातून "यू क्विनाईन" चालू होते एक महिनाभर या प्रकारे अंतर्बाह्य औषधोपचार होऊनहि फरक पडला नाही म्हणून आयुर्वेदीय उपाय सुरू करण्यात आले

**चिकित्सा**—स्तनातून स्रवणारा पाढरा चिकट पदार्थ हा रसधातु समजून व रसधातूंचें नीट पचन न झाल्यामुळे, पुढील धातु नीट बनत नसल्यामुळें बालक सुकत चाललें आहे असें निदान करुन, स्तन्यग्रंथि व रसधातु यावर इष्ट कार्य घडवून आणण्याकरिता "जसद तुवर। तिक्त शीतल कफपित्तनुत्" हे जसद भस्माचे गुण ध्यानी आणून जसदभस्म ⅛ गुंज + प्रवाळभस्म (चंद्रपुटी) ⅛ गुंज + गुळवेलसत्व १ गुंज, ३

पुडया मधात, सकाळी, दुपारी व सायंकाळी घावयास सागितल्या व स्तनावर वरुन **ग्रथीभेदन लेप*** पाण्यांत उगाळून लावण्याकरिता दिला

या अंतर्बाह्य उपचाराने ८ दिवसात उजव्या स्तनाची सूज हळूहळू ओसरू लागली व आणखी ४-५ दिवसात पूर्ण नाहीशी झाली पुढील ७-८ दिवसात दुसऱ्या स्तनाचीहि सूज अशाच प्रकारे कमी झाली.

अशा रीतीनें विकार बरा झाल्यानतर मुलाचे कार्श्य दूर करण्याकरिता बल्य म्हणून मुलाचे वडिलानी मत्स्यतैल (कॉडलिव्हर ऑइल) सुरु केलें

---

# (२१६) व्हायटॅमिन्सचें अजीर्ण

रोगी, एक मुबईकर गृहस्थ, साखरेच्या कारखान्यात हुद्देदार "फळात व्हायटमिन्स असतात, फळे जेवणानतर अवश्य खावीत," अशा समजुतीनें रोज दुपारी व रात्री जेवणानंतर २-२ हापूस आंबे खात एक दिवस आबरसपुरीचे आग्रहाचे जेवण झाले. त्याने अजीर्ण झाले अर्धवट, अडखळत वात्या होत होत्या, शौचास होईना व चांगली वातिहि होईना उम्हासे येत होते, त्याचा जीव घाबरत होता म्हणून १ गुज **कामदुधा मधातून** चाटविण्यास दिली त्यामुळे स्वस्थता लाभली व वातिहि झाली नाही नंतर वस्ति ( एनिमा ) दिला त्याने खूप मळ निघून गेला. तथापि पोट हलके वाटेना म्हणून मीठपाणी पाजण्यात आले त्याने फार मोठी वाति झाली पुन्हा थोडे पाणी पाजून आणखी एक छोटीशी वाति झाली

आतां गृहस्थ थकून गळून गेले असल्यामुळे त्यास **सुवर्णमाक्षिक भस्म** १ गुज + **सुठ** २ गुजा मोरावळ्यातून चाटविलें. त्याने त्यास ४-५ तास झोप लागली पहाटे ५ वाजता थोडी कासावीस होऊ लागली, म्हणून त्या गृहस्थानी कॉफी घेतली त्यानंतर हुषारी वाटू लागली

---

* दन्ती चित्रकमूलत्वक् सौधार्कपयसी गुड. ।
भल्लातकास्थि कासीसं लेपो भिन्द्यात् शिलामपि ॥
— अष्टागहृदय अ १८-२६

## (२१७) संग्रहणी (बालरोग)

रोगी, मुलगी, ७-८ वर्षे वयाची अगदी फिक्कट चेहेरा, डोळे खोल गेलेले, ताड गातून आलेले व पाढरेफटक अन्नावर इच्छा नाही, मधून मधून मोठाले जुलाब, तर केव्ही कधी वरचेवर शौचास जाणे लागे, काही वेळ खाल्लेले अन्नच पडे पोटात वारा धरलेला, झोप अस्वस्थ, डोक्याचे केस गेलेले, जीभ पातळ, चापट, चिकट, गुळगुळीत फिक्कट अशी स्थिति होती

या मुलीस रसयोगसागरातील ( न ३४० ) सर्वांगसुंदर हें औषध प्रत्येक वेळी ॥- गुंजप्रमाणे तीन वेळ मधातून घेण्यासाठी दिले सात दिवसांत मुलगी उत्तम बरी झाली, व पुन तो आजार तिला कधीच उद्‌भवला नाही

सर्वांगसुंदराची कृति.—शुद्ध पारा व गधक १-१ भाग, टाकणखाराची लाही २ भाग, मौक्तिकभस्म, प्रवाळभस्म व शखभस्म १-१ भाग, सुवर्णभस्म ½ भाग या सर्व औषधांची कज्जली करून लिंबाच्या रसात २ दिवस खल करावा तो खललेला गोळा ३-४ पदरी मलमलीच्या कापडामध्ये गुडाळून परळात ठेवून, वर मातकापड करून, वाळल्यावर गुजपुट द्यावे. स्वागशीत झाल्यावर आतील औषध काढून घेऊन त्यात ½ भाग (सुवर्णभस्माइतकेच) लोहभस्म, ¼ भाग (लोहभस्माच्या ½) शुद्ध हिंगुळ मिसळून २ दिवस खलावे नतर बाटलीत भरून ठेवावे प्रमाण ॥- ते १ गु व अनुपान मध-पिंपळी, तूप पानाचा रस, आलेरस, साखर इ राजयक्ष्मा, घोर वातपित्तज्वर, भयकर सन्निपात, मूळव्याध, संग्रहणी, प्रमेह, गुल्म, भगंदर, इत्यादि रोगावर देतात

---

## (२१८) मधुमेह पिटिका-व्रण

रोगी, पुरुष, वय ४७ वर्षें, राहणार बुलढाणा जिल्ह्यातील पाच वर्षामागे डोळ्यास साधारण दुखापत होऊन डोळा गेला त्या वेळेपासून मधुमेहाची जाणीव चिकित्सकाला झाली औषधे सुरु होऊन रोगी दोन महिन्यानतर बरा झालासे वाटून आपल्या गावी गेला पुढे उपस्थेंद्रियावर काही फोड आले म्हणून व कदाचित् उपदंश झाला असावा ह्या कल्पनेने एका चिकित्सकाने मूत्रपरीक्षा न करताच neo salvarsan ची एक लहानशी मात्रा सूचिकाभरणाने दिली नतर पुन्हा काही दिवसानी डाव्या हाताच्या मनगटावरील नीले (vein) मध्यें पूर्णमात्रेने सूचिकाभरण दिले हे सूचिकाभरण पूर्णपणे नीलेमध्ये न गेल्याने दुसऱ्या दिवसापासून हात सुजू लागला

दुखण्यासहि प्रारंभ झाला. त्यामुळें त्यानें दुसऱ्या निरनिराळ्या चिकित्सकांचा सल्ला घेतला. त्यापैकी एकानें मूत्रपरीक्षा केली त्यांत "मधु" असल्याचे त्या वेळी उघडकीस आले त्याकरितां pancrapatin, insulin वगैरे औषधे पोटात व सूचिकाभरणद्वारें रोग्यास दिली. त्याने सूज बरीच कमी झाली, पण हात बरा झाला नाही. म्हणून रोगी कंटाळून घरी गेला तेथें पधरा दिवसानी जोराची थंडी वाजून ताप भरला, त्या हातावरील सूज वाढली, दुसऱ्या दिवशी ठणका लागला, आणि काही दिवसांनी जवळजवळ ५ इच लाब व ३ इंच रुंदीच्या भागात भोकं पडून त्यातून रक्त, पूं वाहूं लागून पाढरें मास दिसूं लागले. घाण येऊं लागली, पण ठणका अजिबात कमी झाला जखमा भरेनात म्हणून एका चिकित्सकाने मधुमेहावर उपचार केले पाहिजेत असें सागितले पुन्हा पूर्वीचाच व्रणपट्ट व सूचिकाभरणे देण्याचा उपक्रम सुरू झाला; परंतु १॥ महिन्याच्या उपचारात अर्धी जखम भरून येण्यापलीकडे फारसे कार्य झाले नाही नतर त्या रोग्यास आयुर्वेदीय उपचार सुरू केले. रोगी आला तेव्हा एका औसास १'१ ग्रेन साखर (मधु) होती त्याला इक्षुमेहारि देण्यास सुरुवात केली. तीन दिवसानंतर जखमेंतील पांढरा सडका भाग आपोआप लाल होऊं लागला, ठणका नाहीसा झाला, घाणहि कमी झाली; १४ दिवसानंतर साखरहि तीन ग्रेनवर आली. जखमहि फक्त पाव इंच लाब रुंद राहिली असे पाहून त्यास गावी जाऊं दिलें पण त्याने "इक्षुमेहारि" घेणें सतत ७ दिवस बंद केलें त्याने साखरेचे प्रमाण वाढले असावे कारण जखमेच्या भोवतालच्या भागापैकी एक भाग एकदम फुगला, सुजला व पू वाहूं लागला. पुन्हा रोज इक्षुमेहारीच्या ९ गोळ्या देण्यास सुरुवात केली ७ दिवसातच ही नवी उत्पन्न झालेली जखम व पूर्वीची राहिलेली जखम पूर्णपणे बरी होऊन रोगी आपल्या गांवी गेला ह्या सर्व दिवसांत रोग्यानें कधी कधी गोडहि खाल्ले आहे. बटाटे, तादूळ हीं मधून मधून खात असे तरी रोगी उत्तम बरा झाला याचे श्रेय इक्षुमेहारीसच आहे

---

## (२१९) प्रमेहपिटिका व शतपोनक

आयुर्वेदीय चिकित्सामदिरात प्रमेहपिटिकेने ( carbuncle ) पीडित एक रुग्ण प्रविष्ट झाला त्याला पाठीच्या बाजूवर सुमारें ४-५ इंच घेराची प्रमेहपिटिका उत्पन्न झाली पुढें तें दुखणें वाढत वाढत शतपोनक झालें. त्याची खोली सुमारे इंच सव्वा इंच, परीघ ५ इंच, घाण फार अशा स्थितीत रोगी प्रविष्ट झाला मूत्रांतील मधूचे प्रमाण

शेंकडा ७॥ पर्यंत होतें ज्वर, झापड, मूत्राधिक्य ही लक्षणे सुद्धा होतीच. रोगी प्रविष्ट झाल्याबरोबर त्याला इक्षुमेहारि चागला मोठ्या प्रमाणात म्हणजे १५ गोळ्या दिवसातून सुरू केल्या, पहिले एक दोन दिवस त्याचे कार्य होतेसें वाटले. मूत्रमधूचे प्रमाण एकदम कमी आले परतु पुनश्च प्रमाण वाढले शतपोनक जाऊन त्या जागी भला मोठा विशाल व्रण पडला. घाण मनस्वी सुरू झाली शिलाजतु, वसतकुसुमाकर, नागभस्म, रोध्रासव वगैरे आयुर्वेदीय औषधें योजली परंतु कशा-मच दाद न देता रोग व मूत्रमधूचे प्रमाण वाढतच गेलें. पुढें पुढे मूत्र प्रमाणहि घटत चाललें रुग्णास आक्षेपक झाला दोन चार वेळा झटके आले, तन्द्राभ्रमादि लक्षणेहि होऊ लागली मूत्रमधूचे प्रमाणहि खूपच वाढलें आणि आता रोगी दगावतो की काय अशी भीति उत्पन्न झाली तेव्हा मग इन्सुलीन (insulin) ची सूचिकाभरणें सुरू केली. ही सूचिकाभरणे देत असता पोटात आयुर्वेदीय औषधे—विशेषत चद्रकला व उशिरासव—देत असूं सूचिकाभरणे (injections) फार थोडे दिवस व प्रमाणहि थोडेच द्यावे लागले त्यानंतर मात्र रोगी सुधरत सुधरत आता अगदी खडखडीत बरा आहे सूचिकाभरणे बद करून १५ दिवसावर दिवस झाले आहेत तरी मूत्रमधूचे प्रमाण अगदी शून्यावर आहे रोगी रोजच्या रोज सुधरतो आहे मात्र पोटात वर दिलेली औषधे घेणे सुरू आहेच याचा निष्कर्ष एवढाच कीं, (१) मूत्रमधूचं अतिरिक्त प्रमाण व दोषाचा खोल प्रवेश या स्थितीत दिलेली आयुर्वेदीय औषधे समाधानकारक कार्य करूं शकली नाहीत. (२) तर त्याच्याबरोबर इन्सुलिनहि द्यावे लागलें (३) परंतु एरवी इन्सुलिनचे प्रमाण व दिवसगत जी जास्तच लागते, ती मात्र आयुर्वेदीय औषधे देत असता कमी पुरली. (४) इन्सुलिनचें कार्य टिकाऊ करण्याची, तेच कार्य पुढेहि चालू राहील असं करण्याची, विशिष्ट शक्ति आयुर्वेदीय औषधामध्यें आहे असें वाटते

---

## (२२०) बलमांसक्षय

केवळ मास खाण्यानें मासवृद्धि न होता मास बनविण्याची शरीराची क्रिया वाटल्यानें म्हणजे मासाग्नि सबल असल्यानें, मास व बल दोन्ही वाढतात, ही गोष्ट प्रयोगानेहि सिद्ध झालेली आहे

साधें अन्न, मासादि पदार्थ वर्ज्य अन्न, कोंबड्याची अंडी वर्ज्य केलेलं केवळ वनस्पतीचं अन्नहि मासवृद्धिकर होऊं शकते दूध भरपूर प्रमाणात सेवन करून मासवृद्धि होऊं शकतें दूध वर्ज्य करून केवळ गहू, नादूळ, पालेभाज्या, ताक, मधुर फळें ही सेवन

करूनहि मांस वाढूं शकतें. मात्र ह्याबरोबर मांसवृद्धिकर म्हणजे मांसाग्निवर्धक अशीं औषधें दिलीं कीं कार्य होतें. हे प्रयोग मोठे आश्चर्यकारक वाटण्याजोगे आहेत साध्या अन्नानें धातु परिपुष्ट होऊन वजन वाढल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत.

एका स्त्री रोग्याचा तीव्र संग्रहणीचा विकार बरा झाला नंतर सर्व अन्न सेवन करून बलमांस वाढावें अशी रोग्याची व आमची इच्छा परंतु तें कार्य कसें बनावें ? संग्रहणीचा विकार नुकताच येऊन गेल्यानें मांस, अंडीं किंवा असेंच गुरु अन्न देण्याची पंचाईत तेव्हां जेवणांत साधें अन्न, दूध अधिक आणि मांसाग्निवर्धक औषधें खालीलप्रमाणें सुरू केलीं. बाईचें वजन औषध सुरू करण्याच्या पूर्वी केवळ ७४ पौंड होतें सुमार दीड महिन्यांत ३० पौंड वजन वाढलें आणि १०४ पौंड वजन झालें व बलमांसवृद्धि झाली. यास औषधें दिलीं ती येणेंप्रमाणें—

**सुवर्णभस्म + प्रवाळभस्म ( चंद्रपुटी ) + सुवर्णमालिनीवसंत**

दुसरा रोगी जुनाट अपचनाचा ह्या विकारानें अगदीं हैराण होऊन रोगी अगदीं कृश झाला. पाचक औषधें व लघु आहार यानें रोगी ठीक झाला परंतु रोगमुक्ति होऊनहि कार्श्य कमी होईना मांसादि पदार्थ सेवन करण्याची अपचनामुळें पंचाईत आणि बलमांस वाढल्याशिवाय रोग बरा झाला तरी पुढें कसें हें भय म्हणून मांसाग्नि व अस्थ्यग्निवर्धक **प्रवाळभस्म + मंडूरभस्म + शंखभस्म** अशी योजना करून फक्त दूध अधिक घेण्यास सांगितलें ह्याशिवाय सर्वसाधारण पाचक म्हणून **रसोनवटी** ही देत असूं. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, एकाच महिन्याच्या चिकित्सेंत ह्या रोग्याचें वजन २७ पौंड वाढलें आणि रोगी भरदार दिसूं लागला

तिसरा रोगी आमवाताचा, आमवातपीडित व त्याचबरोबर हृच्छूल यांत नशीब इतकेंच कीं, हृदयाच्या अवयवांत कांहीं विकार नव्हता ब्यानें १८–१९ वर्षांचा अगदीं तरुण पण व्याधिग्रस्ततेनें खंगलेला ह्या मुलास चिकित्सा केवळ आमवातघ्न व पाचक म्हणून **गोक्षुरादि गुग्गुळ** सुरू केला त्यानें थोडें बरें वाटल्यानंतर साधें अन्न व त्याचबरोबर **मृगशृंग** मांसास्थिअग्निवर्धक म्हणून दिलें ह्या मुलाचेंहि वजन एका महिन्याच्या चिकित्सेनें २० पौंड वाढलें

चौथा रोगी मृद्स्थीचा ह्या रोग्याचा मृद्स्थीचा विकार पराकाष्ठेला गेलेला होता ह्याहि रोग्यास **मृगशृंग + प्रवाळ + मंडूर + गुळवेलसत्त्व** हीं औषधें दिल्यानें खूप बरें वाटलें वजन एका महिन्यांत ५ पौंड वाढलें दोन वर्षांचें लहान मूल पांच पौंड मांसवृद्धीनें कसें गुटगुटीत दिसत असेल याचा विचारच करावा

पांचवा रोगी व्यवायशोषी व्यवायाच्या अतिरेकानें शुक्रक्षीणता अधिक सर्वांग अगदीं कृश आणि त्यामुळें निरुत्साहादि लक्षणें जास्त **वसंतकुसुमाकरानें** ह्या रोग्यास फार बरें वाटलें व वजनहि वाढलें

एवच, बलमासवृद्धीकरिता मासाशीच असावें लागते असें नाहीं. तर साधें अन्नहि उत्तम पचले, त्यातून धातुकण बनले आणि ते ते धातुकण त्या त्या धातूत उत्तम प्रकारें आत्मसात् झाले, समरस झाले की, धातु पुष्ट व बलवान् होतात आणि शरीरहि पुष्ट व बलवान् बनते

---

## (२२१) आंत्रपुच्छविद्रधि कीं कृमिरोग ?

वैद्यकीय खात्यात नोकर असलेले एक गृहस्थ दोन वर्षापूर्वी पोटशूलानें आजारी पडले सर्व लक्षणे आत्रपुच्छविद्रधीची असल्यानें ते निदान ठरविण्यात आलें. लागलीच त्याच्यावर शस्त्रकर्म करण्याचे ठरविण्यात आले शस्त्रकर्मास प्रारंभ करून आत्रपुच्छा-जवळील भागाचें तिर्यक्पाटन केलें आश्चर्याची गोष्ट अशी कीं, आत्रपुच्छास सूज किंवा त्यावर विद्रधि बिलकूल नसून आत्रपुच्छ अगदी नेहमींच्याइतकेंच प्रमाणबद्ध अस-ल्याचें आढळलें शस्त्रकर्मास प्रारंभ झालाच आहे पोट फाडलेंच आहे. तेव्हा आत्र-पुच्छ काढून टाकावें ह्या विचारानें शस्त्रवैद्यानें आत्रपुच्छ कापून काढलें तो आश्चर्याची गोष्ट अशी की, त्यात बराच खोलपर्यंत गेलेला एक जत आढळला त्याचें बिचाऱ्या जताचें अर्धं अग आत्रपुच्छाबरोबर कापलें गेलें होतें आणि अर्धं अंग लघुग्रहणीत राहिलें होते तेव्हा ह्या ठिकाणी केवळ जत हृ शूलाचें कारण असल्यानें त्याची चिकित्सा केली असती तर शस्त्रकर्म टळलें असतें ह्याप्रमाणेंच केवळ जंतामुळे " विद्रधी ? " निर्माण झाल्याचीहि कित्येक उदाहरणे आहेत

---

## (२२२) अग्नि(स्नेह)दग्ध स्फोट

रोगी एका हलवायाकडे नोकर होता. एक दिवस काही पदार्थ तळीत असता उक-ळत्या तेलात त्याचा उजवा हात बुडला व दग्ध झाला.

**रोगाचे स्वरूप** —हा दुर्दग्धाचा प्रकार होता कारण यात दुर्दग्धाचीं लक्षणे होती मोठमोठे फोड उत्पन्न झाले होते, हातास लाली होती, आग तर अतिशयच होती. हात खाली करवत नव्हता स्नेहव्यतिरिक्त दग्धापैकीं दुर्दग्धाची लक्षणें हीच असतात,

पण हा स्नेहदग्ध असल्याने याची लक्षणे फार तीव्र स्वरूपाची होती कारण स्नेह हा सूक्ष्म स्रोतसात शिरणारा असा असल्याने, ह्याच्यामुळे होणारी दुष्टि जास्त तीव्र स्वरूपाची व खोल अशी असते अशा प्रकारच्या दग्धास स्नेहदग्ध असे संबोधिले जातें वास्तविक नुसत्या स्नेहाने जर दग्ध होण्याचे कार्य झाले असते, तर इतर वेळीसुद्धा स्नेहाच्या या कार्याचा अनुभव यावयास पाहिजे, परंतु वस्तुतः असे होत नसून त्या स्नेहाश्रित जो अग्नि म्हणजे तेज परमाणु त्या परमाणूचाहि त्या स्नेहाबरोबर शरीरावयवाशी संयोग झाल्याने भाजण्याचे कार्य होते हाच अग्नि रूक्षद्रव्याश्रित असता, तर त्यापासून उत्पन्न होणारा दग्धाचा प्रकार स्नेहदग्धापेक्षा सौम्य स्वरूपाचा असता

सप्राप्ति —स्नेहाश्रित अग्नीचा शरीरावयवाशी संबंध आल्यानतर तत्समान असे ज त्वक्स्थ भ्राजक पित्त ह्याचा विदाह झाला व त्यायोगें स्फोटदाहादि लक्षणे उत्पन्न झाली तैल हे स्वभावत च तीक्ष्ण व उष्णवीर्य असल्याने पित्ताचा विदाह जास्त प्रमाणात होता व त्यामुळे लक्षणेहि जास्त तीव्र स्वरूपाची होती.

चिकित्सा—सदर रोग्यानं भाजल्याबरोबर प्रथम मीठ लाविले या उपचारानं आग तात्पुरती कमी होई, पण थोडयाच वेळात ती पूर्वीप्रमाणे सुरू होई (ह्या मीठ लावण्याच्या व्यावहारिक प्रचारास पुढीलप्रमाणे शास्त्रीय उपपत्ति लाविली असता चालेल असे वाटते —दग्धाने त्वक्स्थ भ्राजक पित्त विदग्ध होते, विदग्ध पित्ताचा रस अम्ल असतो "पित्तं विदग्ध अम्लम्" व मीठ हे क्षाराशी समान असते व क्षार आणि अम्लरस याचा सयोग झाल्याने मधुर रसाची उत्पत्ति होत असल्याकारणानं या ठिकाणीसुद्धा मधुररस उत्पन्न होऊन विदग्ध पित्ताचे निर्वापण होते व त्यामुळे दाहादि लक्षणे कमी होतात ) हा स्नेहदग्धाचा प्रकार असल्याने यावर रूक्ष उपचार करावयाचे कारण "स्नेहदग्धे भृशतरं रूक्षम्" असे स्नेहदग्धाच्या चिकित्सेचे सूत्र आहे व म्हणून या ठिकाणी शीतवीर्याची, शीतस्पर्शाची रूक्ष अशी चूर्णे अनताचूर्ण ( सारिवा, उपळसरी ) + उत्पलचूर्ण (कमल) थंड पाण्यात कालवून पातळ लेप देण्यास सांगितला कारण जर जाड लेप दिला असता तर त्याने थंड न वाटता उलट आग जास्त वाढली असती तसेच हा दुर्दग्ध असल्याने यावर शीत असे लेप करावयास पाहिजेत व त्याचप्रमाणे ते दाहशमनार्थ पातळ व पित्तदोषप्रत्यनीक म्हणून अविशोषि असे पाहिजेत

शीतामुष्णा च दुर्दग्धे क्रिया कुर्यात् भिषक् पुन ।<br>
घृतालेपनसेकास्तु शीतानेवास्य कारयेत् ॥

वरील ग्रंथाप्रमाणे यावर शीत व उष्ण अशी दोन्ही प्रकारची चिकित्सा करावयास पाहिजे होती, पण ह्यात दाहादि लक्षणे फारच तीव्र स्वरूपाची होती म्हणून उष्ण चिकित्सा न करिता फक्त शीत चिकित्साच केली

या लेपाच्या योगानं दाह हे लक्षण लवकर व बऱ्याच प्रमाणात कमी झाले तरीसुद्धा थोडी'आग होत होती, म्हणून पुन्हा तोच लेप वर दिला याने तिसऱ्या दिवशी आग

अजिबात थांबली. पण स्फोटाच्या ठिकाणी ठणका व तडतडणें ही लक्षणें थोड्या प्रमाणात उत्पन्न झाली व अंगातहि थोडी कणकण वाटली. म्हणून वर स्निग्ध, पित्तशामक व शीतस्पर्शी असा अग्निदग्ध मलम लावण्यास दिला. (यात पुढीलप्रमाणे द्रव्ये आहेत-(१) तुगाक्षीरी, (२) प्लक्ष, (३) चंदन (४) गैरिक, (५) अमृता (६) घृत यातील (१) तुगाक्षीरी-सधान करणारी, (२) प्लक्ष-कषायरसात्मक म्हणून पित्तशामक व सधानकारी, (३) चंदन व (४) अमृता-तिक्तरसाची शीतस्पर्शी असल्यामुळे व तिक्तरसाच्या योगानें क्लेद कमी होत असल्यानें क्लेद कमी करणारी. (५) गैरिक-हा पित्तनिर्वापक व क्लेदशोषक. (६) घृत हें शीतस्पर्शी व स्नेहन करून पित्तशमन करणारें असें आहे ज्या ठिकाणी क्लेद फार आहे, त्या ठिकाणी घृतविरहित औषधाची लुसती चूर्णे लावण्यानेंच क्लेद कमी होतो असा अनुभव आहे) पोटात घेण्यास-पित्तशामक व शीतज्वरप्रत्यनीक असे (सुवर्णमाक्षिक १ गुंज + गुळवेलसत्व २ गुं व महाज्वरांकुश २ गुंजा या प्रमाणाच्या २ पुड्या) मिश्रण २ वेळ मधांतून दिलें वरील स्निग्ध व पित्तशामक अशा मलमाने स्फोटातील तडतडणें व आग कमी झाली व मिश्रणानें ज्वरहि कमी झाला याच मलमाने पुढे तो व्रण थोड्याच दिवसात पूर्ण भरून आला एवढेच नव्हे तर पुढें उत्पन्न झालेलें त्वक्वैवर्ण्यहि यानेंच नाहीसे झाले. वरील मलम साधारणत कोणत्याहि पित्तभूयिष्ठ व्रणावरहि याचा व्रणशोधक व व्रणरोपक असा उत्तम उपयोग होतो

---

## (२२३) जंगम विषसंसर्ग

रोगी, पुरुष, वय २५, ब्राह्मण, धंदा भिक्षुकी, शरीरप्रकृति साधारण गरमी परमा वगैरे याची बाधा कधीच नाही दररोज प्रातःकाळी गोदावरीचे स्नान करीत असे. नित्याप्रमाणे एके दिवशी स्नान करून बाहेर येतो, तोच पहिल्यानें घोट्यापासून खाली पायाची आग व कंड उत्पन्न झाली त्याच दिवशी सर्व शरीर तपासलें अंगावर पित्त उठलें असा भास झाला. परंतु सन्ध्याकाळचे वेळी पाहातो तो मनगटापुढील पंजास रक्त निघेल की काय इतपर्यंत त्याने खाजवलें

**दुसऱ्या दिवसाची रोग्याची स्थिति**—खाजवलेल्या ठिकाणी खाज अगदी कमी प्रमाणात व शरीर, त्यातले त्यात कोपराखालचे हात, गुडघ्याखालील पाय व मानेच्या वरचा भाग लाल पडलेला असून त्या प्रत्येक ठिकाणी आग होती. त्याच दिवशी रोग्यास जुलाब देण्यात आला

**तिसरा दिवस**—रोग्याचे हाताला, पायाला व तोंडाला सूज पायाला तर फारच सूज आली ती अशी कीं, पायाची बोटें सुजेमुळें चिकटून गेली हाताची बोटे काळी झालेली

व तोंडाला टाळूस अत्यंत आग, सर्व दात काळे पडलेले, दातांच्या मूळाशी सुया टोचल्याप्रमाणे वेदना असत ज्वरोष्मा १०० पासून १०१॥ पर्यंत असायचा. शौचास साफ पण लघवी बंद, अन्नद्वेष, पाणी पिण्याची इच्छा व रोगी अखंड ( आग व वेदना यामुळें ) हुसूहुसूहुस् शब्द करीत होता. ही सर्व भयंकर परिस्थिति पाहून त्यास खालीलप्रमाणे इलाज करण्यात आला

**पुनर्नवा**—अंदाज २॥ ते ३ तो त्यात १ पावशेर पाणी टाकून चतुर्थांश काढा, सकाळ, दुपार व संध्याकाळ सुरू केला व ( ९६ पुटी ) **गधक रसायन** मोरावळ्यांत देणे सुरू केले तेव्हापासून सकाळपर्यंत त्याचे लघवीचे प्रमाण आठदहापट वाढले आणि त्याच दिवशी (४ थे दिवशी) पायाची व हाताची सूज निखालस उतरून गेली. हाताची व तोंडाची आग निम्याने कमी झाली त्यामुळे रोग्यास त्याच रात्री झोप आली परंतु ५ वे दिवशी सर्वांगावर लाल व काळे असे चट्टे येऊन थोडी सूजहि येण्यास आरंभ झाला सूज थोडीच कायम राहून, आग व चट्टे वाढत्या प्रमाणावर आले

माझा स्वत चा तर्क असा.—

सर्पाच्या विषारी जातीपैकी एक प्रकारच्या विषारी (मोण, अजगर, त्यास सर्व लोक "परवड" अशी संज्ञा देतात ) प्राण्याच्या फुंकण्यापासून जे विकार व लक्षणे होतात ती व या रोग्यास झालेली लक्षणे सारखीच दिसतात व तीच असावीत अथवा अशाच प्रकारचे विषारी प्राणी कुजून त्याचे उवा वगैरे जे जीव होत असतात त्यापैकी एकादा अंगाखाली रगडला गेला असावा

अथवा तसल्याच प्रकारच्या विषारी प्राण्याची लाळ, मूत्र अथवा विष्टा अंगावर पडली असावीत काय असेल ते खरे, परतु इतके खास की, विष (गर, लाळ वगैरे) पोटात मात्र गेलेले नाही हे त्याच्या सर्व लक्षणावरून दिसते.

---

## (२२४) आंत्रपुच्छविद्रधि

एका अतिशय गरीब पहारेकऱ्यास आंत्रपुच्छविद्रधीचा आजार झाला त्याला शस्त्र-प्रयोग करणे सहजच अशक्य झाले त्या रोग्यास प्रथम मधुशिग्रुत्वक् ( गोड्या शेवग्याची साल ) सिद्धघृत दिले पुढे पुढें त्यास मधुशिग्रूच्या सालीचा रस काढून तो आटवून त्याच्या मुगाएवढाल्या गोळ्याच तुपाबरोबर गिळण्यास देत असूं त्याचा उपयोग चागला झाला. ह्या गोळ्या पोटात देत असतांना वर लावण्याकरिता मधु-शिग्रूच्या रसात गुग्गुळ, ऊद याचा लेप देत असूं. कफ व वात भूयिष्ठ विद्रधीचा उपशम याने उत्तम प्रकारे होतो मधुशिग्रूनें विद्रधीत प्रसादनकार्य फार चागल्या प्रकारे होते

# (२२५) चिरकालीन नेत्राभिष्यंद

रोगी, पुरुष, वय ४० वर्षे पाच वर्षे नेत्रविकाराने आजारी पूर्वेतिहास—पाच वर्षांपूर्वी रोगी बैलगाडीतून पडून त्याच्या नाकावरून गाडीचें चाक गेलें होतें त्या वेळी नाकातून बराच रक्तस्राव झाला होता

**लक्षणे**—रोगी उपचारार्थ आला त्या वेळी त्याचे दोन्ही डोळे कुकवाप्रमाणे लाल होते डोळयातून सारखे पाणी जात असे वरचेवर डोळयातून घाण येई. रात्री डोळे अगदी घट्ट चिकटून बसत व सकाळी त्यातून बरीच घाण जाई. रात्री झोप लागत नाही अशी याची तक्रार होती शौचाला साफ होत नसे.

व्यापारधंद्यामुळे त्याचा जीवनक्रम सदर रोगास अगदी विरुद्ध होता. तो रोज निरनिराळ्या गावी व्यापाराकरिता बाजारास जात असे. सर्व प्रवास दिवसा व रात्री बैलगाडीतून होई. दुपारी उन्हात व्यापाराकरिता बाजारात बसावे लागे या नेत्राभिष्यंदाकरिता रुग्णाने पाच वर्षात बऱ्याच नेत्रचिकित्सकाची औषधें घेतली होती पण नेत्राभिष्यंद कायमच होता

**चिकित्सा**—प्रथम एक दिवस रेचनार्थ "**अभयादि मोदक**" दिला, त्यामुळे कोठा साफ होऊन त्यास बराच आराम वाटला नतर **प्रवाळभस्म** (चंद्रपुटी) १ गुज, **सुवर्णमाक्षिकभस्म** १ गु. सकाळी व सध्याकाळी दूधखडीसाखरेतून दिलें व **त्रिफळाचूर्ण** १ मासा रात्रीं निजताना मधातून दिलें ही चिकित्सा ता २५–७–३७ पासून दोन महिने तीन दिवस सुरु होती मध्यंतरी १५ दिवस **सुवर्णमाक्षिकभस्म मधांतून डोळयात घालण्यास** दिलें होतें तसेच याचेनंतर १५ दिवस **जसदभस्माचे गाईच्या लोण्यात मलम** तयार करून ते डोळयात घालण्यास दिलें या चिकित्सेने सदरचा रुग्ण वरील मुदतीत पूर्ण बरा झाला असून गेल्या तीन वर्षात त्याचे डोळयात कोणत्याहि प्रकारें बिघाड आलेला नाही.

---

# (२२६) तीव्र आनाह

रोगी, पुरुष, वय ४५ वर्षे रुग्ण चार-पाच दिवसात काही तरी असबद्ध बडबड करून भ्रमिष्टासारखें करीत होता बहुतेक त्याचे डोकें बिघडलें असावे व तो बरा होणे अशक्य आहे असें नातलगास वाटत होतें

तपासून पाहता रोग्याची असबद्ध बडबड व भ्रमिष्टावस्था नजरेस आलीच, परंतु पोट तपासताना भयकर आनाह असल्याचें आढळून आलें ज्वर ९८° होता. कष्टानें

श्वासोच्छ्वास सुरू होता, म्हणून तावडतोब बस्ति (एनिमा) देण्यास सांगितलें. बस्तीकरिता मावणाचें गरम पाणी, त्यात थोडें मीठ टाकून वापरलें होतें व भ्रमिष्टावस्था दूर होण्यासाठीं सुवर्णसूतशेखर १ गु दिवसातून तीन वेळा खडीसाखरेच्या पाकातून दिला या बस्तीनें रुग्णास जवळ जवळ एक बुट्टीभर मल पडला व यामुळें असबद्ध बडबड व भ्रमिष्टावस्था कमी झाली असून त्यास आता पुष्कळ बरें वाटत होतें परंतु पोटात दाह, पित्तजन्य खोकला असून झोप येत नव्हती म्हणून खालील मिश्रण तीन दिवस दिलें

प्रवाळ (चं पु) १ गुं, उन्हाळ्याचें औषध २ गु., सितोपलादिचूर्ण १ मासा दिवसातून तीन वेळ खडीसाखरेच्या पाकातून

**विशेष सूचना**—खेडेगावच्या सर्व प्रकारचे रुग्णात आनाह असून कोष्ठशुद्धीची जरूरी असल्याचें नेहमी प्रत्ययास येतें अज्ञानामुळें कित्येक वर्षे कोष्ठशुद्धि केलेली नसते. खाणेपिणे नेहमीच वेळी अवेळी व अवास्तव असतें कोष्ठशुद्धीनें बहुतेक रुग्णास बराच आराम पडतो अशा वेळी

तस्माच्चिकित्साऽर्धं इति प्रदिष्ट ।
कृत्स्ना चिकित्साऽपि च बस्तिरेके- ॥ वा सू अ १९

हें तत्व चांगलेंच प्रत्ययास येतें.

---

# (२२७) मृद्वस्थि (Rickets) व त्वग्रोग

रोगी, ११ महिन्याची मुलगी अत्यत कृश झालेली असून अंगास झुरळ्या पडल्या होत्या हातपाय काड्या असून पोट मोठें झालें होतें थोडा ज्वर व खोकला होता. शिवाय अंगावर खरूज (पामा) होती डोक्यात सुपारीएवढे मोठें लाल फोड उठलेले असून त्यापैकी काही फुटून त्याच्या एक इंच लांबीच्या डोक्यात जखमा (व्रण) झालेल्या होत्या त्यातून पूं येत होता शौचास साफ होत नसे

**व्रणचिकित्सा—शोधन**—सक्षौद्रनिंबपत्राभ्या युक्तः संशोधनं परम् । वाग्भट

या सूत्रानुरूप व्रणशोधनार्थ **कडुनिंबाच्या पानाचा** काढा करून त्यात मध घालून त्यानें व्रणाचे धावन करण्यास सांगितलें यानें व्रणाचे चांगलें शोधन झालें

**रोपण**—शोधनानंतर ते व्रण भरून येण्यासाठी त्यात पारदादिमलम भरण्याकरिता दिलें यानें पाच दिवसात व्रण बरेच भरून आले नंतर आणखी सात दिवस हेंच मलम जखमेत भरण्यास दिलें या मुदतीत जखमा पूर्ण भरून आल्या

पिचुप्लुत प्रदातव्यं दुष्टव्रणविशोधनम् ।
नाडीव्रणहरं चैव सर्वव्रणनिषूदनम् ॥
ये व्रणा न प्रशाम्यन्ति भेषजाना शतेन च ।
अनेन ते प्रशाम्यन्ति सर्पिषा स्वल्पकालत- ॥

असे पारदादि मलमाचे योगरत्नाकरात व्रणचिकित्सेत गुणधर्म दिलेले आहेत. ते अनुभवून पाहता अगदी तंतोतत पटतात याने व्रणाचे शोधन होऊन रोपणहि होते सर्व प्रकारचे दुष्ट व्रण खरोखरीच त्वरित भरुन येतात याचा अनेक प्रकारचे व्रणावर उपयोग करुन पाहिलेला आहे फिरंगोपदंशातील व्रण याने फार त्वरित व उत्कृष्ट भरुन येतात **अंगावर कोळी चिरडल्यामुळें भाजल्यासारखे फोड ( blisters ) उठतात** त्यास हे मलम लाविले असता फोड व जखमा लवकर बऱ्या होतात **मुलांना देवी काढल्यानतर** त्या चिघळून अत्यत घाण जखमा होऊन त्यातून पू वाहतो, यातहि याचा उत्कृष्ट उपयोग झाला आहे. आयुर्वेदातील व्रणचिकित्सेतील हे एक अत्यंत प्रभावी औषध आहे यात शंका नाही

मृद्वस्थि ( rickets ) व रक्तशुद्धीकरिता पोटात खालील मिश्रण दिले

**प्रवाळभस्म ½ गु + मृगशृंगभस्म ¼ गु + गुळवेलसत्व ½ गु + गंधकरसायन ½ गु** शर्करा २ गुंजा दिवसातून तीन वेळ खडीसाखरेच्या पाकातून या चिकित्सेने २६ दिवसात मूल मृद्वस्थीच्या विकारातूनहि बरे झाले.

**पारदादि मलमाची कृति —पारा, गंधक, शेंदूर, राळ, कपिला, मुरदाडशिंगी, मोरचूत, काथ,** ही सर्व समभाग व सर्वांच्या चौपट तूप घेऊन मलम करावे.

---

## (२२८) निजव्रणचिकित्सा

रोगी, पुरुष, वय २२ वर्षे यास डाव्या मांडीच्या आतल्या बाजूस खोल व मोठा विद्रधि झाला होता. क्लोरोफार्म देऊन त्याचे पाटन करण्यात आले. जखम ४ इंच लांब व २ इंच खोल होती ऑपरेशननंतर एक दिवस रोग्याची नाडी लागत नव्हती व हृदयोत्तेजक औषधे द्यावी लागली होती १॥ महिन्यात शोधन रोपण तेलानी सर्व जखम भरुन आली व रोगी बरा झाला

रोगी, पुरुष, वय ५७ वर्षे कमरेच्या ४ मणक्याच्या जवळपास पाठीस मधुमेहव्रण झाला होता. व्रणाचा आकार चार इंच लांब, चार इंच रुंद असा होता लघवीतून ५ ते ८ % टक्के साखर जात होती आधी पाश्चिमात्य औषधे लावून त्याने व्रण

बरा न झाल्यामुळें शोधन तेल लावण्यास सुरुवात केली. पोटातून लघवीतील साखरेचें प्रमाण कमी करणारी औषधे दिली जात होती १ महिना १८ दिवसात मधुमेह व्रण वरा झाला व लघवीतील साखर जाणेंहि थांबले

रोगी, पुरुष, वय १८ वर्षे याच्या दोन्ही पायावर गळवे झाली होती व एका बाजूच्या जांघाडातील गाठी वाढून त्यात पूं झाला होता जांघाडातील विद्रधीचे पाटन करण्यात आले व त्यावर रोज शोधनतैलाचा पट्ट बांधण्यात येई या उपायानें ८ दिवसात आराम वाटला

---

## (२२९) आगन्तुव्रणचिकित्सा

रोगी, पुरुष, वय २२ वर्षे निरुद्धप्रकश (phymosis)चें साधे शस्त्रकर्म ता २५।६।२७ रोजी केले अलोपेथिक औषधानी ता १८।७।२७ पर्यंत (२४ दिवस) व्रणधावनशोधन चालले होते, पण जखम भरून आली नाही नंतर शोधन रोपण ही तेलें वापरली त्याने ता ३१।७।२७ ला (१३ दिवसात) ती जखम पूर्ण बरी झाली

रोगी, पुरुष, वय ३५ वर्षे दगडाच्या खाणींत सुरुंगाने उडालेला दगड लागून उजव्या तंगडीला जखम झाली. २० मैलांवरून त्यास दवाखान्यात आणण्यात आलें शोधन तेलाच्या व्रणपट्टाने त्यास ११ दिवसात बरे वाटले

रोगी, स्त्री वय ५० वर्षे, अधळी डाव्या पायावरून चुन्याची गाडी गेली त्यामुळे सर्व डाव्या पायाचा चुराडा झाला तो पाय माडीमधून कापूनच काढावा लागला ऑपरेशननंतर तिसऱ्या दिवशी ज्या वेळी पट्ट सोडण्यात आला त्या वेळी सर्व जखम दुष्ट झालेली आढळली त्यामुळे टाके घेणे शक्यच नव्हते रुग्णाचे एकंदर प्रकृतिमान पाहता आणखी माडी कापणे अगर जांघाडातून सर्व पायच काढून टाकणे अशक्यप्राय होतें. म्हणन आयुर्वेदीय पद्धतीचे उपचार सुरू केले प्रथमपासून अखेरपर्यंत शोधन तेलच वापरण्यात आले रोगी अशक्त व जखम सडलेली असें असताहि २॥ महिन्यात जखम भरून आली

रोगी, पुरुष, वय १९ वर्षे गावापासून सुमारे ३-४ मैलावर असता सायकलीवरून पडला त्या रस्त्यानें जाणाऱ्या मोटार लारीने त्यास आयुर्वेदीय रुग्णालयात पोचविलें रोगी अर्धवट बेशुद्धीत होता त्यामुळें जखमा शिवून टाकल्या तरी त्याचे दु:ख त्यास जाणवलें नाही त्याच्या तोंडावर व हातावर कित्येक ठिकाणी मार लागून जखमा झाल्या होत्या चेहेऱ्यावरच्या भागावरच ७-८ टाके घ्यावे लागले होते प्रथमपासून या जखमाना रोपणतेल लावण्यात आलें २५ दिवसानी रोग्याच्या सर्व जखमा बऱ्या होऊन रोगी घरी गेला



# निवडक रुग्णचिकित्सा

## रोगसूचि

( आकडे निवडक रुग्णचिकित्साचे आहेत )